# दासोपंतकृत गीतार्णव

## अध्याय १६ वा

**संपादक मंडळ**

डॉ. चंद्रकांत देऊळगावकर
डॉ. हरिहर मातेकर
डॉ. एम्. जी. मोहोळकर



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# दासोपंतकृत गीतार्णव

## अध्याय १६ वा

संपादक मंडळ


डॉ. चंद्रकांत देऊळगावकर

डॉ. हरिहर मातेकर

डॉ. एम्. जी. मोहोळकर





महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

प्रथमावृत्ती : मार्च २००७

प्रकाशक : सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत, तिसरा मजला,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर (पूर्व), मुंबई - ४०० ०१४.



मुद्रक : व्यवस्थापक,
शासकीय फोटोझिंको मुद्रणालय,
५, फोटोझिंको पथ,
पुणे - ४११ ००१.

किंमत : रुपये 85=00

# निवेदन

महाराष्ट्राच्या विविध भागामध्ये अनेक संत जन्म पावले आणि त्यांनी विविध तऱ्हेची आध्यात्मिक, दर्शनात्मक तसेच सर्वसामान्य भाविकांचे उद्‌बोधन होईल अशा तऱ्हेची रचना केली. ही संत वाङ्मय परंपरा फार प्राचीन आहे व ती महाराष्ट्राचे एक वैभव मानता येईल अशी आहे. मराठवाडा हा तर संताचा आणि कवींचा प्रदेश, या प्रदेशातील दासोपंत हे एक महान कवी, संपादक मंडळाने म्हटल्याप्रमाणे त्यांना मराठीचे कुबेर म्हणावे लागेल. परंतु अनेक संतांच्या रचनांची दुर्दैवाने जशी आजवर उपेक्षा झाली तशीस ती दासोपंतांच्या काव्याची झाली असे म्हणावे लागते. तथापि, महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतरचा आधुनिक महाराष्ट्र आपली प्राचीन वाङ्मयीन परंपरा विसरलेला नाही, ही भाग्याची गोष्ट आहे. किंबहुना या प्राचीन वैचारिक, काव्यात्मक आणि अध्यात्मिक संत वाङ्मयाचे पुर्नप्रकाशन होऊन ते वाचकांना सहजपणे उपलब्ध व्हावे असे प्रयत्न शासन पातळीवरून सुरु झाले. त्या प्रयत्नांचाच एक भाग म्हणून महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातर्फे दासोपंतांच्या वाङ्मयाचे प्रकाशन व्हावे असा प्रयत्न सुरु झाला. त्या अंतर्गत संत साहित्याच्या ज्येष्ठ आणि अभ्यासू व्यक्तीचे एक संपादक मंडळ नेमण्यात येऊन त्यांच्याकडे दासोपंताच्या साहित्याचे संकलन आणि संपादन करण्याचे कार्य सोपविण्यात आले. संपादक मंडळाने मोठ्या परिश्रमाने दासोपंताच्या वाङ्मयाची पुर्नप्रकाशनार्थ मुद्रण प्रत सिद्ध केली व आज दासोपंतांच्या चरित्रासह त्यांचे काव्य वाचकांसमोर सादर करावयाची संधी मंडळाला लाभत आहे. या ग्रंथामध्ये दासोपंतकृत गीतार्णवाचा १६ वा अध्याय प्रकाशित करण्यात आलेला आहे. तो केवळ संत साहित्याच्या अभ्यासकांना उपयुक्त ठरेल एवढेच नव्हे तर सर्वसामान्य काव्य रसिकांनाही तो संग्राह्य वाटेल. या वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथाचे लेखन-संपादन करण्याचे कठीण कार्य यशस्वीरीतीने तडीस येण्याबद्दल त्या ग्रंथाच्या संपादक मंडळाला धन्यवाद द्यावे तेवढे थोडेच होतील.

मधु मंगेश कर्णिक<br>
अध्यक्ष,<br>
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

स्थळ : दादर<br>
दिनांक : १९, जानेवारी २००७

# संपादक मंडळाचे निवेदन

दासोपंत हे मराठीतील महान कवी. संख्यात्मक आणि गुणात्मकदृष्ट्या विचार केला तर ते मराठीचे कुबेर म्हणावे लागतील. तरीही संशोधक आणि प्रकाशक यांचे त्यांचेकडे लक्ष गेले नाही, दुर्लक्षच झाले. त्यांनी दासोपंत वाङ्मयाची उपेक्षाच केली असे खेदाने म्हणावे लागते.

म्हणूनच मराठवाड्यातील एक जेष्ठ संशोधक श्री. न. शे. पोहनेरकर यांची अशी तळमळ होती की, दासोपंतांचे समग्र वाङ्मय प्रकाशित व्हावे. या संदर्भात त्यांनी महाराष्ट्र शासनाशी पत्रव्यवहार केला आणि त्यांच्या प्रयत्नाला यश आले.

दिनांक ४ जून १९८७ च्या महाराष्ट्र शासनाच्या आदेशान्वये 'मराठवाडा प्राचीन साहित्य प्रकाशन प्रकल्पा'च्या अंतर्गत 'दासोपंत साहित्य प्रकाशन' हा उपप्रकल्प मान्य करण्यात आला आणि श्री. न. शे. पोहनेरकर यांचे अध्यक्षतेखाली सर्वश्री वि. पां. देऊळगावकर, डॉ. हरिहर मातेकर, डॉ. चंद्रकांत देऊळगावकर आणि त्र्यंबकराव गोस्वामी यांचे संपादक मंडळ नेमण्यात आले. संपादक मंडळाने अंबाजोगाई येथील देवघरी असलेल्या गीतार्णवाची झेरॉक्स प्रत काढली. त्यानंतर गीतार्णवतील १५, १६, १७ हे तीन अध्याय संपादित करण्याचा निर्णय घेण्यात आला. कामही सुरू झाले. परंतु दुर्दैवाने न. शे. पोहनेरकर यांचे निधन झाले आणि कामही थांबले.

नंतर महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने १६ मार्च १९९३ ला काढलेल्या आदेशान्वये गीतार्णव ग्रंथाच्या प्रकाशनासाठी संपादक मंडळ नियुक्त केले. त्याचे निमंत्रक डॉ. चंद्रकांत देऊळगावकर, डॉ. हरिहर मातेकर, डॉ. एम. जी. मोहोळकर यांचे संपादक मंडळ नियुक्त करण्यात आले. या संपादक मंडळाची पहिली बैठक, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष श्री. य. दि. फडके यांच्या अध्यक्षतेखाली २२-४-१९९३ रोजी औरंगाबाद येथे झाली. या बैठकीत गीतार्णवाचे १६ आणि १७ हे अध्याय संपादित करण्याचा निर्णय घेण्यात आला. मंडळाच्या एकूण ६ बैठका घेण्यात आल्या, काम मार्गी लागले.

परंतु अंबाजोगाई येथील देवघरी उपलब्ध झालेली १६ व्या अध्यायाची मूळप्रत अती जीर्ण झालेली व अस्पष्ट होती. काही शब्द, अक्षरे वाचण्याजोगे नव्हते, म्हणून धुळे येथील समर्थ वाग्देवता मंदिराशी संपर्क साधला. डॉ. चंद्रकांत देऊळगावकर व डॉ. हरिहर मातेकर तेथे जाऊन आले. पण प्रस्तुत अध्याय तेथेही उपलब्ध नव्हता म्हणून उपलब्ध प्रतच आधारभूत

मानली. काम सुरु केले. तसेच त्यावेळी अंबाजोगाई येथील डॉ. अमृतराव ऊर्फ भाऊसाहेब कुंबेफळकर/देशपांडे यांनी त्यांचेकडील टंकलिखित प्रत उपलब्ध करून दिली. त्यामुळे काम अधिक सुकर झाले. लातूर, उमरगा, अंबाजोगाई येथे संपादक मंडळाच्या बैठका झाल्या आणि कामाला गती प्राप्त झाली.

आणि दुर्दैवाने संपादक मंडळातील एक संपादक डॉ. एम. जी. मोहोळकर यांचे दुःखद निधन झाले. त्यामुळे डॉ. चंद्रकांत देऊळगावकर आणि डॉ. हरिहर मातेकर यांनीच हे काम पूर्ण केले

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष, अंबाजोगाई येथील देवघरचे गोस्वामी आणि डॉ. अमृतराव ऊर्फ भाऊसाहेब देशपांडे कुंबेफळकर या सर्वांनी या कामात सहकार्य केले. त्याबद्दल त्याचे मनःपूर्वक आभार.

— संपादक मंडळ

# संपादक मंडळाची माहिती

**त्यांच्या कार्याचे स्वरुप**

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने दासोपंतकृत गीतार्णवातील १६ व्या अध्यायाच्या संपादनासाठी डॉ. चंद्रकांत देऊळगावकर, डॉ. हरिहर मातेकर, डॉ. गो. मु. मोहोळकर अशा तिघांचे संपादक मंडळ नियुक्त केले.

**त्यांची माहिती अशी :**

**१) डॉ. चंद्रकांत देऊळगावकर**

निवृत्त मराठी विभागप्रमुख, दयानंद महाविद्यालय, लातूर ''मन्मथ स्वामी : व्यक्ती आणि वाङ्मय या विषयावर प्रबंध लिहून पी.एच.डी. पदवी प्राप्त. चार विद्यार्थ्यांना मार्गदर्शनाखाली पी.एच.डी. मिळाली. दहा कथासंग्रह प्रकाशित, मराठी निबंध व लघुनिबंध संत साहित्यावर अनेक लेख.

**२) डॉ. हरिहर मातेकर,**

निवृत्त मराठी विभागप्रमुख, खोलेश्वर महाविद्यालय, अंबाजोगाई. ''मराठवाड्यातील लोकसाहित्याचा भाषिक अभ्यास'' या विषयावर प्रबंध लिहून पी. एच. डी. पदवी प्राप्त.

**प्रकाशित साहित्य**

१) सद्गुरुदासविरचित दासोपंत चरित्र
२) योगेश्वरी माहात्म्य
३) लोकसाहित्य निर्मितीच्या प्रेरणा (शोध निबंध)
४) याशिवाय लोकसाहित्य व संतसाहित्यावरील विविध लेख,
अनेक कथा आणि २०० च्या वर कविता.

**३) डॉ. गो. मु. मोहोळकर**

निवृत्त मराठी विभागप्रमुख, छत्रपती शिवाजी महाविद्यालय, उमरगा. ''दासोपंतकृत गीतार्णव : १८ वा अध्याय - एक भाषिक अभ्यास'' प्रबंध.

या 'गीतार्णवाच्या' १६ व्या अध्यायाच्या संपादित आवृत्तीच्या लेखनाचे काम प्रा. श्रीहरी आत्माराम वेदपाठक (चापोली ता. चाकूर, जि. लातूर) यांनी अत्यंत काळजीपूर्वक व जबाबदारीने पार पाडले याबद्दल मंडळ त्यांचे मनःपूर्वक आभार मानते.

प्रस्तावना

१) दासोपंत चरित्र

२) दासोपंतांचे समग्र वाङ्मय

३) दासोपंतांचे प्रकाशित वाङ्मय

४) (अ) गीतार्णवाचे एकूण स्वरूप

(ब) लेखन काळ

(क) वैशिष्ट्ये

(ड) प्रकाशनामागील प्रेरणा

५) (अ संपादक मंडळास मिळालेली १६ व्या अध्यायाची हस्तलिखिते

(ब) त्यापैकी कोणते प्रमाण मानले त्याची कारणे.

(क) अन्य हस्तलिखितातील पाठभेद आणि त्याची कारणे

(ड) त्याची व्यवस्था कोणत्या प्रकारे लावली त्याची कारणे

६) १६ व्या अध्यायाची भाषिक वैशिष्ट्ये

७) दासोपंतांच्या शैलीची वैशिष्ट्ये आणि त्यांनी लावलेल्या अन्वयार्थाची वैशिष्ट्ये

८) १६ व्या अध्यायाचे वाङ्मयीन मूल्य

९) संपादक मंडळाची माहिती व त्यांनी केलेल्या कार्याचे स्वरूप

१०) (अ) कठीण शब्दांचा कोश

(ब) संदर्भ ग्रथांची यादी

## दासोपंतकृत गीतार्णव १६ वा अध्याय (ओवी संख्या २६०४)

### प्रस्तावना

### १) मागोवा

मराठी साहित्याचा महासागर निर्माण करणाऱ्या दासोपंतांना मराठी साहित्यात अनन्यसाधारण महत्व आहे. आयुष्यभर प्रचंड ग्रंथनिर्मिती करणारे दासोपंत आणि त्यांचे वाङ्मय उपक्षितच राहिले, याची खंत वाटते. संशोधकानीही त्यांची फारशी दखल घेतली नाही, याचाही खेद वाटतो. यापूर्वीची काही चरित्रे उपलब्ध आहेत. त्यात महिपतीच्या 'भक्तीलीलामृता'त, जयराम सुताच्या 'संतमालिके'त, गिरिधराच्या 'समर्थप्रतापा'त दासोपंतांचे चरित्रोल्लेख संक्षेपाने केलेले आहेत. आधुनिक लेखकात कै. राजवाडे यांनी दासोपंतांची ओळख महाराष्ट्रास प्रथम करून दिली.[१] ज. र. आजगावकर यांनी 'संतमालिके'त आणि ल. रा. पांगारकर यांनी प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास या ग्रंथातही त्यांचे चरित्र संक्षेपाने आलेले आहे. डॉ. श्री. व्यं. केतकर यांनी 'ज्ञानकोशा'त आणि म. ग. चित्रावशास्त्री यांनी 'चरित्रकोशा'तही त्यांची संक्षिप्त चरित्रे आलेली आहेत. 'महाराष्ट्र सारस्वत'कार वि. ल. भावे यांनी आपल्या 'महाराष्ट्र सारस्वत' मध्ये दासोपंतांच्या चरित्रावर महत्वपूर्ण असा प्रकाश टाकला आहे. त्याचप्रमाणे मराठवाड्यातील जेष्ठ संशोधक न. शे. पोहनेरकर यांनी आपल्या 'दासोपंतांची पासोडी' या संशोधनात्मक ग्रंथाच्या प्रस्तावनेत दासोपंतांच्या चरित्राचा साधार व सप्रमाण विचार केलेला आहे. तो विशेष महत्वाचा आहे. तसेच डॉ. हरिहर मातेकर यांनी 'सद्गुरूदासविरचित दासोपंत चरित्र' संपादित करून प्रकाशित केले आहे. या ग्रंथाला लिहिलेल्या प्रस्तावनेत डॉ. मातेकर यांनी दासोपंताच्या जीवनातील आतापर्यंत ज्ञान नसलेल्या महत्वाच्या घटना-प्रसंग सप्रमाण व साधार मांडलेल्या आहेत, त्याही महत्वाच्या आहेत. स्वतंत्र चरित्र ग्रंथ म्हणून 'सद्गुरूदासविरचित दासोपंत चरित्र' हा पहिला व एकमेव ग्रंथ असावा.

हा मागोवा घेताना काही बांबीचा विचार केला पाहिजे. वि. ल. भावे यांनी 'महाराष्ट्र सारस्वत' मध्ये दासोपंतावर अप्रस्तुत टीका केली आहे. ते म्हणतात, "एवढा विशाल बुध्दीचा पुरूष सरकारी नोकरी सोडल्यावर केवळ वेदांत कुटीत शांतपणे स्वस्थ रहावा याबद्दल वाईटही वाटते.[२] पुढे ते म्हणतात," ज्याने केवळ दुष्टपणाने, आपण अनपराधी असूनही आपणास छळले, व ज्याच्या अमलात आपल्या देशावर, आपल्या लोकांवर, आपल्या मुलाबाळावर

(१) ग्रंथमाला मासिक, शके १८२४.
(२) महाराष्ट्र सारस्वत - वि. ल. भावे, पृष्ठ - २३५.
(३) महाराष्ट्र सारस्वत - वि. ल. भावे, पृष्ठ - २३६.

असा जुलुम झाला, अशा बादशहाला काही अद्दल घडवावी, अशा बादशहाची तिरडी उचलण्याचा प्रयत्न करावा असे दासोपंताच्या मनातही आले नाही व त्याने तसा यत्नही केलेला दिसत नाही, याबद्दल मन खट्टु होते. या अशा शांतपणाबद्दल, समाधानी वृत्तीबद्दल थोडा किळसही वाटतो.[३]" खरे तर भावे यांची ही टीका अप्रस्तुत आहे, अनुचितही आहे. हा अक्षेप मान्य केला तर ज्ञानेश्वरोत्तरकालीन संतांपैकी समर्थ रामदास सोडुन बाकी सर्व संतांना ही टीका लागू पडते. ती अयथार्थ म्हणावी लागेल. दुसरे म्हणजे दासोपंत स्वतः कधीही सरकारी नोकर नव्हते. ज्ञानेश्वरानंतर महाराष्ट्रावर वेगवेगळ्या बादशाहायी आक्रमणे झाली. बादशाहया प्रस्थापित झाल्या. जुलुमजबरदस्ती व सक्तीची धर्मांतरे झाली हे ही खरे आहे; पण त्याचा दोष संतांना देता येणार नाही; कारण संतांचा पिंडच वेगळा होता. ते अध्यात्मवादी होते. त्यांचे भक्तीला प्राधान्य होते. पण त्यांची वृत्ती आणि दृष्टी जीवनविन्मुख कधीच नव्हती. त्यांच्या वाङ्मय-कार्याने धर्म जागृती झाली. समाज धर्मसूत्रांनी घट्ट बांधला गेला. संघटित झाला. त्यामुळे धर्मांतराला आळा बसला. संतांचे महत्कार्य लक्षात घेतले पाहिजे. तसेच 'सर्वाभूतीसमभाव', 'जन तेचि जनार्दन; 'पराविया नारी - रखुमाईसमान' यातून त्यांची जीवनदृष्टी स्पष्ट होते. ही सामाजिक दृष्टिही म्हणावी लागेल. हे विवेचन सर्व संतांप्रमाणे दासोपंतांच्या संदर्भातही यथार्थ ठरते.

येथे आणखी एक विचार व्यक्त करणे क्रमप्राप्त ठरते तो असा की, ज्ञानेश्वरांची 'ज्ञानेश्वरी' दासोपंतांचा 'गीतार्णव' आणि वामन पंडितांची 'यथार्थदीपिका' या तीन गीता टीका अतिशय महत्वाच्या आहेत. असे असूनही डॉ. वि. रा. करंदीकर यांनी आपल्या 'भगवद्गीतेचे तीन टीकाकार' या ग्रंथात दासोपंतांचा आणि त्यांच्या 'गीतार्णवा'चा उल्लेख केलेला नाही. याचा खेद वाटतो. दासोपंत आणि त्यांचे वाङ्मय यांची किती उपेक्षा केली जाते. त्याचे हे उत्तम उदाहरण आहे. तरी देखील दासोपंत व त्यांचे वाङ्मय यांचे महत्व नाकारता येत नाही. डॉ. वि. रा. करंदीकरानादेखील त्यांनी तत्वज्ञान आणि मराठी साहित्याच्या संदर्भात विवेचन करताना दासोपंताचा 'गीतार्णव'व व गीतार्थबोध चंद्रिका,[४] मराठी स्वतंत्र ग्रंथाचा विचार करताना दासोपंताच्या 'ग्रंथराज'[५] या ग्रंथाचा उल्लेख केलेला आहे. यावरून दासोपंतांच्या वाङ्मयाचे महत्व सहज लक्षात येण्यासारखे आहे.

### २) दासोपंत चरित्र

दासोपंताचा जन्म बेदर (कर्नाटक) प्रांतातील नारायण पेठ येथे शके १४७३ भाद्रपद वद्य ८ रोजी झाला. त्यांच्या आईचे नाव पार्वतीबाई आणि वडीलांचे नाव दिगंबरपंत. ते

(४) सांस्कृतिक संचित - डॉ. वि. रा. करंदीकर - पृष्ठ : ४७
(५) सांस्कृतिक संचित - डॉ. वि. रा. करंदीकर - पृष्ठ : ४८

नारायणपेठचे देशपांडे होते, असा उल्लेख सर्वच लेखकांनी केलेला आहे. तथापि 'सद्गुरूदासविरचित दासोपंत चरित्रा'त ते नारायणपेठचे 'देशमुख' आणि 'ग्रामाधिकारी' संपूर्ण[६] असा उल्लेख केलेला आहे. तेव्हा देशमुखी आणि देशपांडेपण त्यांचेकडे असणे संभवनीय वाटते. दासोपंतांचा उपनयन संस्कार ५ व्या वर्षी झाल्याचा उल्लेख [७] न. शे. पोहनेरकर आपल्या 'दासोपंतांची पासोडी' मध्ये करतात आणि विवाह[८] थाटामाटात झाला असे सांगतात. येथे विवाहाचे वेळी त्यांच्या वयाचा उल्लेख नाही. 'सद्गुरूदासविरचित दासोपंत चरित्रात' मात्र दासोपंताचे बारसे झाल्याचे सांगून, ४ थ्या वर्षी (शके १४७७) चौलकर्म[९] ५व्या वर्षी (शके १४७८) मध्ये उपनयन संस्कार[१०]आणि ९व्या वर्षी (शके १४८२) मध्ये विवाह[११] झाल्याचे नमुद करतात. दासोपंताच्या जीवनातील या महत्वाच्या प्रत्येक प्रसंगी त्यांनी केलेल्या वयाचा उल्लेख, ही सर्व माहिती नवीन आहे, म्हणून महत्वाची आहे. प्रस्तुत चरित्रामुळे आणखीही नवीन माहिती मिळते ती अशी: दासोपंताच्या पत्नीचे माहेर गदवाल असून तिच्या वडीलांचे नाव हरिपंत सावकार होते. तसेच ते पूर्वीपासून दासोपंतांचे आप्तसंबंधी होते. दासातेपंतांच्या पत्नीचे नाव जानकीबाई होते.[१२]

दासोपंतांचा विवाह मोठ्या थाटामाटात वैशाख मासात पार पडला आणि लगेचच येणारा पावसाळा झालाच नाही. म्हणून हे वर्ष दुष्काळाचे म्हणून ओळखले गेले. माणसांना अन्न नाही, गुरांना चारा नाही, अशी भीषण परिस्थिती निर्माण झाली. ती पाहून दिगंबरपंतांचे अंत:करण कळवले. त्यांनी अन्नदान केले. गुरांसाठी भांडारातून चारा दिला. म्हणून या वर्षी त्यांनी या वर्षाचा ५ लाख रूपये महसुल सरकारी खजिन्यात भरला नाही. त्यामुळे बादशहाचा कोप झाला. दरबारी बोलावणे आले. पाच लाख रूपये घेऊन या नाही तर बरे होणार नाही, असे बादशहाचे फर्मान होते.(१३) त्याप्रमाणे दिंगबरपंत दासोपंतांना बरोबर घेऊन दरबारात हजर झाले. दोन वर्षाच्या दुष्काळामुळे वसुल मिळाला नाही म्हणून भरणा करण्यास असमर्थता व्यक्त केली. तेव्हा, बादशहाने दोन महिन्यात रकमेचा भरणा केला नाही तर दासोपंतास मुसलमान करू असे करारपत्र लिहून घेतले. ठरलेली मुदत संपली. तेवढ्यात अंत्यज पाठेवार आला व त्यांनी पाच लाखाचा भरणा केला. बादशहाने दासोपंताचा सत्कार केला आणि

(६) . सद्गुरूदासविरचित दासोपंत चरित्र - डॉ. हरिहर मातेकर : प्रस्तावना : पृष्ठ : ६
(७) दासोपंतांची पासोडी - न. शे. पोहनेरकर : पृष्ठ : ८
(८) दासोपंतांची पासोडी - न. शे. पोहनेरकर : पृष्ठ : ९
(९) सद्गुरूदासविरचित दासोपंत चरित्र - डॉ. हरिहर मातेकर : प्रस्तावना : पृष्ठ ७
(१०) सद्गुरूदासविरचित दासोपंत चरित्र - डॉ. हरिहर मातेकर : प्रस्तावना : पृष्ठ ७
(११) सद्गुरूदासविरचित दासोपंत चरित्र - डॉ. हरिहर मातेकर : प्रस्तावना : पृष्ठ : ७
(१२) सद्गुरूदासविरचित दासोपंत चरित्र - डॉ. हरिहर मातेकर : प्रस्तावना : पृष्ठ ८
(१३) सद्गुरूदासविरचित दासोपंत चरित्र - डॉ. हरिहर मातेकर : प्रस्तावना : पृष्ठ ९

सन्मानपूर्वक नारायणपेठेस पाठविले. तथापि पोहनेरकरांनी भरणा करावयाच्या रकमेचा उल्लेख केलेला नाही आणि भरण्याची मुदत एक महिन्याची असल्याचे नमुद केले आहे.[१४] दासोपंताचे ९व्या वर्षी विवाह झाल्यानंतर लगेचच दोन वर्षे दुष्काळ पडला. दुष्काळाची दोन वर्षे गेली. तिसऱ्या वर्षी बेदरास आगमन म्हणजे शके १४८५ मध्ये वयाच्या बाराव्या वर्षी त्यांची बादशहाने मुक्तता केली केली आणि नारायण पेठेस पाठविले. त्यांना पाहून सर्वांना आनंद झाला मात्र वस्तुस्थितीची जाणीव होताच त्यांना अत्यंज पाठेवारूपी दत्तानेच हे काम केले याची मनोमन खात्री पटली. येथे संत दामाजी आणि विठू महाराची आठवण येते. दासोपंतांनाही वास्तवाची जाणीव झाली. या जाणीवेपोटी त्यांना मानवी असमर्थतेची आणि सर्व शक्तीमान परमेश्वरी शक्तीची प्रचिती आली. त्यांना परमेश्वर भेटीची ओढ लागली. अंगी विरक्ती बाणली. तसेच ऐहिकतेकडून आध्यात्माकडे परिवर्तीत होण्याचा सुवर्ण क्षण दासोपंतांच्या जीवनात येऊन ठेपला.

दासोपंताच्या जीवनातील हा महत्वाचा क्षण लौकीकाकडून अलौकीकाडे नेणारा, अध्यात्मिक जीवन प्रवास साक्षात्काराकडे नेणारा हा परिवर्तनाचा क्षण. त्यांना परमेश्वराची अनिवार ओढ लागली. आणि घरी कुणालाही न सांगता त्यांनी गृहत्याग केला.

"दासोपंत गृहत्याग करून प्रथम हिलालपूरला आले. तेथून डाकोळगी, प्रेमपूर नंतर नंदीग्राम असा प्रवास करीत मातापूर येथे आल्याचे सांगून न. शे. पोहनेरकर आपल्या दासोपंतांची पासोडी"[१५] या ग्रंथात पुढे लिहीतात की, मातापूर येथे त्यांनी दत्ताराधना केली. बारा वर्षे तप केले. तेथे त्यांना दृष्टांत आला की, राक्षसभुवनला जा. दृष्टांताप्रमाणे ते राक्षसभुवनला आले आणि तेथून डाकोळगी व तेथून वाणीसंगम येथे आले. तेथे वेगळीच घटना घडत होती. पती नाहीसा होऊन बारा वर्षे झाली. तर पत्नीने सौभाग्य दान करण्याची त्यावेळी प्रथा होती. या धार्मिक कार्यासाठी दिगंबरपंत त्यांची पत्नी व दासोपंताची पत्नी तेथे आली होती. तेथे दासोपंताची आई, वडील व पत्नी यांची भेट झाली. सर्वांना अतिशय आनंद झाला. नंतर ते अंबाजोगाईस आले.

सद्गुरूदासविरचित दासोपंत चरित्रात वेगळी माहिती मिळते. ती अशी : गृहत्याग करून दासोपंत कणकुडती येथे आले. तेथून ते मातापूर येथे आले. तेथे त्यांनी दत्ताराधना केली आणि दत्तकृपेने त्यांनी 'सिध्दराज आगम' आणि 'दत्तात्रेय महात्म्य' हे दोन ग्रंथ लिहिले. या दोन ग्रंथांचे लेखन स्थळ मातापूर आहे. हे प्रथमच कळते. ते महत्वाचे आहे. नंतर ते तीर्थयात्रेस निघाले. यात्रेत ते प्रथम प्रयाग व पुढे वाराणसी येथे आले. तेथे त्यांनी दत्तमंदीर

(१४) दासोपंताची पासोडी - ना. शे. पोहनेरकर, पृष्ठ : ८
(१५) दासोपंतांची पासोडी - न. शे. पोहनरकर, पृष्ठ : ११, १२

बांधले. नंतर तेथून गया, जगन्नाथपुरी व तेथून आयोध्देस आले. तेथे त्यांनी राममंदीर बांधले. पुढे तेथून बद्रीकेदार, हरिद्वार, द्वारावती, गोकुळ, वृंदावन, मथुरा नंतर बाराज्योतीलींग, सप्तपुऱ्या अशी यात्रा करून परत मातापूर येथे आले. तेथून वाणीसंगम येथे आले आणि जवळच असलेल्या परळी वैजनाथला त्यांचे आगमन झाले. परळी वैजनाथहून ते अंबापूर येथे आले. तेथे त्यांनी सीतोपंत देशपांडे यांना अनुग्रह दिला.(१६) अंबापूर येथे त्यांनी उर्वरित आयुष्य व्यतित केले.

दासोपंतांनी आंबाजोगाईतील वास्तव्यात मराठी वाङ्मयाचा महासागरच निर्माण केला. मराठी वाङ्मयाला समृध्द केले. समर्थ केले. गीतार्णव, पदार्णव, गीतार्थबोध चंद्रिका, ग्रंथराज इत्यादी ग्रंथ त्यांनी येथेच लिहिले. दासोपंत आणि एकनाथ हे दत्तभक्त. समकालीन, एकनाथ दासोपंतांना भेटण्यासाठी अंबापुरास आले. तसेच दासोपंतही नाथांना भेटण्यासाठी पैठणी गेले. या दोन महापुरूषांच्या भेटी अपूर्वच म्हणाव्या लागतील, आयुष्यभर त्यांनी येथेच ग्रंथलेखन केले. रोज ढब्बू पैशाची शाई लागत असे. आता त्यांचे वय ६४ वर्षाचे झाले. या महापुरूषाला आपले जीवनकार्य संपत आल्याचे कळले. हे वृत्त त्यांची पत्नी जानकीबाईंना कळले. तेव्हा त्यांनी आहेव मरण यावे म्हणून देवाची प्रार्थना केली. देवाने ती ऐकली. त्यांना आहेव मरण आल्याची नोंद सद्‌गुरूदासाने केली आहे.(१७) ही माहिती नवीन म्हणून महत्वाची आहे. त्यानंतर शके १५३७ माघ वद्य ६ राजी मध्यान्ही दासोपंतांनी महाप्रयाण केले. त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांची समाधी अंबाजोगाईच्या उत्तरेस दोन मैलावर बांधली. तेथे भजन, कीर्तन, उत्सव होतातच. दैनंदिन पूजाआरतीही होते. एक पवित्र व रम्य स्थान आहे.

**दत्तोपासक दंसोपंत**

दत्तोपासकांचे तीन सांप्रदाय आहेत. गुरूसंप्रदाय, अवधूत संप्रदाय आणि आनंद संप्रदाय. गुरु संप्रदायाचे घोषवाक्य आहे, 'श्री गुरूदेव दत्त', अवधूत संप्रदायाचे 'अवधूतचिंतन श्री गुरूदेव दत्त'आणि आनंद संप्रदायाचे 'आनंदे दत्तात्रेय देव देव' दासोपंत आनंद संप्रदायी होते. दत्तात्रेयाची मूर्ती त्रिमुखी असल्याचे सर्वश्रूत आहे. तथापि दासोपंताची आनंद संप्रदायी दत्तमूर्ती एकमुखी आहे. दासोपंताच्या आनंद संप्रदायात दत्तात्रेयाचे सोळा अवतार मानलेले आहेत. त्याच्या उत्सवाच्या निरनिराळ्या तिथ्याही ठरलेल्या आहेत. त्या अशा :

१) श्रीयोगीराज (कार्तिक शु. १५) ९) (चैत्र शु. १५)

२) श्रीअत्रीवरद (कार्तिक व. १) १०) (वैशाख शु. १४)

(१६) सद्‌गुरूदासविरचित दासोपंत चरित्र - डॉ. हरिहर मातेकर, प्रस्तावना, पृष्ठ ११ ते १७.
(१७) सद्‌गुरूदासविरचित दासोपंत चरित्र - डॉ. हरिहर मातेकर, प्रस्तावना, पृष्ठ १९.

३) श्रीदत्तात्रेय (कार्तिक व. २)
४) श्रीकालाग्नीशमन (मार्गशीष शु.७)
५) श्रीयोगीजन वल्लभ (मार्गशीष शु.१५)
६) श्रीलीलाविश्वंभर (पौष शु.१५)
७) श्रीसिध्दराज (माघ शु. १५)
८) श्रीज्ञानसागर (फाल्गुन शु. १०)
९) श्रीविश्वंभरावधूत (चैत्र शु. १५)
१०) श्रीमायायुक्तावधूत (वैशाख शु.१४)
११) श्रीमायामुक्त (जेष्ठ शु. १३)
१२) श्रीआदिगुरू (आषाढ शु. १५)
१३) श्रीशिवरूप (श्रावण शु. ८)
१४) श्रीदेवदेव (भाद्रपद शु.१४)
१५) श्रीदिगंबर (अश्विन शु. १५)
१६) श्रीकृष्णशाम (कार्तिक शु. १५)

**दासोपंतांचे समग्र वाङ्मय**

१) गीतार्णव (सव्वालाख ओव्या)
२) पदार्णव (पदसंख्या सव्वालाख)
३) गीतार्थबोध चंद्रिका (८८८९ ओव्या)
४) पंचकिरण-पासोडी (१४८७ ओव्या)
५) ग्रंथराज (ओवी संख्या १२०९)
६) ग्रंथसंग्रह
७) श्रीदत्तात्रेय माहात्म्य (ओवी संख्या ५४८)
८) अवधूतराज (ओवीसंख्या ५००)
९) प्रबोधोदय
१०) वाक्यवृत्ती (गद्यात्मक)
११) वाक्यवृत्ती (पद्यात्मक)
१२) सार्थगीता
१३) स्थूलगीता
१४) अवधूतगीता
१५) अनुगीता
१६) पंचीकरण प्रबोध

याशिवाय उपासना व पूजाविधीसाठी दासोपंतानी पुढील रचना केलेल्या आहेत.

१) दत्तात्रेय सहस्त्रनाम
२) दत्तात्रेय द्वादशनाम
३) दत्तात्रेय शतनाम
४) गीतार्थ प्रबंध स्त्रोत्र
५) शिवस्त्रोत्र
६) षोडशस्त्रोत्र
७) भक्तराज स्त्रोत्र
८) मंगलमूर्ती पूजा
९) मासिक पूजा
१०) यंत्रपूजा
११) उपकालपूजा
१२) वेदपादाख्यात
१३) षोडशयंत्र
१४) दत्तात्रेय दशनाम
१५) दत्तात्रेय षोडशनाम
१६) अत्रीपंचक

| | |
|---|---|
| १७) सिध्ददत्तात्रेय | २२) महापूजा |
| १८) गुरूस्त्रोत्र | २३) वैदिक पूजा |
| १९) सीतज्वर निवारण स्त्रोत्र | २४) सिध्दमाला |
| २०) वज्रपंजरस्त्रोत्र | २५) षोडशावतार प्रादुर्भाव स्त्रोत्र |
| २१) दत्तात्रेय नामावली | २६) षड्गुरू यंत्र |

**दासोपंतांचे संस्कृत साहित्य**

| | |
|---|---|
| १) प्रणव व्याख्या | ६) बोधप्रक्रिया |
| २) पुरूषार्थ प्रकाश | ७) अव्दैत श्रुतीसार |
| ३) गायत्रीमंत्र भाष्य | ८) गीतार्थबोध |
| ४) दत्तात्रेय महात्म | ९) दत्तात्रेय सहस्त्रनाम स्त्रोत्र |
| ५) सिद्धराज आगम | १०) उपनिषदार्थ प्रकाश |

या शिवाय ललिते, भारूडे, आरत्या संगीतशास्त्रानुसार भक्तिवेदांतयुक्त पद्दे इ.

**बहुभाषिक कवी**

दासोपंतांनी मराठी व संस्कृत या भाषांमधून ग्रंथरचना केलेली आहे. याशिवाय हिंदी, कन्नड, तेलगु या भाषांमधूनही ग्रंथरचना केलेली आहे. याचा अर्थ दासोपंत हे बहुभाषिक कवी होते..यासंदर्भात संशोधकांनी लक्ष घालायला हवे आज त्याची निकड आहे.

**दासोपंतांचे प्रकाशित वाङ्मय**

१) गीतार्णव : अध्याय १ ला, अध्याय २ रा, अध्याय १२ वा, हे पूर्ण अध्याय आणि १३ व्या अध्यायातील ३२७ ओव्या 'महाराष्ट्र ग्रंथमालेत' वि. ल. भावे यांनी प्रकाशित केले.

२) गीतार्णवाचा पहिला अध्याय अजगावकर, नाईक, आंबेवाडी (बेळगाव) यांनी प्रकाशित केला.

३) गीतार्णवाचा १८ वा अध्याय : प्रा. वा. ल. कुलकर्णी, डॉ. सुधीर रसाळ, यांनी संपादीत केला आणि औरंगाबाद येथील मराठवाडा विद्यापीठाने प्रकाशित केला.

४) गीतार्थबोध चंद्रिकेचा पहिला अध्याय अजगावकर, नाईक, आंबेवाडी (बेळगाव) यांनी प्रकाशित केला.

(१८) महाराष्ट्र सारस्वत :- वि. ल. भावे, पृष्ठ, २२५

५) गीतार्थबोध चंद्रिका प्रा. भगवंत देशमुख यांनी संपादित केला आणि औरंगाबाद येथील मराठवाडा साहित्य परिषदेने प्रकाशित केला.

६) ग्रंथसंग्रह हा ग्रंथ 'युगवाणी' च्या मे - जून १९७२ च्या अंकात प्रकाशित झाला.

७) दासोपंतांची पदे (पदार्णवातील १६०५ पदे) वामन काशिनाथ लेले यांनी प्रकाशित केली.

८) दासोपंतांची पासोडी हा ग्रंथ ना. श. पोहनेरकर यांनी संपादीत केला आणि औरंगाबाद येथील मराठवाडा साहित्य परिषदेने प्रकाशित केला.

९) दत्तमहात्म्य हा ग्रंथ मराठी संशोधन पत्रिकेतून १९७२-७३ मध्ये क्रमशः प्रकाशित झाले.

१०) पुरूषसूक्तार्थ प्रकाश हा ग्रंथ दासोपंतांचे वंशज अण्णाजी गोसावी यांनी स्वतः रचलेल्या मराठी भाषासह नागपूरहून प्रकाशित केले.

११) ईश, केन आणि कठ या तीन उपनिषदांची संस्कृतमधील भाष्ये आनंदाश्रमाच्या ग्रंथमालेतून प्रकाशित .

१२) ग्रंथराज हा ग्रंथ शंकरराव देव यांनी धुळे येथे प्रकाशित केला.

**गीतार्णवाचे एकूण स्वरूप**

'दासोपंती केला गीतार्णव मानावा सवा लाख.' असे मोरोपंत म्हणतात. असा उल्लेख सर्वच मराठी लेखक - संशोधक करतात. दासोपंतांनी हा ग्रंथ दूर डोंगरात बसून केवळ कडुलिंबाची पाने यावर राहून लिहिला, असे वि. ल. भावे म्हणतात. तथापि अ. ना. देशपांडे यांनी हा ग्रंथ आंबाजोगाई येथेच राहत्या घरी[१९] असा उल्लेख केला. असाच उल्लेख न. शे. पोहनेरकर यांनीही केलेला आहे.[२०] देशपांडे आणि पोहनेरकर यांचे उल्लेख वस्तुस्थितीला धरून आहेत. त्यासंदर्भात अधिक माहिती अशी की, अंबाजोगाई येथे दासोपंतांचे वास्तव्य असलेल्या 'देवघरी' एक लादणी आहे. त्या लादणीतच एकांतात दासोपंत आपले ग्रंथलेखन करीत असत. ती लादणी अजुनही आहे. दासोपंताचे वंशज ती अजूनही दाखवतात.

गीतार्णव ही गीता टीका आहे. ती कृष्णाने कुरूक्षेत्रावर अर्जुनाला सांगितली. अर्जुन कुरूक्षेत्रावर प्रतिपक्षात आप्तेष्ट पाहून किंकर्तव्यमूढ होतो. त्याची ती संभ्रमावस्था दूर करून त्याला युध्दप्रवृत्त करण्यासाठी कृष्णाने अर्जुनाला गीता सांगितली. त्यात शाश्वत तत्वज्ञान

---

(१९) प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास, भाग ४ - अ. ना. देशपांडे, पृष्ठ २१४.

(२०) दासोपंतांची पासोडी - न. शे. पोहनेरकर, पृष्ठ १९.

आहे. भारतीय आणि पाश्चात्य विचारवंतही त्याने प्रभावित झाले. अहिंसावादी, सशस्त्र क्रांतीवादी आणि धर्मपंडित या सर्वांनाच गीतेतील तत्वज्ञान महत्वाचे वाटते. प्रेरणादायक वाटते. असा हा अमर ग्रंथ. अक्षर साहित्य. प्राचीन आणि अर्वाचिन विद्वानांनी गीतेवर टीका लिहिलेल्या आहेत. ज्ञानेश्वरांची ज्ञानेश्वरी, दासोपंतांचा गीतार्णव, वामन पंडितांची यथार्थदीपिका विशेष महत्वाच्या आहेत. ओवी संख्येच्या दृष्टीने पाहिले तर ज्ञानेश्वरीची ओवी संख्या ९ हजाराच्या आसपास आहे. गीतार्णवाची सव्वालाख, तर यथार्थदीपीकेची २२ हजाराहून अधिक आहे. हे पाहिले म्हणजे गीतार्णव हे केवळ गीताभ्यासच नव्हे तर महाभाष्य आहे असे म्हणावे लागते. एवढा प्रचंड ग्रंथ मराठीत पहिला व एकमेव असावा.

गीतार्णवात श्रीकृष्णाने सांगितलेले तत्वज्ञान आहे. पण दासोपंतांच्या गीतार्णवाच्या लेखनामागील प्रेरणा दत्तात्रेयाची आहे. कारण दासोपंत हे दत्तभक्त होते. दत्तात्रेयावर त्यांची अपार निष्ठा होती. ती त्यांची प्रेरक शक्ती होती. म्हणूनच ते म्हणतात-

बुद्धी म्हणिजे ज्ञान - निश्चयो ते तेणे करून ।
श्रीदत्ते एकेविण - येर न मने ॥ १-११९ ॥

या संदर्भात ते पुढे म्हणतात :

गीता हे तुझीची स्वानुभूती - आणि मत्प्रज्ञा तुझी ज्ञप्ती ।
श्री अवधूता स्वयंज्योती - प्रकाशतासी ॥ १-८८ ॥
श्री अवधूताचे स्मरणे - बोधला अर्थु स्वानुसंधाने ।
तो आत्मबुध्दी बोधणे - आपुलिया मना ॥ १-११७ ॥

अशा प्रकारे दासोपंतांनी गीतार्णवाच्या पहिल्या अध्यायातच आपल्या गीतार्णवाच्या लेखनामागील प्रेरणा दत्तात्रेयाची असल्याची स्पष्ट केले आहे. म्हणूनच ते असे वर्णन करतात:

पृथ्वीच्या ठायी हारपले - ते जीवने वटबीजे स्पर्शिले ।
आताच ते हारपे की पहिले - आपण नव्हे ॥
पालवापुढे पालव - घेऊच लागले धाव ।
मग आपली मर्यादा तव - झाड विस्तारले ॥
तैसे हे माझे ज्ञान - विषय् भूमिकेत लीन ।
तेथे तुझे कृपाजीवन - पावले ते ॥
आता कैसे अच्छादैल- आता कैसे न फुलैल
यालागी बृध्दीचे बल - अनावर जाले ॥

अशा प्रकारे मातीत पडलेल्या वटबीजाला जलस्पर्श होताच बीज नाहीसे होते व त्यातून प्रचंड वटवृक्ष निर्माण होतो. विस्तारतोही. तसेच दासोपंतांच्या ज्ञानरूप बीजाला

दत्तकृपाजलाचा स्पर्श होताच गीतार्णव निर्मितीचे अनिवार स्फुरण उदयास येते व प्रचंड गीतार्णव अवतरतो. खरे तर येथे दासोपंतांनी वाङ्मय निर्मितीची प्रक्रियाच सांगितली आहे. दासोपंत हे नि:सीम दत्तभक्त. भक्ती हेच त्यांचे जीवन सर्वस्व. भक्तीमयता हीच भक्ताची खरीखुरी ओळख असते. अशी भक्ती श्रेष्ठ असते. त्यापुढे परमेश्वर प्राप्तीही गौण ठरते. यासंदर्भात दासोपंत म्हणतात :

तुझिया भक्तीसाठी - हिताहित न पाहे दृष्टी ।
नापेक्षी तुझी भेटी - जरी भक्ती सुटे ॥

अशा प्रकारे दासोपंतांच्या दृष्टीने परमेश्वराच्या भेटीपेक्षाही भक्ती श्रेष्ठ आहे. त्यात एक अपूर्व समाधान आहे. आनंद आहे.

दासोपंतांनी गीतार्णव सर्वसामान्यासाठी लिहीला आणि येथील सामान्यांची लोकभाषा मराठी. म्हणून त्यांनी मराठीतच ग्रंथरचना केली. पण तत्कालीन संस्कृत पंडितांना ते रूचत नसावे. ते त्यांची उपेक्षा करीत. तरीही त्यांनी आग्रहपूर्वक मराठीतच आपले लेखन केले. यासंदर्भात दासोपंत म्हणतात ते, असे

प्राकृत म्हणौनि दूषिती - तेचि यया ज्ञाना वंचिती ।
भाषाच केवळ भजती - ते मूर्ख की ना ॥
संस्कृत बोलणे सेवणे - तेचि सांडावे प्राकृत वचने ।
ऐसिया मूर्खा मुंडणे - किती आता ॥ (अध्याय दुसरा)

अशा तिखट भाषेत त्यांनी संस्कृत पंडिताविषयी आपली प्रतिक्रिया व्यक्त केली. त्यातून मराठीचा अभिमानही व्यक्त होतो आणि संस्कृतचे प्रस्थ मोडण्याचा प्रयत्नही दिसून येतो. तरीही ते संस्कृत भाषेचा द्वेष करीत नव्हते. कारण ते जाणत होते की, भाषा हे अभिव्यक्तीचे एकमेव माध्यम आहे. तिची उपेक्षा करता येत नाही. भाषेतून व्यक्त झालेले विचार समजून घ्यावेत व त्यातून जे चांगले असेल त्याचा स्वीकार करावा. संस्कृत हीही एक भाषा आहे. या संदर्भात ते म्हणतात.

संस्कृत असती ग्रंथ - तयाचे जाणावे मत ।
ऐसे जे आर्त - उपजेचिना ॥
तरीचि ते अभ्यासावे - अभ्यासूनि तत्व जाणावे ।
मग शब्द अवघे सांडावे - न व्हावे असक्त ॥

अशी त्यांची भूमिका होती. तरी ते गतानुगतिक नव्हते. स्वतंत्र वृतीचे होते. 'बाबा वाक्यम् प्रमाणम्' मानणारे नव्हते. यामुळेच या क्षेत्रातील पूर्वसूरींचा - भाष्यकारांचा उल्लेख

करण्याची रीती त्यांनी अनुसरली नाही. 'भाष्यकारते वाट पुसतु' जाणे त्यांना मान्य नव्हते. या संदर्भात त्यांची भूमिका स्पष्ट होती. परखडही होती. ती अशी:

न पाहे श्रोतयाचे वदन - नकरी भाष्या धारे विवरण।

स्वस्वानुभवचि येथीचे प्रमाण - म्हणौनि संवादी ॥

स्वानुभवचि येथ प्रमाण - स्वानुभव हेचि साधन ॥

अन्यत्र शास्त्र श्रवण - तैसे हे नव्हे ॥ (अध्याय दुसरा)

वाङ्मयाच्या 'स्वानुभव -स्वानुभूती' संबंधीचा हा विचार आजचे समीक्षकही मान्य करतात. हाच विचार दासोपंत पंधराव्या शतकात मांडतात, याला महत्त्व आहे. तसेच त्यांनी आपल्या वाङ्मयाचे प्रयोजनही सांगितले आहे. ते असे :

तरी साहित्याचेनि अंगे - परमार्थ बोलेन प्रसंगे।

यथामती अहंत्यागे - अवधूत स्मरणे ॥ (अध्याय पहिला)

आपल्या 'परमार्थ बोलेन प्रसंगे' हा त्यांचा विचारही लक्षात घेण्यासारखा आहे. तो औचित्यपूर्ण आहे. औचित्यविचार हा साहित्यातील महत्त्वाचा विचार आहे. दासोपंतांनी हा विचारही पंधराव्या शतकात मांडला आहे. हेही लक्षात घेण्यासारख्या आहे.

गीतार्णवात तत्वज्ञान अनुस्यूत आहे. हे तत्वज्ञान भक्तीचे आहे. परमार्थाचे आहे आणि ते भक्तिच्या परमार्थाच्या परिभाषेत मांडले आहे. अर्थातच त्याची दृष्टी व्यापक - विशाल आहे. यासंदर्भात दासोपंत म्हणतात:

एवं शुध्द त्वं पदार्थु निखळु - तोचि अर्जुनु योद्धा सबळु।

तया सारथी गोपाळु - परमात्मा तो ॥ (१-९८)

आणि

शुद्ध तत्पदार्थु परमात्मा - तोचि श्रीकृष्णु विज्ञानात्मा।

ऐसिया दोघा उपमा - कासयाचि ॥ १-१०३ ॥

अशा परमार्थाच्या परिभाषेत बोलतात.

गीतार्णवाचा सोळावा अध्याय पहात असताना त्यात कुठेही संदिग्धता दिसत नाही. सर्वत्र स्पष्ट विवेचन आहे. तेही स्वतंत्रपणे. योग्याच्या संदर्भात ते असे वर्णन करतात:

ज्ञानयुक्तु योगी सुभटा - तेथे जे मी नित्यनिष्ठा।

अभये सत्वशुद्धीचिया वाटा - भेटती ते ॥ १६-१२७ ॥

ज्ञान शब्दे सांख्यु जाण - योगु तो योगु साधन।

या दोन्हीपेक्षा येकपण - ऐसी जे निष्ठा ॥ १६-१३७ ॥

असे शुद्ध ज्ञान, योग आणि त्यावरील निष्ठा यांनी युक्त असलेला ज्ञानयोगी, त्यालाच सत्वशुद्धीचा मार्ग दिसतो. तसेच ज्ञान या शब्दाला सांख्य अनुस्यूत आहे. ज्ञान आणि योग हे वेगळे नाहीत तर त्यात एकत्व आहे, अशी त्यांची एकत्वाची दृष्टी आहे. हा ज्ञानयोगी कसा, तर -

परदुःखे दुखवणे - परसुखे सुखी होणे ।
एकात्मतेची चिन्हे -सहज ऐसी ॥ १६-२६७ ॥

असा योगी जीवनोन्मुख दृष्टीचा आहे. दासोपंत दैवी आणि असुरी संपदेवर भाष्य करताना खूप विस्तार करतात. विशेषतः असुरी संपदेच्या संदर्भात ते म्हणतात.

पोटार्थ केले ब्राह्मणी - न करु आम्ही ऐसी करणी ।
पूर्वील वेद सत्य मानी - तोही मुर्खू ॥ १६-१०५८ ॥
मना आवडे ते करावे - भोगा आले ते भोगावे ।
पाप पुण्य तेणे नव्हे - पशुचि ऐसे ॥ १६-१०९५ ॥
सकळ कामु भोगावा - हाचि पुरुषार्थ जोडावा ।
इतुलाचि परमार्थ आघवा - तया असुरांचा ॥ १६-१७९८ ॥

असे सांगतात आणि दैवी संपदेच्या संदर्भातः

मोक्षधर्मु वर्णधर्मु - आश्रमधर्मु कुलधर्मु ।
आर्यधर्मु लोकधर्मु - देशपरत्वे ॥ १६-१८२ ॥

दासोपंत वर्णधर्म, आश्रमधर्म, कुलधर्म आणि मोक्षधर्म सांगतात व त्याबरोबरच देशपरत्वे असलेल्या लोकधर्माचाही आवर्जून उल्लेख करतात हे लक्षात घेतले पाहिजे. महत्त्वही जाणले पाहिजे.

## लेखनकाळ

दासोपंतांनी आपल्या ग्रंथात कुठेही लेखनकाळाचा उल्लेख केलेला नाही. तरीही सद्गुरुदासाने आपल्या 'दासोपंत चरित्रा'त मातापूर येथे 'सिद्धराज आगम' व 'दत्तात्रेय माहात्म्य' लिहिल्याने नमूद केले आहे. (२१) हा काळ शके १४८५ ते १४८८ आहे. या काळात त्याने हे वरील दोन्ही ग्रंथ लिहिले. नंतरचे त्यांनी अंबापूर येथे जीवन व्यतीत केले. त्यांचे अंबापूरातील वास्तव्य शके १४८८ ते १५३७ पर्यंतच होते. या कालखंडात त्यांनी आपले ग्रंथ लिहिले असा निष्कर्ष निघू शकतो.

(२१) सद्गुरुदासविरचित दासोपंत चरित्र - डॉ. हरिहर मातेकर, प्रस्तावना, पृष्ठ १२

## वैशिष्ट्य

ज्ञानेश्वरी, गीतार्णव आणि यथार्थदीपिका या मराठीतील तीन गीता टीका महत्त्वाच्या आहेत. ओवीसंख्येच्या दृष्टीने गीतार्णव हा प्रचंड विस्तार असलेला ग्रंथ आहे. असा हा ग्रंथ एकमेव व पहिलाच असावा. हे एक वैशिष्ट्य म्हणावे लागेल. दुसरे म्हणजे त्यांचा मराठीचा अभिमान. मराठी ही संस्कृतपेक्षा समर्थ-संपन्न असल्याचे ते सांगतातच. त्याशिवाय संस्कृतचे पुरस्कर्ते स्वार्थी, दुटप्पी असल्याचेही नमूद करतात. या संदर्भात-

अर्थार्थु जनु पंडितु - तोही अर्थु साधता पहातु ।
मग प्रसंगाचेनि आणीतु - आपुले संस्कृतु ॥
आता आला रुका पुरे - मग सांडी संस्कृत उत्तरे ।
प्राकृत वाणी विचरे - संसारमार्गे ॥ (अध्याय पहिला)

अशा प्रकारे अर्थार्जनासाठी संस्कृतचा पुरस्कार करतात आणि व्यवहारात मात्र प्रकृत बोलतात. असा हा दुटप्पीपणा आहे. तसेच-

यया संस्कृताचा अभिमानु - तेणेचि नाशिला हा जनु ।
पुढे येणे करुनु - विनाशु असे ॥ (अध्याय दुसरा)

असा इशाराही देतात. या संदर्भात ते एक कथा सांगतात. दोन भाऊ होते. एक संस्कृतचा अभिमानी, तर दुसरा मराठीचा. यासंदर्भात त्यांचा वाद होत असे. त्यात मराठी अभिमानी भावाचे मत त्याच्या संस्कृत अभिमानी भावाला पटते. मग तोही मराठी बोलू लागतो. मुळात नसलेली ही कथा स्वतंत्र आहे. ती तत्कालीन परिस्थितीच्या संदर्भात महत्त्वाची आहे, तशीच ती वर्तमानकाळाच्या संदर्भातही महत्त्वाची म्हणावी लागेल. (अध्याय दुसरा) हेही एक वैशिष्ट्य म्हणावे लागेल.

मुळाला धक्का न लावता त्यांनी केलेला प्रचंड विस्तार हेही त्यांच्या भाष्याचे वैशिष्ट्य म्हणावे लागेल. गीतार्णवाच्या दुसऱ्या अध्यायात श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतोः

तू क्षत्रियांमाजी अग्रिकु - पूर्ण प्रतापाचा अर्कु ।
अरि वर्ग गर्व ग्रासकु - महावीरु ॥
संग्रामाविषयी चतुरु - अपराजित महामेरु ।
क्षेत्री वर्णीतु बडिवारु - तया तुझा ठायी ॥
संग्रामी स्वधर्मु क्षत्रियाते - स्वर्गी पवित्रे तेणे मते ।
हे विघ्नकर जाण येथे - समयी वोडवले ॥
पूर्वील हारपे आख्या - वर्तमानी नेदी सौख्या ।

कारण होईजे मौर्ख्या - भर्वसेनि ॥
अवघी जोडिली हारपावी - कीर्ती पुढे न व्हावी ।
अकीर्ती जोडी जोडावी - तरी हे असो ॥

अशी दासोपंताची भाष्यपद्धती वेगळी आहे. त्यातील विस्तार प्रसंगाकुल असल्यामुळे शोभून दिसतो. त्यात अर्जूनाला युद्ध प्रवृत्त करण्यासाठी त्याचे पूर्वी शौर्य, कीर्ती यांचे केलेले वर्णन अपरिहार्य आहे. ते मुळात असणे असंभव होय.

गीतेवर भाष्य करताना ते कधी कधी स्वतंत्र असते, तरी त्याचा विस्तार स्वाभाविक वाटतो आणि भावपूर्णही वाटतो. कुरुक्षेत्रावर शत्रुपक्षात आप्तस्वकीय पाहून, त्यांना मारण्यास, त्यांच्या आत्मीयतेमुळे, अर्जुनाचे मन तयार होत नाही. ही अर्जुनाची मनःस्थिती 'पुत्रा' वरील भाष्यात प्रगट होते. ते असेः (अध्याय पहिला)

येक कुमर धाकुले - मन देखता उपजले ।
कडी खांदी घेतले - माया मोहे ॥
येक पात्री भोजन - ग्रासा पसरिती वदन ।
जैसी पक्षिणीची जाण - सात पिले ॥
घालुनी पदरी पिळा - आळी घालीती गोपाळा ।
आजवरी पाळीला - लळा जयाचा आम्ही ॥
तयाते आम्ही मारावे - तेही कवणाप्रती सांगावे ।
मग पडे बुझवावे - आपणातेचि ॥
नाम घेऊनि आळविती - तोचि विश्रांती होये चित्ती ।
धावोनि गळा झोंबती - तै कैसे मारावी ॥
आठवी क्रीडा तयाची - बालभाषा बळकांची ।
असूनी धाकटीचि - ऐसी वाटती ॥
आपला मोहो पुत्रावरी - तैसेचि पिताराचा आपणावरी ।
येणे अनुभवे श्रीहरी - जाणावा तो ॥
पुत्र होतचि यादवा - कैसा संतोषी जीवा ।
आता अविघ्न वाढावा - हेचि वासना ॥
कै शिकेल हा चालो - कै शिकेल हा बोलो ।
कै शिकेल हा खेळो - लेकरांमाजी ॥
कै हा आळी करील - भाणाचे आळी नासैल ।
धुळी भरला कै येईल - खेळोनि हा ॥

ही केवळ अर्जुनाची मनःस्थिती नाही, तर त्यातून पुत्रवात्सल्य, कळवळा आणि कारुण्य व्यक्त झालेले आहे. मुळात असे वर्णन शक्य नाही, अवसरही नाही. कारण तो तत्वज्ञानाचा ग्रंथ आहे. प्रस्तुत भाष्यात मूळ हेतु व अर्थ यांना धक्का न लावता भावना व्यक्त करण्यासाठी दासोपंत अशी स्वतंत्र रचना करतात. ती प्रसंगानुकुल, रमणीय आणि हृदयस्पर्शी आहे; याची प्रचिती येते. हे एक आगळे वेगळे वैशिष्ट्य म्हणावे लागेल.

दासोपंत बाराव्या अध्यायात भक्ताचे स्वतंत्रपणे वर्णन करतात. ते असेः

ऐसा नव्हे जो अर्जुना -निरपेक्षु काही मागेना ।
आणि पीडा काही जना - कल्याण इच्छी ॥
अपेक्षा न करी काही - मागतया नेदी हे नाही ।
परहिता लागे जाणई - वेचि देह ॥
संदेह फेडी इतरांचा -उद्वेगु हारी मनुजाचा ।
ऐसा मूर्तु आनंदाचा - कल्लोळ जो ॥
सर्वदा हास्य वदनु - अपीडकु वरी सुप्रसन्नु ।
जया देखताचि जनु - विसरे श्रमती ॥
सत्यवादी शुभवादी - प्रियवादी हितवादी ।
आंगे साहे परी नेदी - उपद्रोकवणा ॥

असा हा भक्त परहितवादी, जनहितवादी, सत्यवादी, शुभवादी, असा जीवनोन्मुख आहे.

मूळ तत्वविचाराला डावलून दासोपंत विवेचन करीत नाहीत, पण त्याचा विस्तार करतात. तो जसा प्रासंगिक असतो तसाच शाश्वतही असतो. उदाः- पहिल्या अध्यायात कुरुक्षेत्रावर आपल्या पुत्राची काय अवस्था झाली याविषयी धृतराष्ट्राला चिंता वाटू लागते. तेव्हा दासोपंत 'चिंता' या विषयावर स्वतंत्र विचार व्यक्त करितात, तो असाः

चिंता पुरुषाचे बंधन - चिंता जीतचि मरण ।
चिंता सुखाचे छेदन - दुःख दाती ॥
चिंता हृदयीचा रोगु - चिंता नाशी परम योगु ।
आंगी लागला सुखभोगु - भोगु नेदी ॥
इंद्रियाचे करि शोषण - देहावरी नये मन ।
चिंता भ्रमवी मन - नेदी विश्रांती ॥
चिंता हृदयीचा अंधकारु - चिंता हा कृष्णु विखारु ।

चिंता नाशी तोचि गुरु - संसार माता ॥
बाह्यतरी व्याकुळता - पुरुषा आणि चिंता ।
चिंता सागरी बुडता - दुजे न पवे ॥
भक्षिता न कळे अन्त - न कळे बोलता वचन ।
आईकताचि श्रवण - बधीर होती ॥
आंगा खुपे शेज - गंधून कळे जाणीज ।
डोळा देखीले मनुज - वोळखेना ॥
आगीवीणा चिंता जाळी - सुखांशु अवघा गिळी ।
चिंता ऐसे भूमंडळी - दुष्ट नाही ॥

हे भाष्य धृतराष्ट्राची चिंतेमुळे झालेली अवस्था व्यक्त करते. म्हणून प्रासंगिक, पण कोणत्या काळी, कोणत्या व्यक्तीची अशीच अवस्था होऊ शकते. म्हणून तिचे स्वरुप शाश्वतही आहे. हेही तेवढेच खरे. हाही एक विशेष म्हणावा लागेल.

**प्रकाशित करण्यामागील प्रेरणा**

दासोपंत हे मराठी साहित्यातील महान कवी. एवढी प्रचंड ग्रंथ रचना करणारा मराठीतील हा एकमेव कवी. तत्वज्ञानात्मक ग्रंथातही स्पष्टीकरणार्थ कथा रचना करणे. हाही एक विशेष आहे. ते संगीतज्ज्ञ कवीही होते. त्याचप्रमाणे चित्रकलाही त्यांच्या वाङ्मयाचा एक महत्त्वाचा पैलू होता. ते तत्त्वचिंतक कवी होते. अशा विविध पैलूंनी नटलेले वाङ्मय आणि त्याचा निर्माता उपेक्षित रहावा, हे दुर्दैव म्हणावे लागेल. त्यांचे समग्र वाङ्मय प्रकाशित झालेले नाही. खरे तर दासोपंतांचे समग्र वाङ्मय प्रकाशनाचा प्रकल्प हाती घ्यायला हवा. निदान गीतार्णवाच्या संदर्भात असा प्रयत्न केला पाहिजे. अखिल भारतीय साहित्य संमेलनात यासंदर्भात अनेक वेळा ठराव पास झाले. पण काम झाले नाही. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ पुरस्कृत "मराठवाडा प्राचीन साहित्य संशोधन प्रकल्प" मान्य झाला. पण दुर्दैवाने त्याचे अध्यक्ष न. शे. पोहनेरकर यांचे निधन झाले आणि काम रखडले. शेवटी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने गीतार्णवाच्या १५, १६ आणि १७ या अध्यायांच्या संपादनास मान्यता दिली, त्याप्रमाणे १६ वा अध्याय संपादित होत आहे. गीतार्णव प्रकाशित व्हावा हिच यामागील प्रेरणा आहे.

**प्रमाण प्रत**

संपादक मंडळास अंबाजोगाई येथील दासोपंताचे वास्तव्य होते, त्या 'देवघरी' त्यांच्या विद्यमान वंशजाकडून गीतार्णवाच्या १६ व्या अध्यायाची हस्तलिखित प्रत मिळाली. तत्पूर्वी नागपूर, चंद्रपूर परळी येथे त्यांच्या वंशजाकडे हस्तलिखित मिळेल म्हणून प्रयत्न केले. त्यांचेकडे हस्तलिखित प्रत नसल्याने ते मिळू शकले नाही. धुळे येथे हस्तलिखित असल्याचे कळले. धुळे येथे समर्थ वाग्देवता मंदिरात संपादकांपैकी डॉ. चंद्रकांत देऊळगावकर आणि डॉ. हरिहर मातेकर गेले होते. पण तेथेही १६ वा अध्यायच हस्तलिखित उपलब्ध नव्हते. तेव्हा मग अंबाजोगाई येथील 'देवघरी' उपलब्ध झालेली हस्तलिखित प्रतच प्रमाण मानली. कारण ती एकच प्रत उपलब्ध होती. त्यामुळे पाठभेदाचा प्रश्नच निर्माण झाला नाही.

**गीतार्णव : १६ वा अध्याय**

**भाषिक वैशिष्ट्ये**

दासोपंतांनी शके १६०० ते शके १६१० मध्ये गीतार्णव लिहिला असावा असा उल्लेख डॉ. गो. मु. मोहोळकर यांनी केलेला आहे[२२]. तथापि दासोपंताचे अंबाजोगाईतील वास्तव्य शके १४९७ ते शके १५३७ या कालखंडात होते. हे आपण यापूर्वी पाहिले आहे. याचा अर्थ असा की, गीतार्णव याच कालखंडात लिहला असावा. दुसरा मुद्दा डॉ. मोहोळकर यांनी मांडला तो भाषिक कालखंडाचा. ते म्हणतात वाङ्मयीन प्रवृत्तीवरुन भाषिक कालखंड पाडावेत. म्हणून दासोपंताच्या कालखंडाला 'नागरभाषा कालखंड' म्हणावयास हरकत नाही.[२३] तसेच या कालखंडाला संस्कृत- फार्सी-मराठी साहचर्य व विरोध कालखंड अशा अर्थाचे सुटसुटीत नाव देता येईल.[२४] या दृष्टीने प्रा. रा. श्री. जोग यांनी 'मराठी वाङ्मयाभीरुचीचे विहंगावलोकन'[२५] हा ग्रंथ लिहीला आहे. तो महत्वाचा आहे. या संदर्भातील डॉ. मोहोळकर यांचा विचारही दुर्लक्षित होऊ नये.

(२२) दासोपंतकृत गीतार्णव-१८ वा अध्याय : एक भाषिक अभ्यास-डॉ. मोहोळकर, पृष्ठ-५
(२३) दासोपंतकृत गीतार्णव-१८ वा अध्याय : एक भाषिक अभ्यास-डॉ. मोहोळकर, पृष्ठ-८
(२४) दासोपंतकृत गीतार्णव-१८ वा अध्याय : एक भाषिक अभ्यास-डॉ. मोहोळकर, पृष्ठ-९
(२५) मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगावलोकन - प्रा. रा. श्री. जोग.

येथे दासोपंतकृत गीतार्णवातील १६ व्या अध्यायाची भाषिक वैशिष्टये अभिप्रेत - ती अशी :

**स्वर प्रक्रिया**

अ :-अ > आ :

आंग < सं.अंग, पाद < सं.पद

अ > उ, ऊ

धर्मु < सं. धर्म, पुत्रु < सं. पुत्र

अ > ए

प्रेत्नु < सं. प्रयत्न, येत्नु < सं. यत्न

अ > ओ

चित्तो < सं. चित्त, द्रोहो < सं. द्रोह

लयो < सं. लय, सुर्यो < सं. सुर्य

इ, ई

ई > इ

जिउ < सं. जीव

दिक्षित < सं. दीक्षित

उ, ऊ

ऊ > उ

दुषण < सं. दूषण, मुर्ख < सं. मूर्ख,

पुजन < सं. पूजन, पुर्व < सं. पूर्व.

ऊ > व

जिऊ < सं. जीव

ऐ > अई :

ऐ < म. अईक

ओ > व

वोळख < म. ओळख

अशा प्रकारे दासोपंतांच्या गीतार्णवातील १६ व्या अध्यायात अ >आ, अ >ऊ, अ > ए, अ > ओ; आणि आ > अ, ई > इ, ऊ > उ, ऐ > अई तसेच ओ > व अशी स्वर प्रक्रिया झालेली दिसून येते.

'ऋ' ची प्रक्रिया पुढीलप्रमाणे दिसून येते.

ऋ

ऋ > अ : मऊ < सं. मृदु

ऋ > आ : धार < सं. गृध

ऋ > इ : गिध < सं. गृध

जावाई < सं. जामातृ

तीज < सं. तृतीय

विंचू < सं. वृश्चिक

ऋ > उ : अत्रुप्त < सं. अतृप्त

ऋ > र:

घर < सं गृह

ऋ > रू:

त्रुण < सं. तृण

रूषी < सं. ऋषी

गीतार्णवाच्या सोळाव्या अध्यायात 'य' श्रुती, 'व' श्रुती आणि स्वर संक्षेप यांची उदाहरणे अल्प दिसून येतात. ती अशी :

| 'य' श्रुती | 'व' श्रुती | स्वर संक्षेप |
|---|---|---|
| पाय < सं. पद | ओवळे < सं. अमंगल | जिणे < सं जीवन |
| माय < सं. मातृ | चेव < सं. चेतन | जेथे < सं. अत्र |
| येर < सं. इतर | परावार < सं. परका | तेथे < सं. तत्र |
| | | दही < सं. दधिकम् |
| | | दिवाळी < सं. दीपावली |
| | | दुजा < सं. व्दितीय |
| | | नेणे < सं. नसती |
| | | मोठे < सं. महत्तर |
| | | मोल < सं. मूल्यम् |
| | | शेन < सं. शच्या |

**संधी**

दासोपंतांच्या गीतार्णवातील सोळाव्या अध्यायात काही ठिकाणी संधी न होताच ते शब्द समोरासमोर ठेवलेले आढळून येतात. उदा.-

| | | |
|---|---|---|
| आत्मा इतर | गुण अवगुण | सर्व आत्मा |
| आत्मा उपासना | वर्ण आश्रम | सुर असुर |

**व्यंजन प्रक्रिया**

गीतार्णवाच्या १८ व्या अध्यायात 'थ' साठी 'छ' वापरलेला आढळत नाही. असे डॉ. मोहळकरांनी नमूद केले आहे.[२६] तथापि आम्ही प्रमाण मानलेल्या १६ व्या अध्ययाच्या हस्तलिखित प्रतीत 'थ' साठी 'छ' वापरलेला आढळतो. उदा.

| | |
|---|---|
| अवस्छा < सं. अवस्था | स्छानी < सं. स्थान |
| अस्छीखंड < सं. अस्थीखंड | व्यवस्छा < सं. व्यवस्था |
| गृहस्छू < सं. गृहस्थ | स्छुळू < सं. स्थुल |
| स्छान < सं. स्थान. | |

(२६) दासोपंतकृत गीतार्णव : १८ वा अध्याय : एक भाषिक अभ्यास - डॉ. गो. मु. मोहोळकर, पृष्ट - १४

गीतार्णवाच्या १६ व्या अध्यायात 'व' साठी 'ॐ' उपयोगात आलेला आढळतो. उदा.

अभा ॐ < सं. अभाव

हा ॐ < सं.ठाव

भाॐ < सं. भाव

**श > स** : उदा.

सेज < सं. शय्या

**ष > ख** : उदा.

पाषांड < सं. पाखंड

विश्व < सं. विष

सदभाॐ < सं. सद्भाव

स्वभाॐ < सं. स्वभाव

**महाप्राण : ह**

गीतार्णवाच्या सोळाव्या अध्यायात शब्दांतर्भागी 'ह' हा महाप्राण आलेला आढळतो. उदा. कण्हण, माण्हवला, होण्हर.

**सर्वनामे**

प्र. पु. : म्या

द्वितीय पु. : त्वा

तृ. पुरुष : त्ये

मराठवाड्याच्या बोलीभाषेत ही सर्वनामे रूढ आहेत.

**भाववाचक नामे**

गीतार्णवाच्या सोळाव्या अध्यायात 'त्व', 'ता', 'पण' आणि 'य' हे प्रत्यय लागून भाववाचक नामे आलेली आढळून येतात. उदा.

| त्व | ता | पण | य | |
|---|---|---|---|---|
| मूर्खत्व | कृपणता | निष्ठुरपण | अमोल्य | धिम्य |
| ममत्व | दरिद्रता | मृदूपण | डांब्य | मौर्ख्य |
| सिद्धत्व | मधुरता | लटिकेपण | डांभ्य | सौर्ख्य |
| | वक्रता | | तारूण्य | |

### शब्दसंग्रह

दासोपंतकृत गीतार्णवाच्या सोळाव्या अध्यायातील शब्दसंग्रह वैशिष्ट्यपूर्ण आहे. अध्यात्मिक आणि ऐहिक जीवन त्यात दिसून येते. म्हणूनच त्यात सृष्टीनिर्माता ब्रह्मदेव, पालनकर्ता विष्णु, लय करणारा महेश आहेत. तसेच सत्व, रज, तम ह्या तीन प्रवृत्ती आणि षडरिपुंचाही त्यात समावेश आहे. त्याच प्रमाणे धर्म-अधर्म, पाप-पुण्य, गुरू-शिष्य व उपासना त्यात दिसून येतात. गीतार्णव हे गीता भाष्य असल्यामुळे कृष्णार्जुन अपरिहार्यच आहेत. ऐहिक जीवनाच्या संदर्भातही हा शब्दसंग्रह महत्वाचा आहे दिवस-रात्र-प्रहर. आयुष्याच्या तीन अवस्था आणि नातेविषयक शब्दही त्यात समाविष्ट आहेत. मनुष्येत्तर प्राणी आणि जीवनावश्यक धान्य हेही त्यात दिसून येतात. हा शब्दसंग्रह पुढीलप्रमाणे आहे.

**१) देव-धर्मविषयक**

अ) कृष्ण, ब्रह्मा, महेश, रुद्र, वासुदेव

आ) अर्जुन, कुंतीनंदन, गुडाकेश, धनंजय, पार्थ

इ) आत्मां, उपासना, गुरू, ध्यान, पूजन, शिष्य

ई) अधर्म, धर्म, निःपाप, पाप, पुण्य

**२) वर्ण विषयक**

ब्राह्मण, वेश्य, शूद्र, क्षत्रीय

**३) वृत्ती प्रवृत्तीविषयक**

अ) तम, रज, सत्वा.

ब) काम, क्रोध, दर्प, दंभ, मत्सर, मद, मोह.

**४) आयुष्य - अवस्थादर्शक**

तारूण्य, बालपण, वृध्दावस्था.

**५) नातेदर्शक**

कन्या, पत्नी, पिता, पुत्र, बंधु, माता, मित्र

**६) दिवस - प्रहरदर्शक**

अ) दिवारात्रौ, रात्रौदिवा

ब) प्रातःकाळ, माध्यान्ह, सायंकाळ

**७) व्यवसायदर्शक**

उद्यम, कृषी, वाणिज्य, व्यापार

८) धान्यदर्शक

अ) उडीद, कुळीथ, गोधूम, तांदुळ, मुग्द

ब) मिरे, राई, लसूण

९) दुग्धजन्यपदार्थदर्शक

घृत, तक्र. दधी.

१०) चतुष्पादप्राणी

अश्व, गज, गाय, घोडा, घोडी, जंबुक, मृग, महीष, रोडी, व्याघ्र

११) उडणारे प्राणी

कावळा, गरूड, घार, पाणकावळा, बक

१२) इतर प्राणी

इंगळी, पाल, भुजंग, मासा, वृश्चिक, विरोळा, सरडा, साप.

१३) जीवनधारक

अवनी, अंबर, उदक, धरणी, पवन, सूर्य.

शैली आणि अन्वयार्थ

गीतार्णव हा एक प्रचंड ग्रंथ असला तरी त्याची बांधणी व्यवस्थीत आहे. विस्तार आहे पण विस्कळीतपणा नाही. एक शिस्त आहे. तसेच शैलीतही एक अनुसंधान आहे. अध्यायाचा प्रारंभ करताना, दासोपंत, पुर्वीच्या अध्यायातील तत्वविचार आणि शेवट सांगून नवीन अध्याय सुरू करतात. लेखनातील हे अनुसंधान दाखल्यामुळे विवेचनात खंड पडत नाही, तसेच त्यातील सातत्य सारखे जाणवत रहाते. हे त्याचे शैलीचे वैशिष्ट्य म्हणावे लागेल. दुसरे म्हणजे वर्ण्य विषय सुलभ व्हावा म्हणून ते अधून मधून एखादी स्वतंत्र कथाही सांगतात. उदा. संस्कृत-मराठीच्या संदर्भात ते दोन भावांची कथा सांगतात. त्यातील एक भाऊ संस्कृतचा अभिमानी, तर दुसरा मराठीचा. दोघांचा वाद होतो. शेवटी मराठीचा अभिमान असलेल्या भावाचे म्हणणे संस्कृत अभिमानी भावाला पटते आणि तो मराठी बोलू लागतो. ही कथा दासोपंतांची स्वतंत्र निर्मिती आहे. मुळात अशी कथा असणे असंभव आहे. या कथेला तत्कालीन परिस्थितीचा संदर्भही आहे. ही कालसापेक्षता त्यांच्या शैलीचा एक विशेष आहे. दासोपंत मराठीचा पुरस्कार करतात. याचा अर्थ ते संस्कृतचा द्वेश करतात असे नव्हे. तर संस्कृतमधील चांगले ते स्वीकारले असे आवर्जून सांगतात. यातून त्यांची समतोल वृत्ती दिसून येते. वाङ्मयनिर्मितीच्या संदर्भात समतोलता अपरिहार्य असते. तिचा येथे परिपोष झालेला दिसून येतो. हेही एक वैशिष्ट्य म्हणावे लागेल.

असंदिग्धता वाङ्‌मयात अपरिहार्य असते. १६व्या अध्यायात दैवी आणि आसुरी संपदेच्या संदर्भात विवेचन करताना कुठेही संदिग्धता आढळत नाही. असंदिग्धता हाही त्याच्या शैलीचे वैशिष्ट्य आहे. गीतार्णव, विशेषत: सोळावा अध्याय तत्वज्ञानात्मक आहे. पण म्हणून तो क्लिष्ट व रूक्ष नाही. तर त्यातील अलंकारादिकांमुळे सरळ-सुंदर-सुलभ असल्याची प्रचिती येते. हाही त्यांच्या शैलीचा गुण आहे.

दासोपंताच्या अन्वयार्थ लावण्याच्या संदर्भात अ. ना. देशपांडे यांनी केलेले विवेचन पहाण्यासारखे आहे. ते असे [२७] कधी कधी दासोपंत गीतेतील श्लोकामध्यल्या शब्दाचे रूढ अर्थाहून अगदीच निराळे अर्थ देताना आढळतात. उदाहरणार्थ, पहिल्या अध्यायातील 'अपर्यहा तद स्माकं बल भीष्माभिरक्षितम्' या श्लोकावरील 'अपर्यप्त' या शब्दावर त्यांनी रचलेले भाष्य पहा. अपर्याप्त म्हणजे अफाट, अपरिचीत असा नेहमीचा अर्थ. दासोपंतांचे या शब्दावरील निरूपण. वेगळ्याच रूळावर गेले आहे. दुर्योधन आपल्या सैन्याचे वर्णन करतो: ''इतुकेही असोनि परि । तया पुरूषांचा शरीर । काहीचि सामर्थ्यसामग्री नये दिसो ॥ असामर्थ्याची चिन्हे । अंगी जडली यथा कारणे । तोचि कैसी मद्‌वचने । अवधारावी ॥ घालुनिया खालुतिया माना । वीरू उभे, आईकि द्रोणा । निद्रवा जालिया इसना । येकायेकी ॥ सन्मुख पाहोन शकती । पांडवतेज ययप्रती । न साहवे ऐसे चित्ती । गमे माझा ॥ अधरोष्ठा चाविती पाहे । ऐसिया चिन्हा करणे काये । गाळोनि गेले हातपाये । महावीरांचे ॥ हिंसु आईकोनि वाचा । धाकु वाहती पांडवाचा । आला आला अर्जुनाचा । रथु म्हणती ॥ उठती, बैसती, निद्रा करिती । येक व्यथा आहे म्हणती । येक प्रताप वाखाणती । पांडवांचे ॥ शक्ती पळाली आंगून । उगेचि गळती धनुष्यबाण । जो पळे नरू अडखाळोन । तो चौघी उचलावा ॥ येकाचेनि घेतले जीवे । क्षाअधर्मचि सांडावे । कृषीकर्म सुखे करावे । जळो हे शस्त्र ॥'' आपले सैन्य अशा रीतीने पराभवाच्या मनोवृत्तीने ग्रासले होते असे वर्णन दुर्योधन करील, हे शक्य आहे काय ? आश्चर्य हे की, आपल्या सैन्याला एवढ्या घाबरलेल्या अवस्थेत पाहूनसुध्दा भीष्माचार्य त्यांना युध्द करण्याला प्रेरणा, प्रोत्साहन देताना दिसत नाहीत.'' भीष्माचार्य म्हणतात : ''भीष्मे राखिले निर्वाणी । नाभि रे नाभि म्हणौनि । न जुझावे तुम्ही कवणी । पांडवासी ॥ निवांत पाहवे येथे तुम्ही । पांडव जिंकेन येकला मी । तुम्ही आपुलाला स्वधर्मी । झणे चळा ॥ भीम, अर्जुन ये लेकुरे । न घाली यथावरि हातियेरे । सांडूनि अवघी शस्त्रे । धरीन जितेचि ॥'' भीष्माचार्यांच्या पराक्रमाला उठाव मिळावा म्हणून दासोपंतांनी असे वर्णन केले असावे काय ? किंवा 'अपर्याप्तम्' म्हणजे सामर्थ्यात अपुरे, असा अर्थ त्यांना अभिप्रेत असावा काय ?''

अशा प्रकारे दासोपंताची अन्वयार्थ लावण्याची पद्धती वेगळी आणि वैशिष्ट्यपूर्ण आहे.

(२७) प्राचीन मराठी वाङ्‌मयाचा इतिहास - भाग ४, - अ. ना. देशपांडे पृष्ट : २२६, २२७.

यासंदर्भात आणखी एक विचार संभवनीय वाटतो. तो असा : कौरव आपला सत्तास्वार्थ साधण्यासाठी पांडवाशी अन्यायाने, अनीतीने वागले. त्यासाठी त्यांनी पांडवावर अनेक वेळा युद्ध लादले. पण प्रत्येक वेळा दारूण पराभव झाल्यामुळे त्यांना पलायन करावे लागले. हे सत्य सैन्याने ऐकले, पाहिले आणि अनुभवले, पांडवाचा पराक्रम माहित असल्यामुळे कुरूक्षेत्रावरील महासागरात आपल्या भवितव्याच्या कल्पनेनेच ते गर्भगळीत, गलीतगात्र झाले असावे. आपल्या ह्या भयग्रस्त सैन्याचे वर्णन दुर्योधन करीत असावा कौरव सैन्याची ही परिस्थिती दासोपंतांना जाणवली असावी. त्याचेच हे प्रतिबिंब असावे. असे असेल तर कौरव सैन्याच्या मानसविश्वाचे दर्शन घडविणारे दासोपंत हे पहिले कवी म्हणावे लागतील. म्हणूनच ही स्वतंत्र रचना महत्वाची म्हणावी लागेल.

**सोळाव्या अध्यायाचे वाङ्मयीन मूल्यमापन**

भगवद्गीता, ज्ञानेश्वरी आणि यथार्थदीपिकेशी तुलना केली असता गीतार्णवाचा विस्तार अधिक असल्याचे आपण पूर्वी पाहिले आहे. यासंदर्भात सोळाव्या अध्यायाचा विचार केला तर, भगवद्गीता : १६ वा अध्याय : श्लोक संख्या २४,

ज्ञानेश्वरी : १६ वा अध्याय : ओवी संख्या : ४७०,

गीतार्णव : १६ वा अध्याय : ओवी संख्या २६०४.

यावरून स्पष्ट होते की, गीतार्णवाच्या १६ व्या अध्यायाचा विस्तार ही अधिक आहे, तसेच हा विस्तार अप्रस्तूत नसून विषयाच्या अनुषंगाने स्पष्टीकरणार्थ आलेला आहे तो क्लिष्ट वा रूक्ष वाटत नाही तर मनोवेधक वाटतो. विशेषत: १६ व्या अध्यायातील दैवी व असुरी संपदेच्या संदर्भात विवेचन करताना नवीन निर्मितीही केलेली आहे. ती वाङ्मयीन दृष्ट्या महत्वाचे आहे. दैवी संपदेच्या संदर्भातील त्याची रचना, तत्व-विचार दृष्ट्या पहाण्यासारखी आहे. ते म्हणतात :

यालागि सर्वकाळ अध्येन - स्वधर्माचे असे पालन ।<br>
म्हणौनि ज्ञानप्राप्ती अधिकारचि हा - कैसे न मानावे ॥

येथे दासोपंत ज्ञानाचे सार्वकालीक महत्त्व व तो स्वधर्म असल्याचे सांगून 'अधिकार' ही असल्याचे नि:संदिग्धपणे सांगतात. हा विचार ते १५ व्या शतकात व्यक्त करतात हे लक्षात घेतले पाहिजे. हे ज्ञानमूल्य महत्वाचे आहे. असा ज्ञानसंपन्न योगी कसा, तर-

परदु:ख दु:खवंतु - परहानी चिंताग्रस्तु ।<br>
परनाशे शोक बहुतु - प्रीती परहिता ॥२५१॥<br>
ऐसा सत्यवादु ज्ञानवंतु -. सत्यप्रिय सत्यवंतु ।<br>
तो व्यवहारीही वर्ततु - सत्यवर्ते ॥२७०॥

विश्वसुखी असावे - विश्व ईश्वरी भजावे ।
विश्व विमुक्त होआवे - ऐसा भाऊँ ॥३४२॥

असा योगी जीवनोन्मुखदृष्टीचा व वृत्तीचा आहे. 'विश्व सुखी होआवे : - 'विश्व विमुक्त होआवे' असा विश्वात्मकतेचा उदात्त विचार त्यातून व्यक्त होतो. येथे ज्ञानेश्वरांच्या 'पसायदानाची' आठवण झाल्याशिवाय रहात नाही. अशा प्रकारे विश्वात्मक-मानवतावादी जीवनमूल्ये वाङ्मयरूप धारण करतात. तेव्हा त्यातील एकरूपता लक्षात घेतली पाहिजे.

दासोपंत 'तेजा'चे स्वरुप वर्णन करतात, तेही आगळेवेगळे आणि नव्या अर्थाचे परिमाण प्राप्त करुन देणारे आहे. ते असे :

तेज म्हणिजे जाण पार्था - बाह्यांतरी सावधता ।
पूर्वाकल्प निश्चलता - असता आंगी ॥ ३९९ ॥
दिपकलिकेचे निश्चलपण - जैसे ठाई के ठाई प्रकाशमान ।
आणि दुसरी जाती आपण - आंगी न साहे ॥ ४०० ॥

यातील 'दिपकलिकेच्या दृष्टांतातील कालमूल्य सहज लक्षात यावे. त्याचप्रमाणे -

तरी शुध्दु सत्त्वमयी प्रकृती - ते देवतामयी निरुती ।
अतैव दैवी बोलती - संपदाते ॥ ५१६ ॥

अशी ही दैवी संपदा -

विषची करी अमृत - विश्व हे अनाशवंत ।
च्यारी पुरुषार्थ देख - देणे घेणे ॥ ५२१ ॥

जीवनदायी आणि चारही पुरुषार्थ प्राप्त करुन देणारी.

असुरी संपदेच्या संदर्भात दासोपंत वर्णन करतात ते असे :-

भाविक भोळे गोपुनी - योग्यता जनी दाऊनी ।
दंभु पोषिती ज्ञानी - आसुरजन ॥ ७४१ ॥
मी रुपवंतु ज्ञानवंतु - योगी ज्ञानी मी विधानवंतु ।
नियंता प्रभु समर्थु - मीचि येकु ॥ ७९२ ॥
मद्य मांस सेवी - बळेचि विटाळ कालवी ।
रुपवंती अनुभवी - कामिनी जे ॥ १००१ ॥

- अशी ही असुरी संपदा समाजातील अपप्रवृत्ती आहे. दांभिकता, अहंता , स्वैरता या अपप्रवृत्ती समाजाला पोखरुन टाकणाऱ्या आहेत. माणुसकी त्यांना माहितच नसते. म्हणूनच या संदर्भात दासोपंत म्हणतात :

मना आवडे ते करावे - भोगा आले ते भोगावे ।
पाप पुण्य तेणे नव्हे - पशूचिया ऐसे ॥ १५९५ ॥

अशा भ्रष्ट, स्वैराचारी, दुराचारी प्रवृत्तीधारकांना ते अत्यंत परखडपणे 'पशु'च म्हणतात. तसेच -

मांसे देवा पुजणे - रक्ता सडा घालणे ।
पाठी सुरा घालणे - छेदणे शिर ॥ १६३४ ॥

अशी त्यांची अघोरी भक्ती. नैतिक दृष्ट्या समाजाला अधःपाताकडे नेणारी. ह्या अपप्रवृत्तीचा लोप झाला पाहिजे म्हणून दासोपंत एक चांगला उपाय सांगतात, तो असा :

यालागि उपदेशु तया असो - सत्संगु मेघ वर्षो ।
अंकुरु बुद्धीच दिसो - येती ह्रदयभूमिके ॥ १०३४ ॥

अशा प्रकारे उपदेश आणि सत्संग यांच्या संस्कारामुळे अनिष्ट प्रवृत्तीचा लोप होऊन सत्प्रवृत्ती जागी होईल, हा आशावाद त्यात दिसून येतो. 'सत्संगाचा मेघ वर्षो' आणि 'अंकुरबुद्धीचे दिसो' अशा काव्यमय भाषेतील ही अभिव्यक्ती आहे. हेही लक्षात येते.

दासोपंतकृत गीतार्णव हा तत्वज्ञानात्मक ग्रंथ आहे. श्रीकृष्णाने सांगितलेले हे तत्वज्ञान शाश्वत स्वरुपाचे आहे. तरीही गीतार्णवात कालसापेक्ष वर्णने आहेत. कालसापेक्षता हेही वाड़मयाचा अपरिहार्य लक्षण आहे. दासोपंतांचा काळ हा परकीय आक्रमणाचा, त्यांच्या सत्ता स्थापनेचा काळ होता. तेंव्हा गीतार्णवाच्या १३ व्या अध्यायात -

परराष्ट्रीचे वारु आले - स्वराष्ट्रीचे वीर पळाले ।
ऐसे बोला हारु बोले - परी आईकते न जाणावे ॥

ही ओवी कालसापेक्ष म्हणावी लागेल. त्याचप्रमाणे १६ व्या अध्यायात -

वाणिज करिता मार्ग चित्ता - वित्तचि येले वागविता ।
राष्ट्र चिंता राज्य चिंता - उंपजोचि लागली ॥ १७५० ॥
स्वराज्याचे क्षेम पहाणे - परराष्ट्र चिंता करणे ।
तयाचे पुरे उणे सोसणे - दिवारात्री ॥ १७५१ ॥
अश्वविक्रय कैसे होती - देशी वस्त्र आणि दुभती ।
राजे राजे विरोध करिती - तै चिंता पडे ॥ १७५४ ॥
परराष्ट्र नु चलावे - स्वराष्ट्र नाथे न मारावे ।
परिवार पवित्र असावे - नांदावे लोक ॥ १७५५ ॥

द्रव्या कारणे परसेवा - करिता नाही विसावा ।
रात्री दिवसू अवघा - तयाचि वरी ॥ २५७६ ॥

असे वर्णन करतात. ते निश्चितच तत्कालीन परिस्थितीचे प्रतिबिंब म्हणावे लागेल. दासोपंताचा कालखंड हा बाहमनी राजवटीचा कालखंड होतो. त्याचा कटु अनुभव दासोपंत व त्यांचे वडील दिगंबरपंतांना आला होता. त्यांच्या सारख्या मातब्बर वतनदारांना असा अनुभव येऊ शकतो, तर सामान्य माणसांची काय स्थिती असेल ? म्हणूनच गीतार्णवासारख्या तत्वज्ञानात्मक ग्रंथात त्याचे पडसाद उमटतात. ते कालोचित म्हणावे लागतील. वाड्मयात त्याचे दर्शन घडणे स्वाभाविकच नव्हे तर अपरिहार्य असते. म्हणूनच हा संदर्भ व कालसापेक्षता महत्त्वाची. येथे वाड्मयातील कालसापेक्षतेचे मूल्य लक्षात घेणे आवश्यक आहे.

**डॉ. हरिहर मातेकर**



श्री सर्वज्ञ दासोपंत स्वामी अंबाजोगाई

श्रीमद् दत्तात्रेय नम: जयजयाजी विश्वभरिता ॥
विश्वात्मया श्रीअनंता ॥ विश्वगुरो अवधूता ॥ विश्वसाक्षी ॥ १ ॥

विश्वंभरा तुझे स्मरण । ते तापत्रयाग्निप्रशमन ॥
विश्वाते करी पावन ॥ भर्वसेनि ॥ २ ॥

तूतें नमोजी मुक्तिपाणी ॥ मायानिवारणा दिनमणी ॥
संसार कल्मशाची धुणि ॥ होये तव पादोदकें ॥ ३ ॥

सकळां विद्यांचे तूं भांडार ॥ वेदांशास्त्राचे अर्थसार ॥
गम्यगमक सुखकर ॥ तुझिया कृपा ॥ ४ ॥

स्वभृत्यभर्त्ताकल्पतरु ॥ सर्वज्ञुयोगचिदांवरु ॥
तुजचि येकाचा आधारु ॥ आमुते असे ॥ ५ ॥

झणें करिसी उदासीन । बोल बोलसी कठीण ॥
तुझ्या हातीं पंचप्राण ॥ ठेविले आम्ही ॥ ६ ॥

हितेंविहितें न सुटिजे ॥ तरि कां देवा तुझे होईजे ॥
आतां आमुतें न लविजे आमुचें कांही ॥ ७ ॥

तुझेचि परि पुडती जालो ॥ येणे अपराधें बाधिलों ॥
म्हणौनी अधिकारें भूतलों ॥ पाचोंचिना ॥ ८ ॥

पुत्रत्वाची सिद्धदशा ॥ सांडूंनी दासत्वाची आशा ॥
धरिली हा हा परमपुरुषा ॥ अंतरलासी ॥ ९ ॥

स्वरुपाचेनि अंशेमातें ॥ आणूंनियां जीवदशेतें ॥
मोहितासि येणें कर्मपंथे ॥ काये कीजे ॥ १० ॥

अगा आपुलें वारिजें अज्ञान ॥ तें तया बालकासमान ॥
हिता अहिताचें ज्ञान ॥ कांहीची नेणे ॥ ११ ॥

तेणेसी विश्वासघातु ॥ करावया कवण समर्थु ॥
निष्ठुरु रिता हितवंतु ॥ तो घातकु नव्हे ॥ १२ ॥

तैसें म्या स्वहित नेणावें ॥ वरि सांगीतलें ही न करावें ॥
हें उचितचि अघवे ॥ आमुचा ठांई ॥ १३ ॥

परंतु ते असहिष्णुता ॥ धर्मु नव्हे उदासीन करिता ॥
सत्य जाणोनि वर्तता ॥ नारोपे दोषु ॥ १४ ॥

आमुचें आम्ही ज्ञान ॥ कोंठुनि आणिलें अज्ञान ॥
हे मायावण ॥ उल्लंघु शके ॥ १५ ॥

आता सत्संग केलों तुवां ॥ तरि उपावो काये करावा ॥
मशकें मेरु लोटावा ॥ कैसिया परि ॥ १६ ॥

आतां करिसील तेंचि बरवें ॥ सांगसील तेची आम्ही करावें ॥
देसी तेंचि घ्यावे ॥ ऐसें कीं जालें ॥ १७ ॥

कवणु इतरुइतराचें साहील ॥ कवणु कासया मग पुसैल ॥
आशा केली ते सकल ॥ व्यर्थ होये ॥ १८ ॥

तुझे आम्ही हे साचबोली ॥ परि कवणे चांडाळिणी तुटी घातली ॥
न ये कां मोहाची उकळी ॥ श्रीयोगीराया ॥ १९ ॥

आतां कैसें पां हृदय तुझें ॥ ललाट कैसें हें माझें ॥
ब्रह्मादिकीं जाणो न शकिजे ॥ मी मनुष्य काये ॥ २० ॥

माताचि लांवडी होये ॥ तै तें बाळ कैसें जिये ॥
तेथे रुदनचि येक आहे ॥ प्रेत्नु तया ॥ २१ ॥

आतां चालो न चलो तो प्रेत्नु ॥ माते उपावो न गमे आनु ॥
आतां असैल जो तुझा गुणु ॥ तोचि करावा ॥ २२ ॥

थोरें सादें आळवीन ॥ बापा अवधूता तुझी आण ॥
हे संसारदुःख गहन ॥ न सोषे मातें ॥ २३ ॥

कवण दिशा तुझी पाहों ॥ कवणु काळ उगा राहों ॥
माझाचि मज हा देहो ॥ पारिखा दिसे ॥ २४ ॥

आइकतां बोलणे आमुचें ॥ हृदय दुभंगी जनाचें ॥
ऐसें मनुष्य कठीण कैचें ॥ जें न करी अश्रुपात ॥ २५ ॥

येकातें सामाविलें उदरी ॥ आम्हीचि काये जालों दूरि
पिंगळनागु तो अधिकारी ॥ दक्षु जाला ॥ २६ ॥

येक उभें येक जानू वरी ॥ माता बाळका ऐसें करी ॥
तै पोटी घालावी सुरी ॥ घेवावा प्राणु ॥ २७ ॥

परमामृताची आरोगणा ॥ बाळकेंवीण विषासमान ॥
जैते अपेक्षूंनि भोजन ॥ पासीं असे ॥ २८ ॥

पिता होये भाग्यवंतु ॥ परि पुत्रेंवीण तो दुःखिन्तु ॥
जरि का बंधानी सुतु ॥ सांपडला असे ॥ २९ ॥

देवा म्या तूतें नेणावें ॥ हे अज्ञानातें अपूर्व नव्हे ॥
परंतु तुवां उपेक्षावें ॥ हेंचि कैसें ॥ ३० ॥

वर्षती विषाचिया धारा ॥ तै माता पोटिचिया कुमरा ॥
पोटीं लपउनि समग्रा ॥ आंगावरि घे ॥ ३१ ॥

तैसीं तूं माझी माये ॥ अवधूतां सांगो काये ॥
विषमेधु वोळुला आहे ॥ संसारू हा ॥ ३२ ॥

केवळ अभयाचें स्थान ॥ आमुतें नाही तुजवीण ॥
बाळका मातेंवांचून ॥ तैंसे आहे ॥ ३३ ॥

सर्वांगी लागली ज्योति ॥ आतां मग प्राण जाती ॥
देवा निर्मळांचां चित्तीं ॥ कां हे कठीणपण ॥ ३४ ॥

देवा जळो हें माझें जीणें ॥ जै न द्रवसि अमृतवचने ॥
जनी मुखचि न द्रवणे ॥ ऐसे जालें ॥ ३५ ॥

कवणें गुणें मी विटाळला ॥ पोटिचा पुत्रु तुवां सांडिला ॥
आता सर्वज्ञातें वेळोवेळां ॥ कित्ती सांगणे ॥ ३६ ॥

माझां गुणी माते बाधिलें ॥ ते हरावें तेणे उपेक्षिलें ॥
तरि व्दिगुणा दुःख जाले ॥ कवणा सांगिजे ॥ ३७ ॥

आइकोनि माझा श्रमु देवा ॥ पर्वतु तोही फुटावा ॥
परि देखोनि ही दृष्टी तुवां ॥ कैसें साहिलें ॥ ३८ ॥

दुभांग म्हणें मेदनी तें ॥ भागंबादो सागरातें ॥
ऐसें जाणोनि तुवां माते ॥ कठीण केलें ॥ ३९ ॥

कैचें कर्म कैंचें शाप ॥ कवणें केलें कैंचें पाप ॥
कवण मोक्षाचें स्वरुप ॥ करिसी तें साचार ॥ ४० ॥

इतुली भाकतां ही करूणा ॥ द्रावो नुपजे तुझया मना ॥
आतां कवणें वृक्षें संबोखणा ॥ करावी माझी ॥ ४१ ॥

ऐसा देवा देवा स्मरतु ॥ क्षणेंकु जालों तटस्थु ॥
वृत्ती वेगळा स्वस्थु ॥ आपलां ठांइ ॥ ४२ ॥

तंवं तेथेचि मी आत्मारामु ॥ भेटला अवधूतु पुरूषोत्तमु ॥
तेणें अवघाचि हरला श्रमु ॥ भेदा स्थितु जो ॥ ४३ ॥

तेणें ब्रह्मानंदे निवाला ॥ सद्गुरूसी येकत्व पावला ॥
मग अन्वयदृष्टी चेइला ॥ जागृतीमाजि ॥ ४४ ॥

तेंचि डोळा बैसले अंजन ॥ सांपडले विश्वब्रह्मधन ॥
तयामाजि अमोल्य रत्न ॥ गीताख्य हें ॥ ४५ ॥

तें परीक्षितां यथामती ॥ हारपोंनि जाये चित्तोवृत्ति ॥
तथापि न संटे ज्योति ॥ तया रत्नाची ॥ ४६ ॥

तिने चित्त प्रकाशलें ॥ ते न पडे ते गीतेवेगळें ॥
यापरि मार्गा क्रमिले ॥ अध्याय पंधरा ॥ ४७ ॥

आतां सोळावयाचा उल्लासु ॥ चित्तातें क्रीडवी संतोषु ॥
तेथिचा अर्थु विशेषु ॥ गमो लागे ॥ ४८ ॥

तंव पंचदशाध्यायाअंती ॥ अर्जुनाप्रति भगवदुक्ति ॥
एतद् बुध्या हे निरूती ॥ संपादली ॥ ४९ ॥

तेथिचे वर्म सुवर्म ॥ श्रीकृष्ण सांगे परम ॥
अर्जुना हें शास्त्र गुह्यतम ॥ ऐसें आहे ॥ ५० ॥

हें जाणोंनि साचोकारें ॥ जालेनि आत्मविचारें ॥
कृतकृत्य होती चतुरें ॥ तूही हो पां ॥ ५१ ॥

आतां ऐसें जाणावया ज्ञान ॥ अधिकाराचें कैचें लक्षण ॥
आणि अनाधिकारूचिन्ह ॥ तयाचें कैसें ॥ ५२ ॥

ऐसा हा प्रकारू बोलणें ॥ लागलें श्रीकृष्णा कारणें ॥
तो प्रसंगु सोळावेन येणे ॥ आध्याये हा ॥ ५३ ॥

अभयं सत्वसंशुध्दिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १६-१ ॥

श्रीभगवानुवाच : श्रीकृष्ण बोले वचन ॥
अर्जुना देई अवधान ॥ प्रथम आइकें चिन्ह ॥
ज्ञानाधिकाराचें ॥ ५४ ॥

## अभयं ॥ ॐ ॥

आरंभु भजतां साधनाचा ॥ वारा वाजे भयाचा ॥
म्हणौनि अभावो तयाचा ॥ तेचि अभय ॥ ५५ ॥

तया भयाचे कैसें लक्षण ॥ आइकें पां आधीं सांगैन ॥
मग अभयाचे बोधन ॥ अभावें त्याचेनि ॥ ५६ ॥

भय येकांतिचा दचकु ॥ दुजया देखोनि वोचकु ॥
भयें हाणीतला विवेकु ॥ पाउल न करी ॥ ५७ ॥

भयें धारणाचि न धरे ॥ चळचळा कांपती गात्रे ॥
आसन सांडूनि देशांतरे ॥ पळे पुरूषु ॥ ५८ ॥

मुखिचें पळे पाणी ॥ आंसुं न फुटे नयनी ॥
भये शरीरा माजूनि ॥ रक्तहीव ॥ ५९ ॥

भयाचा उपजतांचि वेगु ॥ स्थळाचौंकरवी त्यागु ॥
मग करीचि भयें पाठिलागु ॥ तै योगु कैंचा ॥ ६० ॥

भयें आचार सांडविलें ॥ भये विचार पालटिले ॥
भयें देशधडी केलां ॥ आश्रितासी ॥ ६१ ॥

भय रूदनाचें मूळ ॥ भयें भेदिलें हृदयकमळ ॥
भयें प्राण चंचळ ॥ सांडिती देहातें ॥ ६२ ॥

भयें ध्येला पदरु ॥ मग जाला ही क्षेत्री वीरु ॥
तयाचा शस्त्रास्त्र भारु ॥ तो नये काजा ॥ ६३ ॥

भये मानस हालवलें ॥ मग न बैसें कांही केले ॥
आतुनी बाहेरि लाविलें ॥ लागेचिना ॥ ६४ ॥

भयाचिये महासरिते ॥ पडला न पवे प्रांतातें ॥
तया येक स्थानचि न वर्ते ॥ तै कैचें साधन ॥ ६५ ॥

भयाचा बाणु सुबुध्दी ॥ जाउंनि अंत:करणातेंचि भेदी ॥
मग तोचि तयामादी ॥ पाठी लागे ॥ ६६ ॥

शतांसहस्त्रांलक्षावरी ॥ येक भयचि पुरे संसारी ॥
अर्जुना जै तें पूर्ण शरीरीं ॥ धरू जाणिजे ॥ ६७ ॥

भयेचि ध्येले मनें ॥ तै न चले कांही करणें ॥
अपार जिंकिले येणे ॥ न परतती चित्ते ॥ ६८ ॥

भयें सांडविलें रण ॥ भयें सांडविलें स्थान ॥
भयें रसिक भोजन ॥ पाणी होये ॥ ६९ ॥

भयेंचि परते कवळु ॥ भयें नु चले देहो स्थूळु ॥
भर करी विटाळु ॥ तै देती प्राणु ॥ ७० ॥

भय अभ्यासातें सांडवी ॥ भय शमदमातें पळवी ॥
विविक्त वासियां लावी ॥ ख्यातिभय ॥ ७१ ॥

भयें वर्णाश्रमु सांडविला ॥ गुरु तो उपजतांचि दवडिला ॥
पुत्रु वैरी केला ॥ तें हें नव्हें ॥ ७२ ॥

अमृत विषा एसें सांडवी ॥ विष अमृतापरी घोंटवी ॥
भय साधूतें नाचवी ॥ मादळेवीण ॥ ७३ ॥

आंगा आणी कार्पण्य ॥ दैन्य आणि हीनपण ॥
असो गा भयापासून ॥ काय येक नव्हें ॥ ७४ ॥

आतां ते जालें कोठूंनि ॥ हे पृछा धरिसील मनी ॥
तरी भयाकारणें किती म्हणौनि ॥ सांगावी आम्ही ॥ ७५ ॥

चोरभय सर्पभय ॥ व्याघ्रभय वृश्चिकभय ॥
राजभय जनभय ॥ भय श्वापदांचे ॥ ७६ ॥

शापभय प्रेतभय ॥ भूतभय पिशाचभय ॥
कष्टभय दुःखभय ॥ भय मरणाचे ॥ ७७ ॥

काष्टभय पाषाणभय ॥ पृथ्वीभय जलभय ॥
अग्निभय हीमभय ॥ दंडभय अपमानभय याचकभय
भय गोत्रजांचे ॥ ७८ ॥

अरिभय मित्रभय ॥ अर्जुना देवभय गुरूभय गा पुनः ॥
भयेंविण स्थानचि असेना ॥ ऐसें आहे ॥ ७९ ॥

ज्ञानेंद्रियाद्वारा गोचर ॥ कर्मेंद्रियाचे जे आचर ॥
हें भयस्थानचि समग्र ऐसें आहे ॥ ८० ॥

आतां देही वातभय पित्तभय ॥ कफभय रोगभय ॥
क्षुधाभय तृषाभय ॥ बाधी म्हणौनि ॥ ८१ ॥

जन्मभय मरणभय ॥ जराभय अज्ञानभय ॥
कल्पनाभय विक्षेपभय ॥ भय क्लेशांचे ॥ ८२ ॥

आपुल्या अज्ञानापासूंन ॥ आपणु तोही भयाचें स्थान ॥
मा इतर होये कारण ॥ येथ अपूर्व काये ॥ ८३ ॥

छाया तेही भयंकर बोलिजे तें हीं उत्तर ॥
असो भये स्थान गोचर ॥ मात्र अवघें ॥ ८४ ॥

यापरी सर्वही भयस्थान ॥ आणि सर्वत्र भयवर्तमान ॥
तरि अभय तया आयन ॥ तेंचि कोठें ॥ ८५ ॥

ऐसें बोलसील अर्जुना ॥ तरि वचन आइकें सुजाणा ॥
सर्वत्र अभयविचक्षणा ॥ सर्वदा असे ॥ ८६ ॥

अभय अंतरी बाहेरी ॥ अभय भूतजातीं चराचरी ॥
भयातेंचि नाहीं उरी ॥ अभया करितां ॥ ८७ ॥

सर्वत्र भय साचार ॥ अभय सर्वत्र निरंतर ॥
येथे पाहाणयांचें चि प्रकार ॥ दोनि असती ॥ ८८ ॥

अर्जुना आपुलेनि ज्ञाने ॥ मातें कांहिचि नाहींसें देखणें ॥
तै चित्ता भयकारणे ॥ दोन्हींची करपली ॥ ८९ ॥

आत्मभावें व्दैतभावो ॥ तो सर्वत्र अभयाचा ठावो ॥
भयातें नाही वावो ॥ देहचि हारपे ॥ ९० ॥

अथवा मजवेगळें काही ॥ भासे ते भिन्न नाहीं ॥
ऐसें जाणतां सर्वही ॥ सर्वदा अभय ॥ ९१ ॥

आत्मभावें व्दैतभावना ॥ तेंचि अभयस्थान अर्जुना ॥
सर्वत्रभयाचिया छेदना ॥ करूनि असे ॥ ९२ ॥

सर्व मिथ्या मी सिध्दु ॥ कां सर्व रूपत्वें आत्मबोधु ॥
व्दैताभिनिवेशाचा उच्छेदु ॥ केवळ जो ॥ ९३ ॥

तोचि सर्वत्रु अर्जुना ॥ सर्वदा अभय ठावो जुना ॥
मग आंतु बाहेरि आपणा ॥ सर्वत्र अभय ॥ ९४ ॥

आपुले नि जाण अज्ञानें ॥ आपणावेगळें इतर देखणें ॥
इतराचे गळें वोळखणें ॥ आपणपया ॥ ९५ ॥

तेथे आपणा इतरा इतरू ॥ आपणु साक्षी परू ॥
तयाचा न कळे विचारू ॥ ऐसें जंव ॥ ९६ ॥

तवं व्दैताचें भय संभवे ॥ आपुलेहीं तेणेचि भावे ॥
कांजें आपणु म्हणें ते आत्मा नव्हे ॥ म्हणौनिया ॥ ९७ ॥

एवं व्दैत ज्ञानें भय ॥ अव्दैत ज्ञाने अभय ॥
इतुलेंचि जाण तात्पर्य ॥ यया निरोपणाचे ॥ ९८ ॥

**व्दितिया व्दैभयं भवति ॥ ०० ॥**

ऐसी हे वेदश्रुति ॥ दुसरू या पासाव भय बोलती ॥
जयाचें तया नाथी ॥ केवळ भय ॥ ९९ ॥

पावकें पावकु जळैल ॥ पाणियें पाणी बुडैल ॥
ग्रहोग्रहाते लागेल ॥ ऐसें काये ॥ १०० ॥

मारील तस्करू आपणा ॥ कीं हरील काये अर्जुना ॥
सर्पु सर्पा दंशीना ॥ व्याघ्र आंगा ॥ १०१ ॥

म्हणौनि वेदशास्त्रपुराण ॥ जाणोनि आर्थ मुखेंज्ञान ॥
भेदाचें सर्वदा लटिकपण ॥ दृढ करावे ॥ १०२ ॥

अभेदी जाला विश्वासु ॥ तोचि आत्यंतिकु भयविनाशु ॥
तेणे घेतला पुरुषु ॥ तो काये करी ॥ १०३ ॥

बैसला तेथेंचि स्वस्थु ॥ न चळे जैसा पर्वतु ॥
समीप पावलाही धातु ॥ व्याकूळ नव्हे ॥ १०४ ॥

लोकांची शंका न धरी ॥ आपण करावें तेंचि करी ॥
निंदास्तुति आंगावरि ॥ नेंदी पडों ॥ १०५ ॥

तया आपुला ना परावा ॥ वैरी ना मित्रु पांडवा ॥
अचळ योगी जाणावा ॥ न चळे विघ्नी ॥ १०६ ॥

यापरी अभेदाचें दृढपण ॥ तेणें योगी जाले अचळपण ॥
तथापि अपरोक्ष आत्माज्ञान ॥ ते पाहिजे कीं ॥ १०७ ॥

**सत्वसंशुध्दीः ॥ ००० ॥**

म्हणौनि ज्ञान तें चतुरा ॥ उपजे सत्वशुद्धीद्वारा ॥
तें सत्वशुद्धी योगेश्वरां ॥ प्राप्तीचे चिन्ह ॥ १०८ ॥

आता सत्वशुद्धी ते कैसी ॥ ऐसा आक्षेपु जरि करिसी ॥
तरि अवधारी निश्चयेसीं ॥ सांगिजैल ॥ १०९ ॥

केवळ प्रकाश लक्षण ॥ सत्वाची वृत्ती ते ज्ञान ॥
रजतमाचे मिश्रितपण ॥ तेथें असे ॥ ११० ॥

तमाची वृत्ति तें अज्ञान ॥ रजाची प्रवृत्ती साधन ॥
क्रियारुपस्फुरण ॥ विशेषेंसी ॥ १११ ॥

सत्वाचिये विज्ञानवृत्ती ॥ तमाचेनि योगे पडे भ्रांती ॥
मग रजोपसर्गे प्रवृत्ती ॥ अन्यथा होये ॥ ११२ ॥

एवं रजतमयोगें करुंन ॥ अज्ञानपूर्वक होये ज्ञान ॥
आता सत्वाचे शुद्धपण ॥ तेंचि कैसें ॥ ११३ ॥

रजतम मळ सुटती ॥ तै अज्ञाना अन्यथा ज्ञाना शांती ॥
यथार्थ वेदन वीरपती ॥ तेंचि उरें ॥ ११४ ॥

ते सत्वोपस्कृत ज्ञान ॥ लयविक्षेपविहिन ॥
नित्ययुक्त सावधान पण ॥ आपुलां ठांई ॥ ११५ ॥

की ज्ञान असतां स्वस्थिती ॥ रजाची नाथी प्रवृत्ती ॥
मग वृत्ति शून्यत्वें म्हणती ॥ कव्हणी लयो ॥ ११६ ॥

तरिलयो सुषुप्ति अज्ञान ॥ तमाभावें हे जडपण ॥
छेदलें असतां ज्ञान ॥ निर्विकार उरे ॥ ११७ ॥

ऐसें नित्य निर्मळ निर्विकार ॥ सात्विक ज्ञान पवित्र ॥
अवृत्तील या इतर ॥ जैसें तैसें ॥ ११८ ॥

अथवा सत्वाची केवळ स्थिति ॥ विवेकाची दशा आइत्ती ॥
तेथे रजतमाचियावृत्ती ॥ आडळतीचिना ॥ ११९ ॥

तेथें अर्थाभिळाष तुटले ॥ कामराग विसंचले ॥
सत्वेरजतम जिंकिले ॥ ऐसें असतां ॥ १२० ॥

क्रोधु नाही देशांतरी ॥ मदा मछरा नाही ऊरी ॥
वासना त्रुष्णा नगरीं ॥ न शकतीची राहो ॥ १२१ ॥

कल्पनेवेगळे प्राण ॥ आशे वासने नाही अन्न ॥
पाहों जाता दुचितपण ॥ दुःकाळ तयाचा ॥ १२२ ॥

असावधानता व्यग्रता ॥ क्षीणा तिन्ही अवस्था ॥
केवळ सत्वचि असतां ॥ जडता ना प्रवृत्ति ॥ १२३ ॥

चंचळता सांडिली मने ॥ ते नापेक्षी करणी कारणें ॥
पूर्वीची स्वकर्मानुष्ठानें ॥ सिद्ध जालीं ॥ १२४ ॥

जें जें विवेकु करी बळ ॥ तेथें नाहीं दुजें प्रतिकूल ॥
तें तें सिद्धांताचे फळ ॥ देवोचि लागे ॥ १२५ ॥

अभये दृढता हा गुणु ॥ सत्वें प्रज्ञा प्रकाशु सतप्रेत्नु ॥
या दोहीं पासाव कवणु ॥ भावो उठी ॥ १२६ ॥

**ज्ञानयोग व्यवस्थितिः ॥ ००० ॥**

ज्ञानयुक्तु योग सुभटा ॥ तेथें जें की नित्यनिष्ठा ॥
अभयें सत्वशुध्दीचिया वाटा ॥ भेटली ते ॥ १२७ ॥

आतां ज्ञान म्हणिजे तें कवण ॥ कैसे योगाचे तया लक्षण ॥
दोन्ही पक्षी निष्ठा पूर्ण ॥ तै पैं कैसी ॥ १२८ ॥

वृत्तिशून्य ज्ञान होतां ॥ तेथें आपुला विसरु न पडतां ॥
ज्ञेय गमे पंडुसुता ॥ अधिष्ठान ॥१२९॥

वृत्तीचें मोडले स्थान ॥ तेथें विराले मीतूपण ॥
सुटोनि गेले अनुसंधान ॥ स्वपरविषयी ॥१३०॥

ऐसी ज्ञाने जाली प्रतीती ॥ आता योगु तो तेथें नित्यस्थिती ॥
यापरी ज्ञान योगाचि अनुभूती ॥ अखंडता जे ॥१३१॥

नातरि ज्ञेयगमिजे ज्ञाने ॥ तेथे प्रेत्नु कीजे तो योगु तेणें ॥
यापरी विचारू करणें ॥ आत्मयांचा ॥ १३२॥

ज्ञेयाते सांडूनि ज्ञान ॥ ज्ञांता पुरुषी करी संक्रमण ॥
तेथें लय ना विक्षेप सावधान ॥ ऐसें तपे ॥१३३॥

तेथें तेथें तैसी तैसी ॥ निष्ठा होये जे मानसि ॥
तो तोचि योगु परियसी ॥ तेथें तेथें ॥१३४॥

यापरी ज्ञानयुक्त साधन ॥ आणि साधनयुक्त ज्ञान ॥
पावे सेवटील ही खूण ॥ तऱ्ही दोन्ही ॥१३५॥

ऐसा ज्ञानयुक्तु योगु ॥ तोचि बोलावा ज्ञानयोगु ॥
अथवा आन येकु प्रसंगु ॥ मानावा येथें ॥१३६॥

ज्ञानशब्दे सांख्यु जाण ॥ योगु तो योगु साधन ॥
यां दोहीपक्षा येकपण ॥ ऐसी जे निष्ठा ॥१३७॥

सांख्युमते ज्ञेयगमणें ॥ योगमतें निष्ठा अभ्यासणें ॥
ऐसे नि पक्षें वर्तणें ॥ तेचि ज्ञानयोगस्थिती ॥१३८॥

साधन पावे सिध्दी ॥ तेणें अखंडता होये समाधी ॥
तेथें ही जाण सुबुध्दी ॥ दोन्ही पक्ष ॥१३९॥

समाधींचे अवस्थान ॥ तें ज्ञानयुक्त निष्ठायुक्त जाण ॥
म्हणौनि दोही पक्षा येकपण ॥ तेचि स्वस्थिति ॥ १४० ॥

कीं स्वरूपाची जे स्थिती ॥ तेचि ऐसी जाण निरुती ॥
निष्ठारूप ज्ञानरूप स्फूर्ति ॥ समाधीची ॥ १४१ ॥

आता असो बहुसाल बोलणें ॥ ज्ञानयोग स्थिति हे प्रकारें येणें ॥
आत्मनिष्ठा नित्यपणें ॥ योगियांची ॥ १४२ ॥

निष्ठेचि जालि संप्राप्ती ॥ कवणें चिन्हे पाहिजति ॥
तिचि आतां सांगिजती ॥ विस्तारूनि ॥ १४३ ॥

॥ दानं ॥

पावलयांवरि आपण ॥ अधिकारियां शिष्यालागूंन ॥
कीजे अध्यात्मविद्यादान ॥ हा सहजचि स्वभावो ॥ १४४ ॥

अन्नदानें द्रव्यदानें ॥ वस्त्रदानें गोदानें ॥
अश्वरथ गजदानें ॥ आदि करूनि ॥ १४५ ॥

अनेकें दानें होती ॥ परंतु गा सुभद्रापती ॥
वृत्ति दानाची महंती ॥ नये येकातें ॥ १४६ ॥

वृत्ती आगळें भूमिदान ॥ भूमीआगळें अभयदान ॥
अभयाआगळे प्राणदान ॥ भर्वसेनि ॥ १४७ ॥

कन्यादानें मंदिर दानें ॥ याहुंनि ती साधारणें ॥
जाता प्राणु वांचवणें ॥ दातृत्व थोर ॥ १४८ ॥

जालें ही प्राणदान किरीटी ॥ संसार दुःख असे तयापोटी ॥
आतां मोक्षदानाची गोठी ॥ ते काये सांगावी ॥ १४९ ॥

की दातयामाजि अर्जुना ॥ आत्मदान करवे कव्हणा ॥
पाहे पायाबळी येसणा ॥ कवणु आहे ॥ १५० ॥

नाही परि नृपाळा ॥ आतमदान करूं चुकला ॥
तेथे का ज्ञानयोगशीळा ॥ फावलें आथी ॥ १५१ ॥

विद्यादान जे करिती ॥ तया सर्वदानाची फळप्राप्ति ॥
असद्‌विद्येची महती ॥ येसणी जे ॥ १५२ ॥

आतां आत्मविद्या हे सन्मयी ॥ यी येसणें दानचि नाही ॥
अर्जुना सत्यावेगळें कायी ॥ देणें ते देणें ॥ १५३ ॥

हे दान जयातें फावलें ॥ तेणें ब्रह्मचि ब्रह्मार्पण केलें ॥
आतां ययाहूंनि आगळें कवण द्रव्य ॥ १५४ ॥

या ब्रह्मदानाचा पोटीं ॥ घडली दाने लक्षकोटी ॥
तेथ सच्छिष्यांहूंनि किरीटी ॥ पात्रचि नसे ॥ १५५ ॥

क्षुधिता जैसे अन्न ॥ आस्थाळांबा तैसें हे जाण ॥
येर जाणतही ब्राह्मण ॥ पात्र न होती ॥ १५६ ॥

जये समयी योगु कळ्ला ॥ तोचि श्रेष्ठु काल नृपाळा ॥
जो अनंता जन्मी वर्तीला ॥ साधेचिना ॥ १५७ ॥

तोचि उत्तमु प्रदेशु ॥ ब्रह्मांदिकांहीं जाणीजसु ॥
मागुता तैसा सुदिवसु ॥ सांपडेना ॥ १५८ ॥

ते स्थळ तो काळ तें वय ॥ दुर्लभ उभयता तात्पर्य ॥
जै ये दानी देये ॥ परब्रह्म आथी ॥ १५९ ॥

तेणें आत्मविद्याज्ञानें ॥ सत्यवैकुंठ कैलास स्थाने ॥
समर्पिली सुपात्रां कारणें ॥ पवित्र कालें देशीं ॥ १६० ॥

इंद्रपद दिधले दक्षिणा ॥ चंद्रसूर्यपद ब्राह्मणा ॥
स्वर्गमृत्य पांताळ अर्जुना ॥ दिधलें होये ॥ १६१ ॥

सातही सागर धरणी ॥ मेरू समर्पिला दानी ॥
अमृताची केली वाटणी ॥ ऐसें जालें ॥ १६२ ॥

की विज्ञान दानी पार्था ॥ दिधली या कामधेनू अनंता ॥
कल्पवृक्षाचि गणिता ॥ कवणें करावे ॥ १६३ ॥

चिंतामणीचिया राशी ॥ दान घडलें जाण तयासि ॥
जे लक्ष्मी लक्ष्मीची दासि ॥ ते लक्ष्मी दिधली ॥ १६४ ॥

की अनंतु समर्पिला दानी ॥ सहितु चौदा भुवनी ॥
ब्रह्मप्रपंचु दोन्ही ॥ दान केले ॥ १६५ ॥

ऐसें अध्यात्मविद्यादान ॥ यया लोक मोक्षालागून ॥
पूर्वी श्रीयोगिरायें आपण ॥ ईश्वरें केलें ॥ १६६ ॥

तेंचि दिक्षा पावोंनि ॥ प्रवर्त्तावें तये दानी ॥
हा धर्मुचि धनुःपाणी ॥ तया मुक्ता ते ॥ १६७ ॥

आतां तया दानाचां ठांई ॥ पावले पात्र समयीं ॥
तयाचें कैसें कायी ॥ चिन्ह जाणावे ॥ १६८ ॥

चिन्ह अधिकारी या शिष्याचें ॥ तें कां नव्हे ज्ञान प्राप्तीचे ॥
पुढे दाता होईजे तयाचें ॥ येसणे महिमान ॥ १६९ ॥

तरि ज्ञानाचां प्रति ग्रहकाळी ॥ प्रथम साधनाचां मुळी ॥
असावे सच्छिष्याजवळी ॥ ते चिन्ह कवण ॥ १७० ॥

॥ दमश्च ॥ ००० ॥

तरि अवधान देई अर्जुना ॥ प्रथम निववावें बाह्य करणा ॥
तया दमाचिया आंगवणा ॥ लाहिजे ज्ञान ॥ १७१ ॥

येकांती घालिजे आसन ॥ रिघोंनि सद्‌गुरुतें शरण ॥
बाह्य चंचळ कर्म करण ॥ तेचि दमाचे ॥ १७२ ॥

वाचेचा ठांई मौन ॥ आसने नियमिलें कर चरण ॥
शिश्नापाय ते दमन ॥ करुनिनिंया ॥ १७३ ॥

मानमाजु शरीर ॥ नीट धरावें अवक्र ॥
निर्वात दीपापरी स्थीर ॥ देह राखावें ॥ १७४ ॥

मग ज्ञानकरणाचियावृत्ती ॥ बाह्यविषयांवरी धांवती ॥
तिया आवरुनि सुभद्रापती ॥ अंतरा आणाविया ॥ १७५ ॥

मग तें ज्ञानेंद्रियांचे ज्ञान ॥ पोटी सामाउनि मन ॥
अंतरी प्रकाशे आपण ॥ देह व्यतिरेकें ॥ १७६ ॥

ऐसेंनि दमे पार्था गुरुमुखें । ज्ञान आइकतां ॥
नानादान काळीं पवित्रता ॥ ऐंसी पात्राची ॥ १७७ ॥

यापरी बाह्यनिग्रहादमु ॥ असावा अंतरी शमु ॥
आतां ययापूर्वी धर्मु ॥ तो कैसा असावा ॥ १७८ ॥

जँयाचें अर्जुना फळ ॥ दमीमन होये निश्चळ ॥
सोपान आवरितां चळबळ ॥ इंद्रियांची ॥ १७९ ॥

पूर्वी असे जरि तें पुण्य ॥ तरिचि उपजे नैपुण्य ॥
सद्गुरुचें होय दर्शन ॥ दैन्य फिटे ॥ १८० ॥

आतां गुरुदर्शना प्राग्दशे ॥ दमापूर्वी जें असे ॥
तें ज्ञानचिन्ह विदुशें ॥ कवणमानावें ॥ १८१ ॥

**॥ यज्ञश्च ॥ ००० ॥**

तरि पांडुपुत्रा जाण ॥ यज्ञनामे विहिता चरण ॥
तेचि वेदोक्त साधन ॥ आधी असावें ॥ १८२ ॥

मोक्षधर्मु वर्णधर्मु ॥ आश्रमधर्मु कुळधर्मु ॥
आर्यधर्मु लोकधर्मु ॥ देशपरत्वे ॥ १८३ ॥

तेथें मोक्षधर्मु प्रधानु ॥ मोक्षा अपरु आनु ॥
वर्णधर्मु सनातनु ॥ वर्ततु असे ॥ १८४ ॥

वर्णधर्मा अैलाकडे ॥ आश्रमुधर्म जाण फुडें ॥
कुळधर्मु येकु घडे ॥ तो अपरु तया ॥ १८५ ॥

त्या अपरनिती वडिलांची ॥ त्यांहूंनि क्रिया देशिची ॥
ऐसा धर्मु अनुक्रमेचि ॥ यज्ञुनामे ॥ १८६ ॥

मोक्षधर्मा अनुकुळ ॥ तोचि वर्णधर्मु निर्मळ ॥
येश वासनेचा विटाळ ॥ सांडावे ते ॥ १८७ ॥

मोक्षानुकूळ वर्णधर्मा ॥ अनुकूळ जाण वीरोत्तमा ॥
तोचि आश्रमधर्मु ॥ येरु सांडावा ॥ १८८ ॥

मोक्षार्थुवर्णाश्रमधर्मु ॥ तदनुसारु तो कुळधर्मु ॥
तेथें जेणें भंगे आश्रमधर्मु ॥ ते क्रिया सांडावी ॥ १८९ ॥

ऐसा अविरुद्ध मोक्षेसीं ॥ आणि वर्णाश्रमोक्त कर्मेसीं ॥
तोचि आर्योपदेशु कुळाचारासि ॥ न संडवी जो ॥ १९० ॥

आता मोक्षधर्मा वर्णधर्मा ॥ आश्रमधर्मा कुळधर्मा ॥
आर्यधर्मा वीरोत्तमा ॥ सानकूळ जो ॥ १९१ ॥

तोचि जनपदधर्मु घेणें ॥ येरु अग्राह्य तो सांडणें ॥
एवं मोक्षार्थ जे जें करणें ॥ तोचि स्वधर्मु ॥ १९२ ॥

ऐसा स्वधर्मु तूं जाण ॥ विहिता कर्माचें अनुष्ठान ॥
मोक्षाचे परमसाधन ॥ यज्ञु बोलावा ॥ १९३ ॥

आतां हा धर्मु कैसा कळे ॥ आणि यथापूर्वी पाहिजे जें केले ॥
जेणेंवीण ना कळे ॥ विहिताचरण ॥ १९४ ॥

म्हणौनि कर्मानुष्ठानाची आदि ॥ जें लक्षण पाहिजे आधीं ॥
तेंचि सांगैन सुबुध्दी ॥ देई अवधान ॥ १९५ ॥

॥ स्वाध्यायः ॥ ००० ॥

तरि वर्णामाजि सुवर्णु ॥ प्राप्त जाला ब्राम्हणवर्णु ॥
तेथें पुरुषु आश्रमहीनु ॥ तो असोंचि नये ॥ १९६ ॥

तरि प्रथमचि जांण पांडवा ॥ ब्रम्हचर्याश्रमु धरावा ॥
तेथें अभ्यासू करावा ॥ सकळ वेदांचा ॥ १९७ ॥

वेदेंविण नाहीं जाण ॥ स्वधर्माविषयी पूर्णज्ञान ॥
म्हणौनि प्रथमाश्रेचि करुंन ॥ साधावा तो ॥ १९८ ॥

भैक्ष्यें देहरक्षूंनि ॥ इंद्रिये अवघी दंडूनि ॥
वेदुचि आधीं हा धनुःपाणी ॥ साध्य करावा ॥ १९९.॥

नित्यकरिता आध्येन ॥ वेदांक्षर राहे जाण ॥
ना तरि पडेखान ॥ ह्रदया माझारी ॥ २०० ॥

जरि तो स्वधर्मु पाहिजे ॥ मोक्षुमनी अपेक्षी जे ॥
तरि यत्नु करुंनि ठेविजे ॥ वेदु ब्राह्मणी ॥ २०१ ॥

यालागि सर्वकाळ आध्येन ॥ स्वधर्माचे असे साधन ॥
म्हणौनि ज्ञानप्राप्ती अधिकारचि हा ॥ कैसें नमनावें ॥ २०२ ॥

पठणयोगे अर्जुना ॥ करावी वेदाची धारणा ॥
मग वेदोक्ता आचरणा ॥ आचरावे गा ॥ २०३ ॥

तें वेदोक्त विहिताचरण ॥ करिता होये सत्वशोधन ॥
स्थिर बैसे ठाई मन ॥ दमु संपादे ॥ २०४ ॥

तैतें गुरुमुखे निघाले ॥ शिष्याह्रदयी प्रवर्तले ॥
ज्ञान जे दानी दिधलें ॥ पूर्ण पुरुषें ॥ २०५ ॥

तें मग ह्रदयीं प्रकाशे ॥ दिसावें तें तेंणें दीसे ॥
म्हणौनि निदानपूर्वी असे ॥ तें ऐसें साधना ॥ २०६ ॥

एवं पूर्वसाधन अवधारीं ॥ जालें असता बरवयापरी ॥
सद्‌गुरु तो कृपा करी ॥ दें ज्ञानाख्य धना ॥ २०७ ॥

आतां तयाचिया पाळना ॥ काये करावें अर्जुना ॥
तें मी सांगैन सुजाणा ॥ तुजप्रती ॥ २०८ ॥

॥ तपः ॥ ००० ॥

नित्यश्रवण नित्यमनन ॥ निदध्यासाचें साक्षात्कारी रमण ॥
निरंतर ॥ २०९ ॥

सद्‌गुरुचा जो अंकितुं ॥ तो नित्य अपेक्षीये कांतु ॥
लयाविक्षेपाचा धातु ॥ करुं प्रवर्तला ॥ २१० ॥

आत्मज्योति आत्मरति ॥ आत्मगति आत्मस्थिति ॥
आत्मसुख आत्मविश्रांती ॥ निरंतरा ॥ २११ ॥

मनाबुद्धी इंद्रियांते ॥ फुटो नेंदीं जो निरुतें ॥
आत्मतत्वींचि तयांते ॥ निमग्न करी ॥ २१२ ॥

नित्यसंकल्पाचा त्यागु ॥ नित्य अविनाशु सत्संगु ॥
नित्य अभ्यासी राजयोगु ॥ राजा योगी ॥ २१३ ॥

चहुं अवस्थांचां खेळी ॥ न रंजे जो कवणें काळीं ॥
नित्यानंदाची नवाळी ॥ तेथूंनि न सुटे ॥ २१४ ॥

आसन मुद्रा ध्यान ॥ भंगे जयाचे जाण ॥
अंतरी गुरुवाक्याचे जतन ॥ तोचि करी ॥ २१५ ॥

गेलें चित्तु आवरितुं ॥ सरले मीपण गाळितु ॥
जाली कल्पना विसरुतु ॥ आंगे आंगा ॥ २१६ ॥

स्वपर अनुसंधान ॥ तयाची नेणें खूण ॥
मन तें गगनासमान ॥ करुनि ठाये ॥ २१७ ॥

विसरेंचि विसरु खाये ॥ अविसरें विसरु पाहे ॥
मग असावा तैसा राहे ॥ योगशील ॥ २१८ ॥

आठवे केला पैसु ॥ तै जो तेथें उदासु ॥
विवेकें जऱ्हीं दिवसु ॥ उगवला असे ॥ २१९ ॥

सांगितली येकि खूण ॥ तियाबोधी निजमन ॥
तै सहस्त्रा खूणा लागून ॥ दिसतचा होये ॥ २२० ॥

ऐसा रात्रि आणि दिवसु ॥ करणें आत्मअभ्यासु ॥
तेंचि तप आणि जपु ॥ येर वावो ॥ २२१ ॥

आत्माभ्यासु हे तप ॥ करितां होईजे निःपाप ॥
केवळ परब्रह्म स्वरुप ॥ उपाधी वेगळें ॥ २२२ ॥

साधनाचें सिद्धपण ॥ तेथिचि हेचि खूण ॥
जे लयविक्षेपविहिन चित्त होये ॥ २२३ ॥

मग तेणें चित्तें पार्था ॥ स्वरुपी होये अखंडता ॥
निर्विकल्पी नित्यता ॥ आपेंआप ॥ २२४ ॥

मग तयानंतरे बारे ॥ सेवटील चिन्ह जें खरें ॥
तेंचि येणें उत्तरें ॥ आतां सांगैना ॥ २२५ ॥

॥ आर्जवं ॥ ००० ॥

व्यतिरेकें जालें आत्मज्ञान ॥ तेणें कळलें शुद्ध अधिष्ठान ॥
आतां अन्वयें विश्वब्रह्मबोधन ॥ आर्जव म्हणिजे ॥ २२६ ॥
आत्मव्यतिरेकें कें प्रकृति ॥ प्रकृतीवीण गुणसुमती ॥
गुणावेगळा नाथी ॥ सकळ प्रपंचु ॥ २२७ ॥
देहें अवस्था अभिमानी ॥ प्रपंचु भासे जो जो गुणी ॥
तो गुणावेगळा निदानी ॥ नसे कांहीचि ॥ २२८ ॥
म्हणौनि भान तें गुणाचि ॥ गुण ते आत्मप्रकृतीचि ॥
प्रकृति म्हणिजो तो आत्माचि ॥ ऐसें असतां ॥ २२९ ॥
आत्माचिं हे सकळ भान ॥ जाणणे आर्जव म्हणौनि म्हण ॥
निर्वाणिची विज्ञान खूण ॥ हेचि येकी ॥ २३० ॥
आत्मज्ञाने विश्वभान ॥ आत्मज्ञाने आत्माज्ञान ॥
आत्ममय विश्वजाण ॥ येणें विचारें ॥ २३१ ॥
जे जया ये प्रतीती ॥ जोवीण जे कांहीं नाथी ॥
तोचि तें यये अर्थी ॥ भ्रांतिकायिसी ॥ २३२ ॥
सत्यावेगळें काये असे ॥ मातें आभासे वसे नाशे ॥
मृगजळा नेणती माणुसें ॥ ती हरणें होती ॥ २३३ ॥
असो व्यतिरेके जे निरस्त ॥ तें अन्वयें आपणु समस्त ॥
जाणिजे ऐसें मत ॥ जाण आर्जवाचे ॥ २३४ ॥
तेथें अरिमित्र समान ॥ आत्माचि आप परावें भान ॥
आपणावेगळें त्रुण ॥ तेंहीं नसें ॥ २३५ ॥
ऐसीं मुख्यें चिन्हें सांगीतली ॥ ज्ञान वोळखावे या पाउली ॥
आतां यया पासाव उपजली ॥ ती चिन्हें कैसी ॥ २३६ ॥
आत्माचिये विश्व पाहातां ॥ चिन्हें होती संतां ॥
ती सांगैन मी आतां ॥ देई अवधान ॥ २३७ ॥

**श्लोक**

अहिंसा सत्यमक्रोधस्तागः शान्तिरपैनुनम् ॥
दया भूतेष्वलोलुप्तवं मार्दवं हीरचापलम ॥ २ ॥
अ. १६ ॥ श्लोक क्र. २ ॥

## ॥ अहिंसा ॥

व्यतिरेकान्वये सिद्ध जालें ॥ ज्ञान सर्वत्र येक आपुलें ॥
तयाचे चिन्ह पहिले ॥ बाह्य दृष्टी ॥ २३८ ॥

भूतीं न स्फुरे भेदु ॥ न करी कव्हणाचा वधु ॥
क्षोभविलाही परिबाधु ॥ न करी आणिकातें ॥ २३९ ॥

आपणा वाइट होआवें ॥ ऐसे सांग कवणाभावे ॥
आता विश्व हें विश्व नव्हे ॥ आपणुचि जरी ॥ २४० ॥

तरि कवण वैरी मानावें ॥ पीडावें अथवा वधावें ॥
म्हणौनि सर्वत्र हिंसा न करवे ॥ ज्ञानयांसि ॥ २४१ ॥

आतां तू म्हणसील ऐसें ॥ जें ज्ञात या गुणध्यासें ॥
आपणावेगळें भासे ॥ प्रपंचभान ॥ २४२ ॥

जंवं तो मोडे अध्यासु ॥ तंवं कैसा आवरी पुरुषु ॥
आपपर हा भासू ॥ अवगमे जे ॥ २४३ ॥

व्यतिरेकान्वयज्ञान ॥ नित्यनित्य सत्वेंकरुंन ॥
आता तयानाही नित्यपण ॥ शुद्धासत्वा ॥ २४४ ॥

तमे पडे विस्मृति ॥ रजें उठी प्रवृत्ति ॥
तै भूतभेदु प्रतीती ॥ येवोंचि लागे ॥ २४५ ॥

भूतभेदु जेथें आभासला ॥ तेथें कामुक्रोधु न वचे छेदिला ॥
परपीडेचा आथिला ॥ तोचि बीज विशेषु ॥ २४६ ॥

तरि अर्जुना येक जाण ॥ जयाचां देहीं ज्ञान ॥
तया आत्मइतर भान ॥ गमे गुणाध्यासें ॥ २४७ ॥

तै तैं भेदवृत्तीचें स्फुरण ॥ कृधेसींसहित होये उत्पन्न ॥
ज्ञाने जळालें कठीणपणा ॥ तें उडोनि गेलें ॥ २४८ ॥

जेजे तनुदृष्टी दिसे ॥ ते आत्मत्वें जरी न भासे ॥
तऱ्ही आपणासमान भासे ॥ सजीवबुद्धी ॥ २४९ ॥

दुःखानुभवें आपुलेंनि ॥ परावया प्रति जालें मानी ॥
पैल पिप्पळिकेचां मरणी ॥ स्वये मेळा होये ॥ २५० ॥

परदुःखे दुखवंतु ॥ परहानी चिंताग्रस्त ॥
परनाशें शोकबहुतु ॥ प्रीति परहितां ॥ २५१ ॥
केली पीडा ते साहे ॥ परिदृष्टी उघडूंनि न पाहे ॥
पाहतां परावया भय होये ॥ जयापरी ॥ २५२ ॥

सर्व आत्मा ययाचा ॥ कीं आत्मा हा सर्वांचा ॥
ऐसा कृपायोगु जयाचा ॥ विश्वाचां ठांइं ॥ २५३ ॥
वैरी मित्रु आपपरु ॥ अभयदाता आणि तस्करु ॥
सारिखाचि पुत्रु विखारु ॥ भुजंगु तया ॥ २५४ ॥

परदुःखे दुखवण ॥ हे न सुटे जया कारणें ॥
तयाचेनि हिंसा बोलणे ॥ बोलावेंचि नलगे ॥ २५५ ॥
सर्वत्रा भेददर्शन ॥ ऐसी निष्ठा जयालागूंन ॥
ना तया भूतहिंसा जाण ॥ घडेचिना ॥ २५६ ॥

आतां बाहे दृष्टी भेदु पाहे ॥ तंवं कृपेचि माजीं तें बुडोंनि जाये ॥
ना आत्मसमानता ठाये ॥ तेथें हिंसा कैंची ॥ २५७ ॥
स्वरुपान्वयाची खूण ॥ ज्ञानें उमटे वेद्यमान ॥
आतां गुप्तजालेंही ज्ञान ॥ तऱ्ही परंतु ॥ २५८ ॥

कृपान्वयें येकरुपत्ता ॥ स्वसमान सुखदुःख जाणतां ॥
भेददृष्टीही विश्व पाहातां ॥ येकत्व न चुके ॥ २५९ ॥
परदुःखे दुखवणें ॥ परसुखें सुखी होणें ॥
येकात्मतेचीं चिन्हें ॥ सहजऐसीं ॥ २६० ॥

पाथरु लागे चरणा ॥ न साहावे तें नैना ॥
करिती तयाची संबोखना ॥ दोन्ही कर ॥ २६१ ॥
सोनटकापडें हातीं ॥ तेणें संतोषु होये चित्तीं ॥
सर्वांगीं हर्षोत्पत्ति आपेंआप होये ॥ २६२ ॥

एकात्मतेचें लक्षण ॥ ऐसेंचि विश्वीं होये उत्पन्न ॥
तैतें जाणावें ज्ञान ॥ हृदयीं आहे ॥ २६३ ॥
म्हणौनि अहिंसा उपलक्षूंन ॥ प्रकाशिलें हें येक लक्षण ॥
आतां दुजें ययासमान ॥ आन आहे ॥ २६४ ॥

**॥ सत्यं ॥ ००० ॥**

सत्यअसत्य पांडुसुता ॥ हे दोनीचि पदार्था पाहाता ॥
तिसरां नाहीं सर्वथा ॥ यये लोकीं ॥ २६५ ॥

यथामाजि सत्यअर्थु ॥ तोचि जयातें गमतु ॥
असंतु मिथ्या विवर्तु ॥ तो भासेचिना ॥ २६६ ॥

आतां सत्याची संभावना ॥ सत्याची नित्यकल्पना ॥
सत्यचि आवडे मना ॥ बोले तैचि ॥ २६७ ॥

असत्यही सत्याकारें ॥ ज्ञानवंतातें स्फुरे सत्य येक तया दुसरे ॥
तेंचि न वर्ते ॥ २६८ ॥

सत्याचे श्रवणमनन ॥ सत्याचे नित्यसेवन ॥
सत्याचें सत्य साधन ॥ सत्यत्वे आचरे ॥ २६९ ॥

ऐसा सत्यवादी ज्ञानवंतु ॥ सत्यप्रियु सत्यवंतु ॥
तो व्यवहारींही वर्ततु ॥ सत्यवर्ते ॥ २७० ॥

सत्यघेणें सत्यदेणें ॥ सत्यतेंचि व्यवहारीं बोलणें ॥
सत्यापासाव जिणें मरणें ॥ भलयें तेंहो ॥ २७१ ॥

की सत्य जें येक आहे ॥ तदर्थ लटिकेंही सत्य होये ॥
यापरी सत्याचेनि तात्पर्यें ॥ व्यवहारी वर्तणें ॥ २७२ ॥

सत्यब्रह्मसनातन ॥ तदर्थ असत्यही साधन ॥
प्रवृत्ति प्रकाश ॥ प्ररोचन ॥ तें असत्यही सत्य ॥ २७३ ॥

सत्याचे सत्य साधन ॥ तयातें हें असे कारण ॥
तरि (तें) सत्या ऐसे जाण ॥ प्रियकरावे ॥ २७४ ॥

असत्यही देह परी ॥ सत्यप्राप्तीची पाइरी ॥
तें आप परावे अवधारी ॥ शरीरसत्य ॥ २७५ ॥

तें जेणें सत्यें नाशे ॥ सत्य न बोलती तें विदुषें ॥
आतां जेणें असत्यें तेंन नसे ॥ ते असत्य सत्य ॥ २७६ ॥

सत्य सर्वत्र जें येक ॥ सत्य तयाचें वेदक ॥
जेणें होये तें प्रीतिपूर्वक ॥ कर्म भजावें ॥ २७७ ॥

भक्तिचे योगें कर्मयोगें ॥ केलें तें सत्यचि अवघें ॥
तें निपजे मनाआंगें ॥ तें मना सत्यचि ॥ २७८ ॥

जें मन जेणें राहें ॥ तें असत्यही सत्य आहे ॥
येर सत्य काजा नये ॥ असत्य होये ॥ २७९ ॥

यापरी अर्जुना जाण ॥ सर्वत्र सत्य येक अभिन्न ॥
तया सत्याचें अवलंबन ॥ सार्वकाल ॥ २८० ॥

तयाचे साधन ज्ञान ॥ तयाचें पाळण जेणें करूंन
तेचि सत्य मानूंन ॥ तदनकूल जें ॥ २८१ ॥

तें सर्व आश्रयणें ॥ येर असत्य तें सांडणे ॥
हे चिन्ह दुजें जाणे ॥ ज्ञानवंतांचें ॥ २८२ ॥

की सत्यम्हणीजे तें कायी ॥ भावते जयामाजि नाहीं ॥
ऐसा परमार्थु व्यवहारू तोही ॥ सत्याची प्रतिष्ठा ॥ २८३ ॥

**अक्रोधः ॥ ०० ॥**

आतां तिसरे आइक चिन्ह ॥ ज्ञानें निवालें जयाचें मन ॥
तयाचां हृदयीं स्थान ॥ नसे क्रोधातें ॥ २८४ ॥

सर्वत्र अभेदु ज्ञानें ॥ नित्य असतां जाणणें ॥
आणि सत्यतेंचि मने ॥ सेविलें असतां ॥ २८५ ॥

सत्वाचे केवळपण ॥ भावरहित तेथे ज्ञान ॥
तेथें दुजयाचे गुणागुण ॥ कळोंचि न यावे ॥ २८६ ॥

तेथें क्रोधा कैंची उत्पत्ति ॥ विषमबोधु जेथ नाथी ॥
अन्यगुणुभाति ॥ तयाची नसे ॥ २८७ ॥

आंगाचेनि सत्वें जाण ॥ इतराचें सक्रोधपण ॥
तयाचें आपणा ज्ञान ॥ ते असावेंचि ना ॥ २८८ ॥

जाण अमृताचा सागरीं ॥ विषाची नये लहरी ॥
जऱ्ही तो पाषाण अंतरी ॥ उचलुंनि घालिजे ॥ २८९ ॥

सरिता जल निर्मळ ॥ तयावरि हालें मुसळ ॥
तथापि तरंग सिंतोडे कल्लोळ ॥ शीतळचि अवघें ॥ २९० ॥

अंतरी निवाला जो पांडवा ॥ शब्दाचि वरूंनि जाणावा ॥
क्रोधें जळतियां तें विसांवां ॥ शांत करी ॥ २९१ ॥

पावका ऐसाही वरि पडे ॥ तो शांतूचि होये निवाडें ॥
परंतु उदकीं नाहीं वांकुडे ॥ शीतळतेसी ॥ २९२ ॥

अंतरिचे शीतळपण ॥ तयाचें हेचि लक्षण ॥
जेथें क्षोभविलेहीं मन ॥ न धरी क्रोधाते ॥ २९३ ॥

आपण क्रोधु न करणें ॥ केला दुजे न तो नेणणें ॥
परावें माणूस निववणे ॥ ऐसी अक्रोधता ॥ २९४ ॥

अहिंसा सत्य अक्रोधु ॥ यां तिहींचा ऐसा बोधु ॥
ज्ञानी असे स्वसिध्दु ॥ तोचि जाणे ॥ २९५ ॥

॥ त्याग ॥

आतां त्यागुलक्षण चौथे ॥ आइक सांगैन तूतें ॥
ज्ञान सत्वप्रधान जेथें ॥ तेथें हें वर्ते ॥ २९६ ॥

सवोत्कर्यें करूंन ॥ जयाचां ह्रदयीं ज्ञान ॥
तया बाह्यविषयांचे स्फुरण ॥ तेथें त्यागुवर्ते ॥ २९७ ॥

पुरे आइकोंनि श्रवणी ॥ ग्राम्यवादी गादनी ॥
मन न बैसे धनु:पाणी ॥ शास्त्रांचा वादी ॥ २९८ ॥

अतिजीर्णा पुराणकथा ॥ श्रमु वाटे तिया आइकतां ॥
धर्माधर्म व्यवस्था ॥ श्रमेतिया ॥ २९९ ॥

पूरे धर्मे अर्थे कामे ॥ आणि मोक्षवादें मनोरमे ॥
बहु बोलतां श्रमे ॥ ज्ञानवंतु ॥ ३०० ॥

रसनेचां ठाइं रसु ॥ आडळे तोचि सुरसु ॥
परंतु नाही सोषु ॥ स्वादुलाचा ॥ ३०१ ॥

देहो निर्वाहो मात्रु करणें ॥ तया काये करावीं सुमने ॥
परिमळ द्रव्येंआने ॥ आणि मुखस्वादकरें ॥ ३०२ ॥

उत्तम सेज आस्तीर्ण ॥ तयातें नापेक्षी मन ॥
अनित्या सेविता कवण ॥ आणी फळश्रेय ॥ ३०३ ॥

---

* बो - मूळपाठ - उँ (स्वभाउँ - स्वभावो)

रूपविशेषाचिया याती ॥ पावली याहीं चक्षुप्रति ॥
तथापि त्यागुचि तयांचा चित्ती ॥ परि भोगुनापेक्षी ॥ ३०४ ॥

दारा द्रव्यपुत्रादिका ॥ त्यागावेंचि वाटें सकळैक ॥
गेहे न वटे सुख ॥ ऐसा स्वभाऊ होये ॥ ३०५ ॥

नावडे संगु दुजयाचा ॥ योगु नावडे विषयांचा ॥
त्यागु सर्वदा भोगाचा ॥ मनापासूंनि ॥ ३०६ ॥

मागताचि जाला पुरे ॥ तया वंचावें हे न स्फुरे ॥
मार्गी भेटले नि तस्करें ॥ संवादु करी ॥ ३०७ ॥

त्यागबुध्दी अवंचकु ॥ गतामृताचा नाही शोकु ॥
सांडुनि लोकु लोकीकु ॥ सुखी जाला ॥ ३०८ ॥

असिंले तें जाणों नाही ॥ नसिलें ते न पाहिजे काहीं ॥
नाशलें ते हृदयीं ॥ आठवेचिना ॥ ३०९ ॥

असो आत्मइतर भान ॥ तें असंत ऐसें जाणोंन ॥
मग तये अर्थीं मन ॥ त्यागरूप सदा ॥ ३१० ॥

ऐसा असेतोचि त्यागु ॥ चौथेया लक्षणाचा योगु ॥
पुडती अइक प्रसंगु ॥ पांचवयाचा ॥ ३११ ॥

॥ शांतिः ॥

असंत अनित्य अनामिक ॥ योगें सुटले हें सकळैक ॥
आतां स्वस्थिती आले वेदक ॥ ते व्हेळी कैसें ॥ ३१२ ॥

निर्विकार निश्चळपण ॥ स्थितीं विरालें स्वस्फुरण ॥
जैसें महाप्रळयीचें जीवन ॥ नेणे चंचलता ॥ ३१३ ॥

केवळ आठउ ना विसरू ॥ स्फुरण आणि विकारू ॥
व्योमाहूंनि स्वस्थिरू ॥ भावो जाला ॥ ३१४ ॥

तया बाह्यशांति उपजली ॥ ते काये कवणें आणिली ॥
सांडितांही जाये सुटली ॥ ऐसी नव्हे ॥ ३१५ ॥

गति सांडिली चरणी ॥ निर्व्यापारी कर दोन्ही ॥
वाचा बुडालिया मौनी ॥ सार्वकाळ ॥ ३१६ ॥

दृष्टी न पडे रूपादिके ॥ श्रवणी शब्द नाइके ॥
देखे देह राहिलें सकळैक ॥ निद्रिता ऐसें ॥ ३१७ ॥

अज्ञानेविण वीरा ॥ बाह्यांतरीं जाण निद्रा ॥
चित्त तया आनंद सागरा ॥ माजि बुडालें ॥ ३१८ ॥

निष्ठेहीवीण परि ॥ शांति जयाचां शरीरीं ॥
गुणवेग तें अंतरी ॥ क्षीण जाले ॥ ३१९ ॥

काया ही नाचें जाणें येणें ॥ सांग कैसें घेणे देणें ॥
सकळ व्यापारकरणें ॥ इच्छेवाचूंनि ॥ ३२० ॥

कामक्रोधींसुटला ॥ अंतरी अभिमाने सांडवला ॥
तो बाह्य न क्षोभे क्षोभविला ॥ ऐसा शांतु ॥ ३२१ ॥

अवनी अमृताचिया धारा ॥ नयनी संतोषाची मुद्रा ॥
गात्रें तीं आनंदसागरा ॥ मांजुनि उपजलीं ॥ ३२२ ॥

साखरे सर्वांगीं गौळ्यता ॥ नाना कल्मष पहा अमृता ॥
नाही तैसी सेवितां ॥ शांतु सर्वांगे ॥ ३२३ ॥

आप परावा समान ॥ शरीरीं आत्यंत शांतपण ॥
रजतम वेग गहन ॥ ते गेले जळोंनि ॥ ३२४ ॥

ऐसि ये शांती पावैल ॥ उपजती विषमभाव ॥
बाह्य अभ्यंतर सर्व ॥ निर्विकार जालें ॥ ३२५ ॥

यये शांतीपासूंन ॥ साचे कैसें असेल क्षण ॥
तयाची आइक खूण ॥ सांगिजैल ते ॥ ३२६ ॥

॥ अपैशुनं ॥

परावयाचें उणें ॥ मागे पुढें नाहीं बोलणें ॥
बोले तै दूषणें ॥ पूर्वोक्त चिन्ह ॥ ३२७ ॥

पैशून बोलतांचि अर्जुन ॥ पैसु होये अभिमान ॥
उत्पत्ति तेचि रजोगुण ॥ तमाचें बीज ॥ ३२८ ॥

पैशून बोलतांचि अंशु ॥ तोचि व्दैताभिनिविशु ॥
ज्ञान बुडालें हा प्रकाशु ॥ समस्तां जाला ॥ ३२९ ॥

सकळां पापाचें कारण ॥ उत्तमा लक्षणाचे दहन ॥
दुष्टां चिन्हाचि खूण ॥ पैशुन जाणावे ॥ ३३० ॥

सकळां पापाची सामग्री ॥ कवणा सभाग्यांचां घरी ॥
जो परावयाची निंदा करी ॥ तया वाचून ॥ ३३१ ॥

अर्जुना पर नेणे सत्य भान ॥ आत्मत्वी बुडालें मीपण ॥
माळवले पदीं गुण ॥ लक्षण तयाचें ॥ ३३२ ॥

परावी निंदा न करणें ॥ आत्मश्रेष्ठ ते कारणें ॥
अंतरिचीं उत्तम लक्षणें ॥ त्याचें हे चिन्ह ॥ ३३३ ॥

आतां पूर्वाध्यासें करून ॥ भासलेंहीं आत्म इतर भान ॥
तेथें येक ज्ञाते येक अज्ञान ॥ ऐसें हीं जन्हीं ॥ ३३४ ॥

येक चर येकि अचर ॥ जीव वर्तती अपार ॥
आपणा नावेक इतर ॥ ऐसे आभासले ॥ ३३५ ॥

॥ भूतेषु दया ॥ ००० ॥

तऱ्हीं सकळां भूतांचां ठांइं ॥ दयाचि द्रवे जाणयीं ॥
अत्यंत कृपा हृदयी ॥ प्रकटती होयें ॥ ३३६ ॥

मी उपवासीं असेन ॥ परंतु ययातें अन्न देईन ॥
पर प्राणाची जतन ॥ निज प्राणी करी ॥ ३३७ ॥

अति वृध्दे आणि बाळकें ॥ यातें कृपादृष्टे देखें ॥
अनाथां देखोनि आइकें ॥ प्राणु टाकी ॥ ३३८ ॥

कव्हणी पीडी कव्हणातें ॥ तिथें बोडवी आपणातें ॥
हे सहज लक्षण ज्ञात यातें ॥ उपजे न उपजविता ॥ ३३९ ॥

व्यथा परावी न देखवे ॥ अडळें सांडूंनि न वचने ॥
परहिता स्वहित वेचावे ॥ ऐसा आदरू ॥ ३४० ॥

आत्महितार्थ जोडिलें ॥ तें परहितार्थ वेचिलें ॥
दुजें तें जालें ॥ आपुलें प्राणाहूंनि ॥ ३४१ ॥

विश्व सुखी असावें ॥ विश्व ईश्वरी भजावें ॥
विश्वविमुक्त होआवें ॥ ऐसा भाऊ ॥ ३४२ ॥

ऐसिया या अनासक्ता ॥ विश्व परिग्रहो आसक्ता ॥
परकृपेस्तव अभिजाता ॥ जालें आप परावें ॥ ३४३ ॥

क्रीमु कीटु पशुपक्षी ॥ आदि करूंनि सकळां भूतांसि ॥
बरवें हे हें अपेक्षी ॥ आपुलेनि सुकृतें ॥ ३४४ ॥

परहिता प्राणु वेचणें ॥ ये कीं स्वलाभा कारणें ॥
मायिक दुःखें दुखवणे ॥ तैसें हें नव्हें ॥ ३४५ ॥

॥ अलोलुप्त्वं ॥ ०० ॥

परिहिती असोंनि साक्षेपु ॥ स्वस्वार्थी ज्ञानी अलोलुपु ॥
म्हणौनि अलोलुपत्व कंपु ॥ तयातें नसे ॥ ३४६ ॥

सहस्त्राचा दिसो लाभु ॥ परि नुपजे अंतःकरणी क्षोभु ॥
प्राप्ताचा नाही लोभु ॥ वेची परार्थ ॥ ३४७ ॥

अरिष्ट जाऊ प्राणावरूंन ॥ परि कवडी ते नव्हो विघ्न ॥
नीचाचे धरी चरण ॥ द्रव्यासाठी ॥ ३४८ ॥

येक अन्नअन्नचि करी ॥ येक मरे क्षेत्रावारीं ॥
येक आपुलेंहीं शरीरीं ॥ भोगुंच म्हणे ॥ ३४९ ॥

तया लोलुपांची कथा ॥ येथें काइसी पार्था ॥
यया अलोलुपा दाता ॥ ईश्वरू कां नव्हे ॥ ३५० ॥

कार्पण्य दैन्य विहिना ॥ देहींचि लौल्यता असेना ॥
संसारी मोक्षीं आकांक्षणा ॥ मात्र नाहीं ॥ ३५१ ॥

अन्न देखोंनि धांवैल ॥ द्रव्य देखोंनि हातु पसरील ॥
नेत्र या तस्करा झोंबैल ॥ ऐसें कैंचें ॥ ३५२ ॥

मोक्षार्थ होये अळुका ॥ तै चुकली ते आत्मभूमिका ॥
असो पदार्थी कुरूटिलका ॥ अलोलुपपण ॥ ३५३ ॥

सर्वां भूतीं तैसी दया ॥ ऐसी अलोलुपता वीरराया ॥
आतां नववे लक्षण वरि ॥ यया तेंचि कैसें ॥ ३५४ ॥

॥ मार्दव ॥ ०० ॥

मंजुळ आणि मृदुवचन ॥ सर्वथा न बोले कठीण ॥
जयाचा हृदयीं ज्ञान ॥ सत्वें आथिलें ॥ ३५५ ॥

साधु दर्शनी नम्रता ॥ हें अपूर्व नव्हे ना पार्था ॥
ज्ञानी देखोंनि सर्वांभूतां ॥ सारिखाचि नम्र ॥ ३५६ ॥

मनाचां ठांइं कोमळपण ॥ नाना मृदाचें कैसे लक्षण ॥
जैसें केलें आपण ॥ तैसेंचि होये ॥ ३५७ ॥

सांगीतले तें कळों लागे ॥ हे अपूर्व नव्हे तया जोगे ॥
अल्प निरोपणाचेनि आंगे ॥ बहुसाल कळें ॥ ३५८ ॥

बुध्दीचें केवळ मृदपण ॥ तें भेदिक सर्वदा जाण ॥
होआवेंचि आथी निरोपण ॥ तंव खूण पावे ॥ ३५९ ॥

कामावला जैसा वारू ॥ न साहे तरू दुखां करू ॥
दोरे न धारे धरू ॥ धारक जन्हीं ॥ ३६० ॥

बुध्दीचेनि मृदपणें ॥ आगळे होये जाणणें ॥
तंवं मनाचेनि मार्दवें तेणें ॥ योगु राहे ॥ ३६१ ॥

बुध्दी अधीन जालेपणे ॥ आगळें होयें जाणणें ॥
व्योमाहूंनि मृद होणे ॥ मार्दव घेतलें पवनें तै ॥ तो हारपे जैसा ॥ ३६२ ॥

चित्त गुंपलें अनुसंधानी ॥ तें तेथेंचि विरे मृद म्हणौनि ॥
ध्याता ध्येय ध्यान तिन्ही ॥ गळोंनि जाती ॥ ३६३ ॥

अहंकारु मार्दवा आला ॥ तो कठिणा अहंकृती सुटला ॥
निर्विकल्पीं असता ठेविली ॥ नीटु नव्हे ॥ ३६४ ॥

अंतःकरणाचे स्फुरण ॥ न धरी तयांतें मृद म्हणौन ॥
कापुरा घेतां जीवन ॥ तो जैसा होये ॥ ३६५ ॥

निजधर्मी शीतळ होणें ॥ ऐसें मृदत्व तुंवां मानणें ॥
केवळ निर्विकार असणें ॥ ऐसा भावो ॥ ३६६ ॥

अथवा मृदाची कैसी याती ॥ की जे तैसें होये वीरपती ॥
म्हणौनि तीं तिये गुरुयुक्ती ॥ अधीने जाली ॥ ३६७ ॥

दमा अधीन लवती ॥ कर चरण आसन युक्ति ॥
येरां कर्म करणाराची गती ॥ ते अधीन योगा ॥ ३६८ ॥

ज्ञान करणाचें मृदपण ॥ तें विवेकाअधीनपण ॥
सुपतठी वळितां कठीणपण ॥ ती न करीतीचि ॥ ३६९ ॥

कारणामाजि सामावति ॥ सोडिली हीं उठू न शकती ॥
ऐसा गळाला अहंकृती ॥ मार्दवें देहो ॥ ३७० ॥

मृद बोलणें पाहाणें ॥ घेणें देणें चालणें ॥
दुजया बाधु जेणें ॥ प्रकारें नव्हे ॥ ३७१ ॥

ऐसे सात्विकांचें मृदपण ॥ ज्ञानविज्ञानयुक्त जाण ॥
आतां दाहावें चिन्ह ययापासूंन ॥ तेंचि कैसें ॥ ३७२ ॥

॥ ह्रिः ॥ ००० ॥

अर्जुना आपणा विहित ते नव्हे ॥ आणि तें पडलें करावें ॥
तै साधूंप्रति लाजावें ॥ सर्वथैव ॥ ३७३ ॥

आंगी वेषु यतीचा ॥ वरि संग घडे स्त्रीचा ॥
तै साधूंतें देखोनि मुखाचा ॥ चंद्र उतरावा ॥ ३७४ ॥

द्रव्याची उपजे वासना ॥ तै लाजवावें मनेंमना ॥
आपणु इतरु आपणा ॥ आत्महितार्थ ॥ ३७५ ॥

आश्रमार्थ वेचु करी ॥ आणि क्षोभे अतिथीवरि ॥
तैं आपचि स्वमुखावरि ॥ लाजा हाणावें ॥ ३७६ ॥

संध्येचा लोपु करी ॥ तै मनेंमन धरि जे पदरीं ॥
दुजा न देखे तें जऱ्ही ॥ तऱ्हीं देखे मन ॥ ३७७ ॥

जळो हा तुझा वेषु ॥ जळो आंगीचा अलसु ॥
जळो मुखाचा उल्लासु ॥ काळें नव्हे ॥ ३७८ ॥

परद्रव्यावरि धावे ॥ तेणें मने मुख ना दावावें ॥
मना भिउंन कोठें जावें ॥ मरावें गा ॥ ३७९ ॥

परस्त्रीवरि होता वासना ॥ काळीक यावी वदना ॥
मन थुकी मना ॥ धिग्य म्हणें ॥ ३८० ॥

ग्राम्यवाद आइकतां ॥ काळ जाये वृथा ॥
तेणें संतोषु बहुतां ॥ परि आपण लाजावें ॥ ३८१ ॥

क्रीडा विनोदें काळ फिटे ॥ तेणें मुर्खां सुख वाटे ॥
परंतु मनी मानावें वोखटें ॥ तेंचि कैसें ॥ ३८२ ॥

मातें साधू काये म्हणतील ॥ वसिष्ठादिक हांसतील ॥
जळो हे ज्ञान विफळ ॥ ऐसें मानावें ॥ ३८३ ॥

वैराग्य दावीं जनी ॥ आणि ठेवा अपेक्षीं मनी ॥
तै जळो हे माझी करणी ॥ अभाग्याची ॥ ३८४ ॥

रसनेचां ठांइं अळुकेपण ॥ जळों हें माझें ज्ञान ॥
दंभार्थचि जाणपण ॥ अवघें गेलें ॥ ३८५ ॥

दृष्टि चुकवी लोकांची ॥ परि देखावें तो मी देखेंचि ॥
हे करणी जयाची ॥ तया तेंचि नाशु ॥ ३८६ ॥

लोकदृष्टी दाविली ॥ परि संध्या नाहीं केली ॥
ते माझी म्या देखिली ॥ आणि येणें सूर्यें ॥ ३८७ ॥

येरीं देखोंनि काये ॥ न देखिलेनि काज होये ॥
माझे कुकर्म मी पाहें ॥ जाणें अहिता ॥ ३८८ ॥

यापरी अधमी प्रवर्त्ततां ॥ लाजावें आपणापयां मुख्यता ॥
देवां महर्षी समस्ता ॥ महानुभावातें ॥ ३८९ ॥

॥ अचापलं ॥ ००० ॥

दाहावी लज्जा पार्था ॥ आतां अकरावीं अचपळता ॥
ज्ञानशीलां सत्ववंतां ॥ चिन्ह असे ॥ ३९० ॥

पुरे जालें जाणें येणें ॥ पाद चापल्यें पडले उणे ॥
कर सांडूनि देणें घेणें ॥ स्वस्थ होत्ति ॥ ३९१ ॥

वाचा निमालिया च्यान्ही ॥ चंचळता नुपजे बाह्यशरीरी ॥
मग जैसातैसाचि अवधारीं ॥ जेथिचा तेथें ॥ ३९२ ॥

निमिषोन्मेष हारपले ॥ नेत्र तटस्थ राहिले ॥
पाचही प्राण पांगुळले ॥ धर्महीन ॥ ३९३ ॥

कल्पना विसरलें मन ॥ उगेंचि ठेलें अंतःकरण ॥
अहं ऐसें स्फुरण ॥ तें उपजेचि ना ॥ ३९४ ॥

चित्त नाश्रयी पदार्थातें ॥ बुद्धिने धे बोध्दव्यातें ॥
ऐसें व्योमापरी स्वस्थतें ॥ स्वरुप ठेलें ॥ ३९५ ॥

तेथे तन्मयाकारे अघवीं ॥ अचळें ठेलिं आत्मभावीं ॥
ऐसी लक्षणे बरवीं ॥ प्राप्तें असता ॥ ३९६ ॥

बाह्य चिन्हे अपारे ॥ असती यां अनुसारें ॥
ती सांगैन समग्रे ॥ मुख्ये तुज ॥ ३९७ ॥

**श्लोक**

तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ॥
भवन्ति सम्पदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥

अध्याय १६-३

॥ तेजः ॥

मागां सांगीतले निश्चलपण ॥ तें असावधानतेचे कारण ॥
म्हणौनि तिचें निराकरण ॥ करावया ॥ ३९८ ॥

तेज म्हणिजे जाण पार्था ॥ बाह्यांतरीं सावधानता ॥
पूर्वोक्त निश्चलता ॥ असतां अंगी ॥ ३९९ ॥

दीप कळिकेचें निश्चळपण ॥ जैसें ठांइ के ठांइं प्रकाशमान ॥
आणि दुसरी जाति आपण ॥ आंगी न साहे ॥ ४०० ॥

तैसी बाह्यातरीं सावधानता ॥ ते आंगीं न साहे द्वैता ॥
लया विक्षेपा पार्था ॥ भस्म करी ॥ ४०१ ॥

आंगी न साहे विसरु ॥ तम तेज गुण व्यापारु ॥
जेथ चपळता हा समीरु ॥ वर्तेचिना ॥ ४०२ ॥

तेज तें प्रकाश रुप आहे ॥ तेज तें जें द्वैत न साहे ॥
तेज आंगिंचिया खाये ॥ जडत्वातें ॥ ४०३ ॥

ऐसें तेज सावधानता ॥ असति या अचपळता ॥
आतां व्यवहारी वर्त्ततां ॥ कवण लक्षण ॥ ४०४ ॥

॥ क्षमा ॥

तेजाचेनि अतिमानें ॥ द्वैताचा स्पर्शु न साहाणें ॥
संग्रामी न साहे उणें ॥ क्षत्री जैसा ॥ ४०५ ॥

तैसें योग संग्रामी योगिया ॥ अतिसावधानता आपुलिया ॥
अन्यथा भासु वीरराया ॥ न साहे म्हणतां ॥ ४०६ ॥

असहिष्णुता ऐसी भासे ॥ रोषावेणु वर्त्ते गमे ऐसें ॥
तरि तो भाऊ मानसें ॥ तुवा न कल्पावा ॥ ४०७ ॥

जयाचां हृदयी ज्ञान ॥ तया इतरत्वे नावडे भान ॥
परि आत्मान्वयें सहन ॥ कां कृपेचेनि अंगे ॥ ४०८ ॥

बाधकु बाधूचि जाणें ॥ तें सर्व क्षमाचिं कीजे येणें ॥
आला आघातु साहाणें ॥ मरणा ऐसा ॥ ४०९ ॥

निंदकांचा हा आत्मा ॥ निंदकु ययाचा वीरोत्तमा ॥
गुह्य सकळ काय मा ॥ गोप्य करी ॥ ४१० ॥

वैरी आला वैरभावें ॥ तया उपदेशी हित बरवें ॥
तो पीडी परि ते अघवे ॥ क्षमाचि करी ॥ ४११ ॥

परि ग्रहें दाटला भारी ॥ परि दातीं नये कव्हणा बरी ॥
आपपरावी सोइरी ॥ सारिखी देखे ॥ ४१२ ॥

धरुंनि नेइजे वेठी ॥ तैं बैसविला तेथूंनी नुठी ॥
घागरि बळे घे मोटी ॥ पाणी वाहे ॥ ४१३ ॥

मार्गी भेटे तस्करु ॥ तो सर्वस्व अवघें हरु ॥
परि तयातें सांगे विचारु ॥ पळावयाचा ॥ ४१३ ॥

व्याघ्र सर्प रींसादिक ॥ येही दिधले असता दुःख ॥
तें साहेचि आंगी सकळैक ॥ परी न मारी तयां ॥ ४१४ ॥

वृश्चिक आंगावरि खेळती ॥ न चले तयाची शांति ॥
साहे बाधा भलयती ॥ प्राप्तजाली ॥ ४१५ ॥

अधिभौतिक अध्यात्मिक ॥ दुःख वाटे अधिदैविक ॥
परंतु आंग न करी तें दुःख ॥ देखोनियां ॥

असा तो अमृताचा सागरु ॥ मारका विषाचा उतारु ॥
क्षमावंतु जो नरु ॥ तो सर्व साहे ॥ ४१६ ॥

पृथ्वीची जैसी क्षमा ॥ अवधारीं गा वीरोत्तमा ॥
कैसा सहनशील ते सीमा ॥ ते असेचि ना ॥ ४१७ ॥

पाताळ पावें तंवं येकु खाणें ॥ येकु पूजी येकु हाणे ॥
येकु कृषिवल अतिमाने ॥ पाठि फोडी ॥ ४१८ ॥

तथापि अर्जुना ते पृथ्वी ॥ सकळांचे मनोरथ पुरवी ॥
अपराध कव्हणाचे नाठवी ॥ दावी निज गुणातें ॥ ४१९ ॥

ऐसी क्षमासहिष्णुता ॥ तेरावें लक्षण तत्वता ॥
आता चौदावे सर्वथा ॥ लक्षण अवधारी ॥ ४२० ॥

नातरि नाइकें सुभटा ॥ क्षमाचि मानिसी निष्ठा ॥
हे येक चिन्ह सत्वनिष्ठा ॥ अपारे ऐसी ॥ ४२१ ॥

**धृत्तिः ॥ ००० ॥**

धृत म्हणिजे धारणा ॥ ते श्रेष्ठ लक्षण अर्जुना ॥
आइक तयाची विवंचना ॥ सांगिजैल ते ॥ ४२२ ॥

स्व स्वरुपाचें संज्ञान ॥ तें स्वरुपा कारेंचि धरावें जाण ॥
सत्ताचि चिन्मयी सनातन ॥ आत्मयाची ॥ ४२३ ॥

सकळां इंद्रियां विषयांचें ॥ ज्ञान चैतन्य आंगिचें ॥
ते स्व स्वाकारें जेथिचें ॥ तेथेचि धरावें ॥ ४२४ ॥

देहें अवस्था विषय ॥ भान निरसूंनि ज्ञेय ॥
अधिष्ठान तत्वज्ञेय ॥ तेचि जाणता ॥ ४२५ ॥

स्व स्वाकारें स्वस्थिती ॥ स्वसंवेद्यता आइती ॥
ऐसी अनुभवाची धृति ॥ येकनिष्ठ धारणा ॥ ४२६ ॥

स्वरुपाकार संवेदन ॥ तेथें सुख असाधारण ॥
अखंड आत्मयाचें पूर्णपण ॥ निर्विकल्प असतां ॥ ४२७ ॥

तद्रुपचि मन धरिजे ॥ संकल्प उपजोचि नें दिजे ॥
चंचळता ग्रासूनि राहिजे ॥ निजात्मस्थिती ॥ ४२८ ॥

तै प्राण होता निश्चळ ॥ तैसेचि राखावे ते सकळ ॥
जया युक्ती चंचळ ॥ मावस नव्हे ॥ ४२९ ॥

जेणे अनिरोधे मन चळे ॥ जेणे निरोधे योगा न मिळे ॥
मन ते धारणा कुशळे ॥ नये अवलंबु ॥ ४३० ॥

जिया युक्ती मन फावे ॥ फावलाते चंचळ नव्हे ॥
तियाचि युक्ती धरावे ॥ पांचही प्राण ॥ ४३१ ॥

सहज मनसुली न ॥ सहज क्षीण होती प्राण ॥
सहज धारणेची खूण ॥ तेचि राखावी ॥ ४३२ ॥

चंचळ धर्माचें सांडणे ॥ तो करण व्यापारुचि आवरणे ॥
परि स्वासोस्वास अवरोधणें ॥ ऐसें नव्हें ॥ ४३३ ॥

सहजात्मज्ञान अर्जुना ॥ तेथें सहज मनाची धारणा ॥
सहज नियमु जाला प्राणा ॥ तितुलाचि पुरे ॥ ४३४ ॥

एवं मन बुद्धी आणि प्राण ॥ जिया युक्ती पाहिली जाण ॥
तियाची युक्ती बाह्य करण ॥ तैसेंचि नियमाचे ॥ ४३५ ॥

जिया युक्ती अखंडता ॥ न भंगे समाधीची पार्था ॥
मना बुधी निमग्नता ॥ स्वस्वरुपी ॥ ४३६ ॥

नव्हे परि तेचि आसन ॥ नव्हे परि तेची मुद्राबंधन ॥
बैस के आगळें शयन ॥ समाधिस्थाचें ॥ ४३७ ॥

तैसेचि राखावें शरीर ॥ तैचें वक्रतेंही अवक्र ॥
ऐसी धारणा पवित्र सभाग्याची ॥ ४३८ ॥

उभा तरि बैसों न म्हणें ॥ बैसला तै उठूं नेणे ॥
निदैला जाण प्राणें ॥ सांडिला पुरुषु ॥ ४३९ ॥

उघडी तरि न लवी नयन ॥ लावी तै नुघडी मागुतेना ॥
वांकुडे तेही कर चरण ॥ नीट न करी ॥ ४४० ॥

ऐसी धारणा ते कैसी ॥ कांही न कळे मूढांसि ॥
आतां सामान्य धारणा तयांसि ॥ प्रकट करु ॥ ४४१ ॥

अचळ अवक्र स्थिर ॥ आसनी येकांती शरीर ॥
धरावें हे धारणा पवित्र ॥ शरीराची ॥ ४४२ ॥

सम(ध)राचे प्राणापाण ॥ नव्हे निरोधनता निरोधन ॥
प्राण धारणेची खूण ॥ ते हे ऐसी ॥ ४४३ ॥

नासाग्री दृष्टी धरणें ॥ निमिषोन्मेष परि वर्जनें ॥
ऐसी धारणा जाणें ॥ डोळे यांची ॥ ४४४ ॥

संकल्परहित मन ॥ निर्विकार वृत्ती क्षीण ॥
अंतरी धरावें जाण ॥ हे धारणा मनाची ॥ ४४५ ॥

कर्मेंद्रिये तीं दमाचीं ॥ ज्ञानेंद्रियें परतवावी ॥
मनाचां ठाइ मेळवावी ॥ हे इंद्रिय धारणा ॥ ४४६ ।

बुद्धी म्हणिजे ज्ञान ॥ तेणें तेणें आत्मानात्म दर्शन ॥
अनात्म भावाचे निरसन ॥ आत्मनिष्ठा ॥ ४४७ ॥

आत्मज्ञप्तीची अखंडता ॥ ते बुद्धीची धारणा तत्वता ॥
आत्मान्वयें देखिजे समता ॥ तें स्वरुप धारणा ॥ ४४८ ॥

आत्मान्ययाची अखंडता ॥ होये जै का पांडुसुता ॥
तै धरिजे न धरिजे ते सर्वथा धारणाचि होये ॥ ४४९ ॥

हे योगेंवीण धारणा न कळे ॥ आता अयोगियां जे कळे ॥
तेचि धारणा येणें काळे ॥ तूतें सांगैन ॥ ४५० ॥

शास्त्राचायोपदेशे ॥ दे मुक्ती अंतरी प्रवेशे ॥
तिचा विसरु नसे ॥ मा हे चिरकाळ ॥ ४५१ ॥ अ ॥

विहितापासूनि न चळणे ॥ भक्तीपासूंनि न वचणें ॥
वैराग्य धरिलें न सोडणें ॥ ऐसी धृति ॥ ४५१ ॥ ब ॥

साधनी प्रवर्त्तला न सोडी ॥ ज्ञानीयोगी आवडी ॥
असाधारणाते ऐसी कुडी ॥ तुतें सांगीतली ॥ ४५२ ॥

चौदावी सांगीतली धृति ॥ आइक पंधरावे लक्षण पुडती ॥
श्रीकृष्णु म्हणे सुभद्रापती पांडुनंदना ॥ ४५३ ॥

शौचं ॥ ००० ॥

शुचिता नामे शौच जाण ॥ द्विविध तयाचे लक्षण ॥
बाह्यांतर हें स्थान ॥ असे दोहींचे ॥ ४५४ ॥

बाह्य शौचु कर्मयोगें ॥ दमादि अभ्यासें चांगे ॥
अंतर शौचु ज्ञानयोगे ॥ शमें जाणावें ॥ ४५५ ॥

बाह्यभागीं पवित्रपण ॥ कर्मभ्रष्टा नाहीं जाण ॥
आणि इंद्रियां न करी बंधन ॥ तयाप्रति ॥ ४५६ ॥

विहितापासाव भ्रंशला ॥ तो मृगजळें नव्हे सोविळा ॥
दुष्टे आचारे सुटला ॥ तै वांचूनि ॥ ४५७ ॥

इंद्रियां नाथी आवरण ॥ तयाचें न मनावें पवित्रपण ॥
यालागि द्विविध लक्षण ॥ बाह्य शौचाचें ॥ ४५८ ॥

अंतरी नाथी आत्मज्ञान ॥ आणि मनाते निश्चळपण ॥
तयाचें अंतःपवित्रपण ॥ कवणे मानावें ॥ ४५९ ॥

अज्ञान मळु असे जुना ॥ परि मळी न विषय वासना ॥
हृदयीं दुष्ट कामना ॥ तो पवित्रु काये ॥ ४६० ॥

म्हणौनि ध्यानयोगें ज्ञानयोगें ॥ अंतरशौचु जाण प्रसंगे ॥
करण निग्रहें कर्मयोगें ॥ बाहेरी पवित्रता ॥ ४६१ ॥

**अद्रोहो ॥ ००० ॥**

बाह्यांतरीं पवित्रपणा ॥ आपुलें आपण मानून ॥
परद्रोहो करी जाण ॥ पुरुषु जो कीं ॥ ४६२ ॥

तो सकळांचिहीं सांडवला ॥ सकळां अवलक्षणी भूतला ॥
म्हणौनि अद्रोहो नृपाळा ॥ सोळावें चिन्ह ॥ ४६३ ॥

पायसांचा जेवि डेरा ॥ वमन पडे नृपवरा ॥
तेणें तयाचा मातियेरा ॥ धूळी होये ॥ ४६४ ॥

यालागि द्रोहो म्हणिजे द्वेषु ॥ ते सकळां गुणाचा नाशु ॥
आतां सात्विक पुरुषु ॥ तो अद्रोही गा ॥ ४६५ ॥

आपणु असतां निजाचारें ॥ आपणाद्वेषी दुसरें ॥
तो द्वेषु ऐसा न स्फुरे ॥ सात्विकासि ॥ ४६६ ॥

जो जिये नेणे वस्तूतें ॥ तो अज्ञानुचि किरु तेथ ॥
म्हणौनि पारखितां हीं तयातें ॥ द्वेषु न संपडे ॥ ४६७ ॥

कीं अमृती धोंडु पडे ॥ तेथिचे अमृतमय सिंतोडे ॥
पोटी नाहीचि वांकुडें ॥ तें ये कोढूंनि ॥ ४६८ ॥

तैसें पवित्राचां देही ॥ द्रोहो हे अपवित्र पाप नाही ॥
मां द्वेष कां प्रतिकार्यी ॥ कैंचें आणावें ॥ ४६९ ॥

म्हणौनि द्वेषकांचा द्वेषु ॥ नाहीं जया अंशाशु ॥
मा इतराचा करी दोषु ॥ ऐसें हे बोलणे ॥ ४७० ॥

साधुते मानी साधूत्वें ॥ इतरां मानावें नीचत्वें ॥
तै द्वेषु तो सूक्ष्मत्वें ॥ लागैल म्हणौनि ॥ ४७१ ॥

सर्वत्र आत्माचि लक्षी ॥ कां तेथिचा गुणु तोचि अपेक्षी ॥
सर्वभान आत्मसाक्षी ॥ पवित्र पाहे ॥ ४७२ ॥

आपुलेनि पवित्रपणें ॥ पवित्र जयाचें जाणणें ॥
मग जाणे तें तेणेंचि गुणें ॥ निर्दोष दिसे ॥ ४७३ ॥

की काचे आडूंनि पाहाता ॥ स्वेता दिसे हरितता ॥
तेवि निजावगुणे दृष्टिकरितां ॥ भासे तद्वत ॥ ४७४ ॥

गुणी घालुंनि देखणें ॥ पाहतां गुणमय विश्व तेणें ॥
सदोष भान तें नेणे ॥ निदौष ज्ञान ॥ ४७५ ॥

नाना वस्तु मात्र समस्त ॥ ते तंवं असे उपयुक्त ॥
विष आणि अमृत ॥ ऐसी परंतु ॥ ४७६ ॥

विषेचि परते प्राणु ॥ तैं तो अमृताचा ना गुणु ॥
नातरि त्रिदोषा ऐसा कवणु ॥ दूरि करी ॥ ४७७ ॥

शरीर मळाचे पात्र ॥ परिया ऐसे कवण पवित्र ॥
देह नाहीं देहांतर ॥ ऐसें करी ॥ ४७८ ॥

मनेसीं द्रोहो कीजे ॥ तै संसारु दुःखतम वाजे ॥
मनाचे पवित्रपण पाहिजे ॥ तै मोक्षु होये ॥ ४७९ ॥

इंद्रिया द्वेषु करिता ॥ आपणातें लागे अपवित्रता ॥
तयांतें सांडूंनि पळतां ॥ वाऊॅं न पुरें ॥ ४८० ॥

मग इंद्रियां अंतरंग पवित्रपण ॥ तें जाणतां पवित्र जन ॥
मा आपुले करण गण ॥ अपवित्र कैसे ॥ ४८१ ॥

अपवित्र पवित्र दावी ॥ करण समूह आत्मभावी ॥
नीचा दे अुच्च पदवी ॥ तें अपवित्रा कैसें ॥ ४८२ ॥

द्वेषा योग्य जे गुण ॥ त्यां योग्य त्यांचें ज्ञान ॥
ज्ञातें आणि करण गण ॥ सारिखेचि ॥ ४८३ ॥

ते आरोपितां गुण इतरा ॥ तें ज्ञान आलें घरा ॥
ते ज्ञात्रुत्वही वीरा ॥ आगीं पडलें ॥ ४८४ ॥

अपिवत्र जाले करण गण ॥ अपवित्र जाले मन ॥
ऐसें अपिवत्रें अपवित्रपण ॥ आपणा होये ॥ ४८५ ॥

पवित्रां गुणा जाणावें ॥ जेणें तें ज्ञान स्वभावें ॥
पवित्र तरिचि जाणावें ॥ पवित्रु गुणु ॥ ४८६ ॥

पवित्रा आश्रयो ज्ञानाचा ॥ पवित्रु ज्ञाता तो पवित्राचा ॥
पवित्रु करण समूह तयाचा ॥ पवित्रे होये ॥ ४८७ ॥

परावयाचे पवित्रगुण ॥ पाहाता पवित्र होये ज्ञान ॥
तेथे ज्ञातयाचें पवित्रपण ॥ तरिचि ऐसें ॥ ४८८ ॥

करण समूह सकळैकु ॥ जो पवित्र गुण प्रकाशकु ॥
तो पवित्रु ऐसें मूर्खु ॥ तोही जाणे ॥ ४८९ ॥

ऐसें असोनि अर्जुना ॥ कां अनुसरावें द्वेष्यांगुणा ॥
बळे अपवित्रपण आपणा ॥ लावावें की ॥ ४९०

या लागूंनि स्वपरदेहीं ॥ द्वेषि जे तें जया नाहीं ॥
अद्रोहो तो जाणयीं ॥ पवित्रु ऐसा ॥ ४९१ ॥

सोळावी पवित्र कळा ॥ अद्रोहो प्रकटु केला ॥
आतां ऐसाही हा बाणला ॥ आंगी असतां ॥ ४९२ ॥

**नातिमानिता ॥ ००० ॥**

अति मानिता स्वदेही ॥ अथवा आन येकाचां ठांइ ॥
सिद्ध होये जै तैयी ॥ पर द्वेषु खरा ॥ ४९३ ॥

त्यालागि सोळां लक्षणी पूर्णता ॥ वरि असावी नातिमानिता ॥
तें सत्रावें लक्षण पार्था ॥ सेवटील ॥ ४९४ ॥

स्वदेही मान्यतां ते कैसी ॥ नामी येकु धन्यु ऐसी ॥
ते उगीचि परद्वेषासि ॥ कारण होये ॥ ४९५ ॥

धन्य धन्य माझी जननी ॥ धन्यु धन्यु मी त्रिभुवनी ॥
कैसी निष्ठा साधनी ॥ साधली मज ॥ ४९६ ॥

बाह्यांतरीं पवित्रपण ॥ धन्य धन्य माझें लक्षण ॥
विहिता कर्माचें आचरण ॥ मजचि फावलें ॥ ४९७ ॥

धन्यु धन्यु माझा वंशु ॥ मी जालों असतां हरिदासु ॥
आणि विषयभोगीं उदासु ॥ विरक्तु आथी ॥ ४९८ ॥

गुरूभक्ति म्हणिजे देवा ॥ माझा हृदयीं तिचा ठेवा ॥
माझा संगु तो ॥ सर्वा दुर्लभुकीं ॥ ४९९ ॥

ज्ञान ते मी काये सांगों ॥ विद्या येती मातें मागों ॥
रजतम नेदी लागों ॥ आपुलां हृदयीं ॥ ५०० ॥

मातें नाहीं अभिमानु ॥ न पाहिजे मातें मानु ॥
मज ऐसा कवणु ॥ सभाग्य आतां ॥ ५०१ ॥

परद्रोहो म्या सांडिला ॥ क्षमावंतु मी भला ॥
हिंसा न करी प्रवर्तविला ॥ न प्रवर्ते कळ हा ॥ ५०२ ॥

सत्यव्रती मी स्वशीळा ॥ अक्रोधी त्यागी दानशीळा ॥
शांतु अनदिकु प्रमेळ ॥ महाभक्तु ॥ ५०३ ॥

भूतकृपा असे माझां देहीं ॥ अलोलुपता हृदयी ॥
मृदता आणि बाह्य विषयी ॥ मंजूळ बोले ॥ ५०४ ॥

मी ज्ञानी योगी निर्मळ ॥ निश्चळ नित्य स्वशीळ ॥
मानीत्वाचा नसे मळ ॥ माझां हृदयीं ॥ ५०५ ॥

ऐसा आपणु आपणातें मानी ॥ उत्तमा गुणी लक्षणी ॥
आतां इतरा कवणा धनु:पाणी ॥ मानी मानवंतु ॥ ५०६ ॥

आपणा मानवे जो जनु ॥ तया मानावे आपणु ॥
अहो असावा ऐसा सुजनु ॥ येर काये ॥ ५०७ ॥

आपणा माने तेंचि साधन ॥ आपणां आवडे तेंचि आचरण ॥
आपणा माने तेंचि ज्ञान ॥ येरही सर्व ॥ ५०८ ॥

मानी तया मानी मानु पाहो ॥ ऐसिया मानवंता उपायें ॥
श्रमूचि फळ आहे ॥ उत्तमाहीं गुणी ॥ ५०९ ॥

यया अभिमानाचां पोटीं ॥ सकळ अवगुण किरीटी ॥
म्हणौनि साधूची आंगीं ॥ नुठी ऐसें मानीत्व ॥ ५१० ॥

पर देहिचि जैसी लक्षणे ॥ आपणा श्लाघा नुपजे तेणें ॥
स्वदेही असोनि सच्चिन्हें ॥ तैसा साधु ॥ ५११ ॥

देही अथवा स्वमतीं अभिमानु सर्वत्र नाथी ॥
होये नव्हें विभक्ति ॥ निवडीचिना ॥ ५१२ ॥

अहंत्वें नाहीं उठणें ॥ लक्षणें नाहीं पाहाणें ॥
यापरी मेले नि मीपणें ॥ जीतु योगी ॥ ५१३ ॥

ऐसी केवळ अमानता ॥ सत्रावे चिन्ह पाहातां ॥
येणेंचि येकें समस्ता ॥ रुप होये ॥ ५१४ ॥

**हे भारत ॥ ००० ॥**

तू म्हणसील ऐसें वचन ॥ लक्षणे आइकोनि काय कारण ॥
तरी भारता निरोपण ॥ आइके पुडती ॥ ५१५ ॥

**दैवी संपदम् ॥ ००० ॥**

तरी शुद्ध सत्वमयी प्रकृती ॥ तें देवतामयी गा निरुती ॥
अतैव दैवी बोलती ॥ संपदाते ॥ ५१६ ॥

तेजीसी युक्तु जो जनु ॥ तो ईश्वरांशु अवतारु ॥
मनुजां ऐसा साकारु ॥ जरि मनुज नव्हे ॥ ५१७ ॥

संपर्कें जीवा उद्धरणें ॥ हें काये मनुष्याचें करणें ॥
जीत जीवत्व मारणे ॥ ऐसे जें कर्म ॥ ५१८ ॥

कार्या कारणाचां अभावी ॥ प्रकृती परुतें दावी ॥
तो देॐ ना तरी पदवी ॥ कवणा येसणी ॥ ५१९ ॥

दृष्टीविण दावणें ॥ स्फुर्तीविण बोलवणें ॥
प्रपंचु ब्रह्म करणें ॥ हे धर्म कवणा ॥ ५२० ॥

विषाचें करी अमृता ॥ विश्व हे अनाशवंता ॥
चाऱ्ही पुरुषार्थु जेथ ॥ देणें घेणें ॥ ५२१ ॥

ब्रह्मा विष्णु रुद्र तिन्ही ॥ न वधी ययांची करणी ॥
ऐसा बैसवी स्थानी ॥ तै मनुष्य नव्हे ॥ ५२२ ॥

जीवेश्वरत्व वोसरे ॥ जयाचेनि आत्मविचारे ॥
तेथे उभय कारण ते उरे ॥ स्वरुप जै ॥५२३ ॥

आतां देउँ तो देवांचा ॥ आत्मा होये (सर्वांचा ॥
मनुष्य नव्हे आमुचा ॥ ऐसा भाउँ ॥ ५२४ ॥

म्हणौनि रजतम दोष क्षीण ॥ हे सत्वमयी प्रकृती जाण ॥
देवा तें लक्ष्मी समान ॥ दुर्लभ होये ॥ ५२५ ॥

देवांची हे जै संपदा ॥ तै इचीविण देवत्व तें अपदा ॥
मान्य नव्हे सर्वदा ॥ चळ न भावे ॥ ५२६ ॥

देवीं प्रार्थिजत असतां ॥ देवाप्रति हे देवता ॥
कीं यिणें युक्ता देवता ॥ म्हणौनि दैवी ॥ ५२७ ॥

नाना हे आश्रयी जयातें ॥ तोचि देउँ हें निरुतें ॥
देवपण न शोभे येरातें ॥ तयाप्रति ॥ ५२८ ॥

**अभिजातस्य ॥ ००० ॥**

आतां हे जयातें जाली ॥ सत्वमयी प्रकृती बाणली ॥
कीं यिते पावों नि मुळीं ॥ राहिला जो ॥ ५२९ ॥

**भवंति ॥ ००० ॥**

तो कैसा जाणावा ॥ ऐसें म्हणसी पांडवा ॥
तरि यां सत्तरां चिन्ही ओळखावा ॥ सात्विकु तो ॥ ५३० ॥

सात्विक निजात्म प्रकृती ॥ ऐसीं ये चिन्हे होति
येरांतें आणितां न येति । सर्वथैव ॥ ५३१ ॥

देवी संपदा होये जयाचें लक्षणें उमटती सहजें तया ॥
तो देउँ ऐसी धनंजया ॥ वोळखी होये ॥ ५३२ ॥

स्वतेजें कळे भास्करु ॥ स्व तेजें तो शीतंकुरुं ॥
जै तो अभ्राचा डोंगरु ॥ आडूंनि वोसरे ॥ ५३३ ॥

तैसा जीउ ईश्वरांशु ॥ जाला असता अविद्यावशु ॥
निज प्रकाशेंचि प्रकाशु ॥ लोपे तयाचा ॥ ५३४ ॥

नग अविधा वोसरे आडूंन ॥ अज्ञान अन्यथा ज्ञान ॥
तै आपेंआप ईश्वरचिन्ह ॥ उमटे अंशी ॥ ५३५ ॥

अभयादिकें नव बोलिलीं ॥ ती स्वरुप लक्षणे वाखाणिलीं ॥
तयांचि बाह्य चिन्हे बोलिलीं ॥ ती यें सतरा ॥ ५३६ ॥

ऐसीं लक्षणें आणि चिन्हें ॥ सवीस जाली भूषणें ॥
दैवी संपदा येणें प्रकारें ॥ जाणावी ॥ ५३७ ॥

जया हे ऐसी प्रकृति ॥ तोचि देऊँ ययें क्षिती ॥
हा शब्दु गात्रि जगती मान्यु माझा ॥ ५३८ ॥

पूर्वी ज्ञानाधिकारी सूचिला ॥ तो हा तू तें प्रकटु केला ॥
आता अनाधिकारी उरला तोचि कैसा ॥ ५३९ ॥

॥ दम्भो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ॥
अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥
(अध्याय - १६ - श्लोक - ४)

आइकें पार्था वचन ॥ अनाधिकारवंताचें चिन्ह ॥
तो देऊँ तरी असूरपण ॥ ययातें नेमलें ॥ ५४० ॥

जयाचां हृदयीं वीरपती ॥ सत्वाचा अंशु तो नाथी ॥
रजोमयी तमोमयी प्रकृति ॥ जया पुरुषाची ॥ ५४१ ॥

राजसे प्रकृती पासूंन ॥ उपजे तें कैसें चिन्ह ॥
अवधान देई सांगैन ॥ पांडुपुत्रा ॥ ५४२ ॥

दंभः ॥ ००० ॥

जयाचां देही रजोगुणु ॥ न दिसे अर्धक्षणु ॥
तो जै होये जाणु ॥ ते व्हेळी कैसां ॥ ५४३ ॥

गुरुप्रसादें कांही कळे ॥ तें अंतरीहूनि उचंबळे ॥
ऐसिया दृष्टांतुन मिळे ॥ परि येकु आहे ॥ ५४४ ॥

विषचि का घेतला नरु ॥ तयातें करिता उपचारु ॥
जलांशु तोही समग्रु ॥ बाहेरी पडे ॥ ५४५ ॥

अमृता ऐसेंही उलथे ॥ मायेर भेषज काये तेथें ॥
अंतर कोरडें ही तें ॥ तें अधिकाधिकचि ॥ ५४६ ॥

तैसा जो उपदेशु की जे ॥ तो आत्मार्थ हृदयीं न धरि जे
परंतु बोलोंचि ॥ अपेक्षिजे ॥ इतरांप्रति ॥ ५४७ ॥

दंभाची कैसी वृत्ति ॥ योग्यता दावी जनाप्रति ॥
अपार विस्तारावी ख्याति ॥ होआवे शिष्य ॥ ५४८ ॥

प्रज्ञा तंवं नाहीं मनी ॥ परंतु जे युक्ति पडे श्रवणी ॥
ते मधांचिये उंनि वचनी ॥ बाहेरि पडे ॥ ५४९ ॥

आपुली वाढावया महंती ॥ उगाचि आक्षेपु करिती
प्रसंगेवीण बोलती ॥ ते दांभिक गा ॥ ५५० ॥

नातरी प्रसंगु उचलुंनि ॥ आक्षेपु प्रकटु करुंनि ॥
तेथें आरुषां तें युक्ती गोउंनि ॥ आपण हांसती ॥ ५५१ ॥

अहो म्हणती पाहा ॥ जाण तूचि मूर्खु हा ॥
येसणा ही परि हारु पाहा ॥ न कळे ययातें ॥ ५५२ ॥

दंभेचि लावी नयन ॥ दंभेचि तुकवी मान ॥
दंभेचि म्हणे ज्ञान ॥ दुर्लभ जगीं ॥ ५५३ ॥

स्वमुखे स्वस्तुति वाखाणी ॥ आम्ही म्हणे ब्रह्मज्ञानी ॥
संसारभय आम्हालागुनि ॥ असेचिना ॥ ५५४ ॥

यमें करावें कायें ॥ बोले परि मनी धाकु वाहे ॥
अहो कर्मयोगु तो कायें ॥ आम्हाप्रति ॥ ५५५ ॥

ब्रह्मास्मि हे भावना ॥ करुंनि आइकवी जना ॥
प्रकट सांगे खूणा ॥ अनुभवाचिया ॥ ५५६ ॥

वाचाळपण बहुसाल ॥ साधन नाथी केवळ ॥
आम्ही सिद्ध निर्मळ ॥ जीवन्मुक्त ॥ ५५७ ॥

साधक नहों दशा प्राप्त ॥ असत चि निमालें चित्त ॥
प्रपंच मान समस्त ॥ ब्रह्मचि देखों ॥ ५५८ ॥

अथवा इंद्रिय धर्म होती ॥ हें भानची आम्हा नाथी ॥
ऐसी ही ये युक्ति कवणें बोलें ॥ ५५९ ॥

आणि बोलिलो तरि सुखें ॥ ब्रह्मचि सर्व असकें ॥
आत्मयाप्रति बंधकें ॥ तेंहीं आत्मा ॥ ५६० ॥

ऐसा वाचा बळें ना ठावे ॥ युक्ती गोवी परावे ॥
तितुलेनी पुरे अघवें ॥ सर्व जालें ॥ ५६१ ॥

तू म्हणसी ऐसें वचन ॥ गुंते कां परावे जन ॥
तरि आइक तयाचें वचन ॥ सांगिजैल ॥ ५६२ ॥

अहो म्हणे जनां तें ॥ भेदु जो जीवा ईश्वरातें ॥
तो सिद्धु संतु की वर्ते ॥ असिद्ध असंतु ॥ ५६३ ॥

साधू बाळ ती वचन ॥ जेथ सत्य जीवेश्वरपण
तेथें सिद्धा भेदा संतपण ॥ हे बोलावेचि नलगे ॥ ५६४ ॥

तरि जीवां ईश्वरावेगळा ॥ संतु भेदु डावा डोळा ॥
जीउ ईश्वरु निराळु ॥ तेणेंसी कैसा ॥ ५६५ ॥

तयां भेदु की अभेदु ॥ संतु की असंतु ॥
त्याचा भेदु आतां नावे असो ता वादु ॥ हा भेदु कैसा ॥ ५६६ ॥

जेथे जीवेश्वरत्वु वेगळे ॥ भेदु तोही तें नातळे ॥
जया संतत्व सिद्धत्व बोलिलें ॥ तो भेदु कवण ॥ ५६७ ॥

नाना जीवेश्वरत्वचि जेथें नाहीं ॥ तेथें तयाचा भेदु उरे कायी ॥
नुरे म्हणाल तै वायी ॥ संतत्व खोटे ॥ ५६८ ॥

आतां उभयावेगळा सिद्धु ॥ नव्हे म्हणतां संतत्वा बाधु ॥
होये भाविता तो भेदु ॥ दोहींवीण कोणाचा ॥ ५६९ ॥

उभयांवेगळे भेदस्थान ॥ तै त्यां दोघां येकपण ॥
भेदें सांडिले म्हणौन सिद्ध होते ॥ ५७० ॥

आतां कव्हणी ऐसें म्हणती ॥ दोही वेगळा भेदु नाथी ॥
दोघांचा ठांइं आथी ॥ भेदु तो जै ॥ ५७१ ॥

आतां दोहीं चां ठांइं भेदु ॥ तो येकविधु कीं द्विविधु ॥
द्विविधु नव्हे येकविधु ॥ येकूंचि तो ॥ ५७२ ॥

तरि उभय भेदा येकपण ॥ तें भेदा न करवे भिन्न ॥
मा जीवा ईश्वरा वेगळेपण ॥ तेणें काये करावें ॥ ५७३ ॥

नाना भेदाचे जेथे जेथें स्थान ॥ तेथे तेथें न सावें येकपण ॥
भेदा येकत्व हें वचन ॥ विरुद्ध की ॥ ५७४ ॥

दिवसा रात्रि देखिली ॥ तमी प्रभा हारपली ॥
भेदा येकपण मुळीं ॥ तैसें आहे ॥ ५७५ ॥

नाना जीवेश्वर असतां वेगळें ॥ भेदा तेचि येकपण घडलें ॥
तें त्यां दोघां वेगळें ॥ स्वरुप जाले की ॥ ५७६ ॥

आतां तो भिन्न हा अभिन्नु ॥ तै तयांचा नव्हे आपणु ॥
विरुद्ध विपरितु गुणु ॥ जाला म्हणौनियां ॥ ५७७ ॥

असो तरि हा कवणाचा आणि कसा विचारु त्या दोघांचा ॥
पुडती भेदु जीवेश्वरांचा ॥ आधी जाणावें ॥ ५७८ ॥

तरि भेदा नाथी येकपण ॥ दोघांचे दोन्ही भीन्न ॥
ऐसें येकवचन ॥ दिधलें असतां ॥ ५७९ ॥

वादी बोले वाणी ॥ दोन्ही भेद कवणे स्थानी ॥
जीवीं ईश्वरीं कीं दोघापासूनि ॥ मध्ये भेद ॥ ५८० ॥

जीवीं जीवेश्वर भेदास्थान ॥ तरि जीवींचि दिसावें जीवेश्वरपण ॥
ईश्वरीं दोघा येकपण सिद्ध हो आवें ॥ ५८१ ॥

ऐसेंचि होये म्हणे कव्हणी ॥ तरी ऐक्य जाले ईश्वर स्थानी ॥
पुडती भेदु जया स्थानी ॥ तो जीउ कैचा ॥ ५८२ ॥

तैनी ईश्वरी येकु तो वेगळा ॥ भेदयुक्तु जीउ तया निराळा
जाले नृपाळा ॥ पांडवनंदना ॥ ५८३ ॥

आणिं जीवीं जीवेश्वरा ॥ भेदु हा जै बोल खरा ॥
तै इतरु भेदा बाहिरा ॥ तो वेगळाचि की ॥ ५८४ ॥

तै तेणेंसीया भेदा भिन्नु भेदु ॥ ऐसाही पडला वादु
असो जीवीं तो येकु कीं द्विविधु ॥ येकत्व हा खंड लावादु ॥
तेथे ही भेदु व्दिविधु ॥ ऐसे जालें ॥ ५८६ ॥

तयाही पुडती जीउ स्थान ॥ तेथें ही जीव ईश्वरपण ॥
तरि हे अनवस्था प्रमाण ॥ कवण मानी ॥ ५८७ ॥

आता म्हणावें स्थान ईश्वरीं ॥ तै तेंन घडे ययाचि परि ॥
मग अनश्रुत भेदु करी ॥ कव्हणी येकु ॥ ५८८ ॥

असो जीवेश्वरा अनुश्रुतपण ॥ तै भेदेंचि केलें येकपण ॥
आतां भेदु हे अभिधान । भेदा नसावें ॥ ५८९ ॥

येथें म्हणैल कव्हणी ॥ येका दोरां दोनि मणी ॥
तैसा जीवेश्वरीं भेदु वांचूनि ॥ सर्वगतु नव्हे ॥ ५९० ॥

ऐसेचि जै सिद्ध जालें ॥ तै भेदातें येकत्व जालें
मागां ॥ उत्तरखंडिले ॥ भेदा येकत्वाचें ॥ ५९१ ॥

आतां जीवेश्वर विलक्षण ॥ तिसरा भेदु दोहींमाजुंन ॥
तै दोघांवेगळा तो म्हणौन ॥ दोघे येक ॥ ५९२ ॥

नाना जीवेश्वरेसीं भेदा ॥ भेदु की अभेदु अनुवादा ॥
ऐक्य ते न वदा ॥ कोठेंचि भेदु ॥ ५९३ ॥

जीवेश्वरा वेगळा भेदु ॥ तै जीवा ईश्वरां अभेदु
आतां तयांचा पुडती ॥ भेदु अघट बोलणें ॥ ५९४ ॥

एवं जीवस्थान ना ईशुस्थान ॥ भेदा नव्हे येकपण ॥
तै वेगळेंचि दोघे स्थान ॥ दोन्हीं भेदातें ॥ ५९५ ॥

जीवाचा वर्ते जीवी ॥ शिवाचा भेदु शिवीं ॥
ऐसी येकीं महानुभावी ॥ युक्ति केली ॥ ५९६ ॥

तरिं जीवी वर्ते तो जीव भेदु ॥ तेणें जीउ दिसावा द्विविधु ॥
ईश्वरी वर्त्ततां ईश्वरभेदु ॥ दोनि तेही ॥ ५९७ ॥

तया जीवा जीवाचा भेदु ॥ ईश्वरी इश्वरांचा सिद्धु
करिता होये न वादु ॥ आणि अनवस्था ॥ ५९८ ॥

दोहीं मधें प्रतिष्ठितां ॥ दोघां होय भेदमुक्तता ॥
मग भेदमुक्तताचां आंगी सर्वथा ॥ भेदु न वर्ते ॥ ५९९ ॥

ऐसा भेदु करितां सिद्धु ॥ गुंतोंनि जाती साधु ॥
मग भेदु मिथ्या अभेदु ॥ साच म्हणती ॥ ६०० ॥

अभेदुचि करितां सिद्धु ॥ वरि कोसळे भेदवादु ॥
आतां जैसा जाला भेदु तैसाचि हा ॥ ६०१ ॥

अहो जीवां ईश्वरां अभेदु तो असंतु की सत्य सिद्धु ॥
असंतु म्हणतां भेदु ॥ पूर्वीळ स्तरा ॥ ६०२ ॥

संतुसिद्धु तो अभेदु ॥ ऐसा प्रतिष्ठिला वादु ॥
यया उत्तरा प्रतिवादु ॥ वादी बोले ॥ ६०३ ॥

जीवेश्वर संत म्हणौन ॥ अभेदालागिया संतपण ॥
कीं उभयसंतत्वे संतपण ॥ उभया भेदासि ॥ ६०४ ॥

दोहींचा संतत्वी म्हणाल संतु ॥ तरि उभय संतत्वी भेदचि संतु ॥
उभय सत्यता असंतु ॥ अभेदु तुमचा ॥ ६०५ ॥

जीवेश्वरांचा असंतपणी ॥ संता अभेदा कोण मानी ॥
वंध्या पुत्रातें मिळणी ॥ साहेचिना ॥ ६०६ ॥

दोघांचा असंतुपणी बरें ॥ संतु अभेदु कवणाचा उरे ॥
ययाचा नव्हें हें खरें ॥ असंतु म्हणौनि ॥ ६०७ ॥

जीवा ईश्वरा असंतपणा ॥ अभेदा जाले संतपण ॥
तै असंता संत येकपण ॥ सर्वथा नावडे ॥ ६०८ ॥

अता असता जीवेश्वरांसी ॥ वेगळेंपण संता अभेदासि ॥
तै अभेद मुक्तां ॥ तयासि भेदूचि खरा ॥ ६०९ ॥

तया आंगी असता भेदु ॥ हा कवणाचा अभेदु ॥
दोहीं वेगळा असंतु वादु ॥ केवळ करितां ॥ ६१० ॥

दोहीं वेगळे या असंतपणा ॥ तै दोघां भेदेंसी उरले संतपणा ॥
यापरि अभेदाचें स्थान माना ॥ वाऊँ जालें ॥ ६११ ॥

असंतु पदार्थु जयावेगळा ॥ तेथें तो संतुपदार्थु उरला ॥
म्हणौनि जीवश्वरु भेदु जाला ॥ नित्यत्वें संतु ॥ ६१२ ॥

दोही वेगळा नाहीं अभेदु ॥ दोहींचा ठाई असे सिद्धु ॥
तो उभया संतपणी असंतपणी हा वादु ॥ मागेंचि खंडला ॥ ६१३ ॥

दोहींचां ठाई अभेदु ॥ तो येकेंविण येका नव्हे सिद्धु ॥
म्हणौनि सत्ये भेदे अभेदु ॥ सत्यु जाला ॥ ६१४ ॥

आतां सत्यपण जेथें भेदातें ॥ तेथें असत्यपण पाहिजे अभेदातें ॥
वांचूनि येकु असतां येकातें ॥ होणें न घडे ॥ ६१५ ॥

येकेविण येका नाही ॥ एके बोल वर्त्ते दोघांचां ठाई ॥
आतां जीवेश्वर विषयी ॥ कवणु उरला ॥ ६१६ ॥

पाचाचि ठाई याचा अभेदु ॥ त्याचांचि ठाई त्याचा सिद्धु ॥
ऐसा करिता वादु ॥ अभेदु दुभागला ॥ ६१७ ॥

याचा तो नव्हे त्याचा ॥ त्याचा तो नव्हे याचा ॥
आतां अभेदु या अभेदांचा ॥ कवणे खंडावा ॥ ६१८ ॥

अभेदा लागला भेदु ॥ तोचि नव्हे अभेदु ॥
तेणें जीवेश्वर विभेदु ॥ केंलि खंडावा ॥ ६१९ ॥

उभय अभेदा येकपण ॥ तरि अभेदा तया कवणु स्थान ॥
जीऊ ईश्वरु कीं आन ॥ तिसरें असे ॥ ६२० ॥

जीऊ स्थान अंभेदातें ॥ तै ईश्वरीं भेदु वर्ते ॥
ईश्वरु तै जीवातें ॥ भेदु साचारु ॥ ६२१ ॥

जीवी वर्ततां अभेदु ॥ जाला जीवाईश्वरा ऐक्यवादु ॥
आतां ईश्वरीं वर्ते भेदु ॥ ते जीवेश्वर कवण ॥ ६२२ ॥

ईश्वरीं अभेदु ईश्वर मतें ॥ जीउ भेदीं भेद मतें ॥
तै त्यां अभेदु दोघांतें ॥ कीं भेदु बोलावा ॥ ६२३ ॥

अनुश्रुतु अभेदु बोलावा ॥ तै दोघां वेगळा तो असावा ॥
तै जीवेश्वर भागु पडावा ॥ वेगळाचि भेदीं ॥ ६२४ ॥

दोहींसीं सहचरु अभेदु ॥ तरि येकेविण येका असिद्धु ॥
तै सहचरु तें बाधु ॥ लागलाचि कीं ॥ ६२५ ॥

तै येकत्वीचि कां स्फुरावा ॥ येकेंविण येका होआवा ॥
पाणियां तरंगु मिळावा ॥ लागेचिना ॥ ६२६ ॥

जीवा जीवींचि अभेदु ॥ ईश्वरा ईश्वरींचि तथा विधु ॥
मा जीवा ईश्वरा अभेदु ॥ हें कां होतें ॥ ६२७ ॥

कव्हणी म्हणैल बरें ॥ स्व स्वस्थानी अभेदु खरें ॥
तै दोनि अभेदु यें उत्तरें ॥ मागांचि खंडिली ॥ ६२८ ॥

उभय येकत्वीं असे । येकेंविण येका नसे ॥
तै दोघामाजि नसे ॥ ऐसें जालें ॥ ६२९ ॥

स्व स्वस्थानी नाहीं ॥ तो योगी पाहिला जेंथी ॥
तै वचनाचा सत्याऊँ कायी ॥ आतां मानावा ॥ ६३० ॥

स्व स्वस्थानी नसे अभेदु ॥ तयां आंगीं संतुभेदु ॥
संतें भेदें अभेदु ॥ ना योगूचि न घडे ॥ ६३१ ॥

वेगळेपणाचे साचपण ॥ तया न साहे येकपण ॥
आतां योगी तयाचें भान ॥ कोठूनि आलें ॥ ६३२ ॥

उभयापासूनि सुटला ॥ योगींचि योगी निराळा
अभेदु तो लागला ॥ अंगी नसे ॥ ६३३ ॥

तै भेदु तो योगीं वियोगी ॥ जीवेश्वरां वर्ते आगीं
बाहेरी आणि अंतरंगी ॥ अभेदूचि वाउँ ॥ ६३४ ॥

उभया वेगळे नाहीं स्थान ॥ उभे वर्ण न होती आयन ॥
आतां अभेदाचें साचपण ॥ तेंचि कैसें ॥ ६३५ ॥

एवं भेदवादु न सरे ॥ अभेद वादुही वारे ॥
मग बोलती दुसरे ॥ अभाव वादु ॥ ६३६ ॥

अहो जीव ईश्वरु हे भावना ॥ केवळ ययांची अभावना ॥
आतां अभेदु भेदु कवणा ॥ दोन्ही मिथ्या ॥ ६३७ ॥

यापरि अभाउँ जीवाचा ॥ अभाउँ त्या ईश्वराचा ॥
पक्षु भेदा अभेदाचा ॥ सांडिला आम्ही ॥ ६३८ ॥

ऐसे अनुवादले येक जाण ॥ वादी देती तया वचन ॥
अहो अभाव पंक्षा तऱ्ही साचपण ॥ आहे तुम्हा ॥ ६३९ ॥

अभावो जीवा ईश्वराचा ॥ आतां आतां सद्‌भाउँ तया अभावाचा ॥
नित्य आकारु जयाचा ॥ जाण तयाप्रति ॥ ६४० ॥

ऐसा नित्य संतु असे ॥ कीं असंतु अनित्यु कांहीं नसे
या दोहीमाजि कवण कैसें ॥ तुमचें मत ॥ ६४१ ॥

असतुं अनित्यु अभाउँ जरि ॥ तरि अभाउँ अभावा संहारी ॥
तोचि जाये तया वारीं ॥ उरे तो भाउँ ॥ ६४२ ॥

अभावा आली असत्यता ॥ तै जीवेश्वरांचा कायें तो आतां ॥
जयांचां प्रतीति पाहातां ॥ पारु न पविजे ॥ ६४३ ॥

सत्यां जीवेश्वरांचा संबंधी ॥ मिथ्या अभाउँ तो नव्हे कधी ॥
नाना अभावा भावत्व विरोधी ॥ तो बोलोंचि नये ॥ ६४४ ॥

म्हणौनि अभाऊॅ जीवेश्वरांचा ॥ सत्य भाऊॅ असे तयाचा ॥
आग्रेचि विरोधु येथिचा ॥ न मानणें जै ॥ ६४५ ॥

कार्पासा ऐसें कृष्ण ॥ तयाचे रुप मानून ॥
आग्रही करिति वचन ॥ अभावाचां सत्यपणी ॥ ६४६ ॥

रात्री खरीचि हें जाणो खरें ॥ तरि दिवसु होये ईमाना उतरें ॥
तैसें आग्रहाचें वारें ॥ आलें येकी ॥ ६४७ ॥

तेंहीं अभाऊॅ सत्य केला ॥ असोतो बोल मानिला ॥
परंतु संदेहो उपजला ॥ तो बोलावाचि की ॥ ६४८ ॥

जीवेश्वरां मिथ्यात्व ॥ तरि तद्‌भावा सत्यत्व ॥ कीं जीवेश्वरा सत्यत्व ॥
तै सत्यु अभाऊॅ ॥ ६४९ ॥

आतां जीवेश्वरांचा साचपणी ॥ मूर्खु तो अभाऊॅ मानी ॥
जीवेश्वर मिथ्या म्हणौनि ॥ अभाऊॅ सत्य ॥ ६५० ॥

आतां जीवेश्वरां असतेपण ॥ आणि तद्‌भावा जै सतपण ॥
तै सता असता लागून ॥ अंतर बहु ॥ ६५१ ॥

सतु पारिखे असंता ॥ असत पारिखे सता ॥
असो जीवईश्वर आतां ॥ असंत जै यी ॥ ६५२ ॥

तै सतु अभाऊॅ कीरु ॥ ययांचा नव्हे साचारु ॥
सते धरावा पदरु ॥ संताचाची ॥ ६५३ ॥

सतत्वे तयाचा हा नव्हे ॥ ते असतत्वे याचे स्वभावें ॥
असा स्वरुपें सत्य संभवे ॥ तो अभाऊॅ कवणाचा ॥ ६५४ ॥

असतेंसी सतु हावें मुळा ॥ सततें पडो नेदी गळा ॥
आतां दोही पदार्था वेगळा ॥ अभाऊॅ तो कवणु ॥ ६५५ ॥

आन येक आइका वचन ॥ अभावातें कवण स्थान ॥
पदार्थु कीं ॥ आना तयाहुंनि ॥ ६५६ ॥

पादार्थावेगळाचि हा असता ॥ तरि कवणाचा काये म्हणिजेता ॥
आणि जातां येता दिसता ॥ पदार्थावरि ॥ ६५७ ॥

असो अभाऊॅ माजलेपणें ॥ पादार्थावरि करी धावणें ॥
तै सत्य पदार्थु ही अभावणें ॥ तया पाहिजे ॥ ६५८ ॥

सत्यावरि तो न घडे ॥ असत्या सत्यपणें न जडे
आणि येतां जातां निवाडें ॥ देखिजेना ॥ ६५९ ॥

म्हणौनि पदार्थेंसीं विलक्षणता ॥ अभाव नाही सत्यता पदार्था ॥
वेगळा हा स्फुरता ॥ तै येक होते ॥ ६६० ॥

अभाउॅं किरु जो घटाचा ॥ तो क्षणा का होता मठाचा ॥
पटाचा तो काष्टाचा ॥ ऐसें न घडें॥ ६६१ ॥

तेथें घटा भावें करुन ॥ पदाभावचेंचि होतें ज्ञान ॥
सर्वत्र अभावा येकपण ॥ ऐसें जयी ॥ ६६२ ॥

घटाचा तो मठाचा नव्हे ॥ पदाभावें घटाभाउॅं नेणवे ॥
घटभावेंचि संभवे ॥ घटा भावज्ञान ॥ ६६३ ॥

जैसा आकारु पदार्थाचा ॥ तैसा तोचि तद्भावाचा ॥
अभावें बोधु व्यक्तीचा ॥ पदार्थाचिये ॥ ६६४॥

अभावाचा करितां बोधु ॥ भाउॅं भासेना जैव सिद्धु ॥
तवं अभाउॅं न कळें शब्दु ॥ साच जाण ॥ ६६५ ॥

जीतुलें अभावाचे नित्यपण ॥ तितुले असावे भावस्फुरण ॥
भावी पडताचि विस्मरण ॥ अभाउॅं विसरिजे ॥ ६६६ ॥

म्हणौनि पदार्थाचा भाउॅं ॥ तोचि अभावाचा आउॅं ॥
ठाउॅं आणि वाउॅं ॥ तेणेंचि तो ॥ ६६७ ॥

असो पदार्थु अभावाचे स्थान ॥ तै अनंत पदार्थ म्हणौन ॥
अनंता अभावांसाचपण ॥ रुप जालें ॥ ६६८ ॥

अनंता अभवाचिया व्यक्ती ॥ येकी युक्ती ते न मिळती ॥
भाव तैचेचिं होती ॥ स्वतंत्र अभाव ॥ ६६९ ॥

आतां जीवेश्वरांचा सिद्धु ॥ येकु कीं अभाउॅं द्विविधु ॥
उभे पां आगी रुप भेदु ॥ गुण भेदु असतां ॥ ६७० ॥

तरि भावभेदेंयेकपण -न घडे अभावालागूंन ॥
म्हणौनि दोघुनि अभाव भिन्न ॥ दोघांचा ठाई ॥ ६७१ ॥

ईश्वरींवर्ते ईश्वराचा ॥ जीवीं वर्ते जीवाचा ॥
ऐसा अभाउॅं दोहिंचा सत्य जै ॥ ६७२ ॥

असो आतां ऐसें जरि ॥ जीवाचा न पवे ईश्वरी ॥
ईश्वराचा ईश्वराबाहेरि ॥ पडोचि न शके ॥ ६७३ ॥

जीवाकारें जीवाचा ॥ ईश्वराकारें ईश्वराचा
तो भावा वेगळा कैचा ॥ आपणूचि वाॐ ॥ ६७४ ॥

तै अभावाचें साचपण भावेंचि जालें भान ॥
भावावेगळे अकिंचन रुप अभावाचें ॥ ६७५ ॥

आतां दोहींचा भावीं अभाॐ ॥ भावावेगळा तोचि वाॐ ॥
तै सत्य भाॐ की अभाॐ ॥ भाविते न भावाचा ॥ ६७६ ॥

नाना दोहीं असे भावीं ॥ अभाॐ हे युक्ति कवणें मानावी ॥
भाॐ सत्य तया गावीं ॥ अभाॐ नसे ॥ ६७७ ॥

आता जीवेश्वचांचा बोलावा ॥ तरिभाॐचि बोलतां बरवा ॥
परि अभाॐ आड न करावा ॥ भावाप्रति ॥ ६७८ ॥

यापरि अभावा नाहीं अस्ति ॥ भावी भेदु तो कैसा आथी ॥
उभयपक्षीं युक्ति ॥ कुंठीत जाली ॥ ६७९ ॥

आतां तू बोलसी वचन ॥ हें पाषांड जे कवे कासेन ॥
तरि पवित्र शुद्ध ज्ञान ॥ तें कां प्रेरावें ॥ ६८० ॥

वादु म्हणिजे तो चतुर्विधु ॥ त्यामाजि येकु तो तत्वबोधु ॥
येरु तो कुत्तर्क वादु ॥ परमतखंडन ॥ ६८१ ॥

काकः कक्षा प्रकरण ॥ तया वादाचें हें त्रिविणपण ॥
संक्षेपें करिन निरोपण ॥ तद्विषयिचे ॥ ६८२ ॥

अहो जीउ तो कैसा कवणु ॥ जो ईश्वरेंसी विलक्षणु ॥
ईश्वरु तेणेंसी आनु ॥ तो पां कैसा ॥ ६८३ ॥

उभेशांचां भेदु बोलिला ॥ ती आरोपु कवणा केला ॥
यापरि प्रश्नु तोचि प्रांजळा ॥ करा युक्ती ॥ ६८४ ॥

आतां जीवेंसी ईश्वरु अविलक्षणु ॥ तेणेंसी तो अधिकु ॥
बोलता तयांचा अघट मानु ॥ भेदु पुसणे ॥ ६८५ ॥

येकाकी ईशु वेगळा जीउ तेणेंसी निराळा ॥
भेदु तो ऐसा म्हणितला ॥ हें रुप करितां ॥ ६८६ ॥

पुसे तो जाला सांगेता ॥ सांगेतो जाला पुसत्तां ॥
मग पूर्व वादें पिटितां ॥ तोचि गुंते ॥ ६८७ ॥

कवणु कवणी कवण ॥ ऐसेचि जेथे वचन ॥
तो काकः वादु म्हणौन युक्ति केली ॥ ६८८ ॥

प्रश्नीचि कक्षा घेइजे ॥ तो कक्षा वादु म्हणिजे ॥
तोचि संक्षेपे उमजे ॥ ऐसें करीन मी ॥ ६८९ ॥

जीवेश्वरां तें जाणोंन ॥ तद्‌भेदू पुसा वचन ॥
किंवा उभयांसि नेणो न भेदु पुसा ॥ ६९० ॥

जीवा ईश्वरांत्ते नेणिजे ॥ तै भेदु पुसणें हेचि नुपजे ॥
उद्यांचें स्वप्न अर्थि जे ॥ देखिले न विण ॥ ६९१ ॥

आतां जीवेश्वर जाणितले ॥ तरि विलक्षणा भारीं कळलें ॥
येक येका वेगळे ॥ तत्वता साचार ॥ ६९२ ॥

आतां तयाचें वेगळेपणं ॥ सत्य साक्षात्कारें जाणोंन ॥
भेदु पुसावया करण ॥ काये असे ॥ ६९३ ॥

नेणीवा प्रश्नु न घडे ॥ जाणिवा जाणितलाचि घडे ॥
पुसावया कारण पुढें ॥ तें आता कवण ॥ ६९४ ॥

उभय भेदाचें नसतें ज्ञान ॥ तरि असतें अभेद स्फुरण ॥
मग जीव ईश्वर विषयीक ज्ञान ॥ नसतें तुम्हा ॥ ६९५ ॥

भेद ज्ञानेंवाचूंन ॥ जीउ ईश्वरू कवणा अभिधान ॥
येक येकाचि लक्षणा ॥ जाणीतले ते ॥ ६९६ ॥

एवं जीउ ईश्वरू कळला ॥ भेदु जाणोंनि निर्धारू केला ॥
आतां पुसाया वेगळा ॥ तो कवणाचा भेदु ॥ ६९७ ॥

नेणोंनि पुसणें न घडे ॥ नोणोंनी नेणणेंचि घडे ॥
आतां यये अर्थी फुडे ॥ बोलणें आथी ॥ ६९८ ॥

यथार्थें ज्ञानें न घडे प्रश्नु ॥ यथार्थ अज्ञानेहीं तोचि गुणु ॥
आतां अययार्थ ज्ञाने अनुमानु ॥ केला प्रश्नाचा ॥ ६९९ ॥

ऐसिया आक्षेपा बोलणें ॥ तुम्ही पुसा अयथार्थ ज्ञानें ॥
यथार्थ जाणणें नेणणें ॥ ये दोन्ही सुटली ॥ ७०० ॥

तरि जीवेश्वरांचा भेदु ॥ म्हणिजे डोंगरिचा नुदु ॥
व्योमाचा खांदु विनोदु ॥ वनस्पतींचा ॥ ७०१ ॥

काये हो कासया कांही न मिळे ॥ मा अययार्थ ज्ञाना हेचि मिळे ॥
तुम्ही आथी आश्रयिलें ॥ म्हणौनि बोलों ॥ ७०२ ॥

अयथार्थ ज्ञान म्हणौन ॥ यथार्थ कीजे निरोपण ॥
सर्वथैव अप्रमाण ॥ साचार बोलणें ॥ ७०३ ॥

कवणी बोलती वचन ॥ अन्यथा ज्ञान अज्ञान ॥
हें वेगळें करूंनि निरोपण ॥ करावे भेदाचें ॥ ७०४ ॥

तरि अन्यथा ज्ञाने देखिला ॥ भेदु प्रश्न प्रकटु केला ॥
प्रश्नु नाहीं घडला ॥ ज्ञानें अज्ञानें ॥ ७०५ ॥

ऐसें तुमचें वचन ॥ केवळ ज्ञान ना अज्ञान ॥
तरि भेदु जाण तें अन्यथा जाण ॥ भेदु तो कैसा ॥ ७०६ ॥

जिये दृष्टि जया ज्ञानातें ॥ जिये अवस्थे जो प्रपंचु वर्ते ॥
तो अन्याज्ञाना अवस्थे ॥ दृष्टि ते विषयोचि नव्हे ॥ ७०७ ॥

निद्रेतें करूंनि संहारू ॥ जागृती दावा वारू ॥
स्वप्नी देखिला थोरू ॥ तो या दृष्टी ॥ ७०८ ॥

रात्री दिवसु देखणें ॥ ऐसें स्वप्नाचें करणें ॥
तें जागृती दिनमान करणें ॥ रात्री दावावें ॥ ७०९ ॥

अन्यथा ज्ञानाचां निरासीं ॥ ज्ञान उरे -------ज्ञान ग्रासीं ॥
तें जया अर्था प्रकाशी ॥ तोचि पाहणें तेथे ॥ ७१० ॥

निरशूंनि अन्यथा ज्ञान ॥ करा भेदाचें दर्शन ॥
ऐसें हें अयुक्तवचन ॥ बोलतांचि आतां प्रकरण ॥ ७११ ॥

प्रकरणाचा विचारु ॥ शब्दाचा करावा प्रकारू ॥
युक्तीतें देउंनि पसरू येक करावें ॥ ७१२ ॥

पुसताचि सांगता करणें ॥ त्यांच्यांच वचनी तया बुझावणें ॥
तोचि विचारू निरोपणें ॥ आइक माझेनि ॥ ७१३ ॥

वादुकाचा अनुवादु ॥ जीवेश्वरांचा कैसा भेदु ॥
ईत्तुला येकुचि शब्दु ॥ प्रकारें भेदाचा ॥ ७१४ ॥

जीवेश्वरांचा का पां भेदु ॥ करायां बोधु ॥
मग प्रतिवचनेंसिध्दु ॥ भावार्थु जाणाल ॥ ७१५ ॥

जीवा ईश्वराचा ठाऊॅ ॥ कीं जीवेश्वरांपासूंनि याचा भाऊॅ ॥
उदकाचा तरंगु अभिप्राऊॅ ॥ ऐसा काये ॥ ७१६ ॥

की तू जैसा रायाचा ॥ पुत्रु जेवि पितयाचा ॥
मित्रु कीं वैरी दोषांचा ॥ काये भेदु ॥ ७१७ ॥

अंशु अथवा तो अंशी ॥ प्रकाशकु की निवासी ॥
स्वभाऊ कीं गुण दोषासि ॥ जया भेदु म्हणिजे ॥ ७१८ ॥

जीउ ईश्वरांचा म्हणितला ॥ परि त्यांचा काये हें प्रकट बोला ॥
यावरि कैंसा म्हणितला ॥ ययाचा भावार्थु ॥ ७१९ ॥

रूपें कैसा नामें कैसा ॥ किं व्यवहारें गुणें कैसा ॥
केसणा कीं कासया ऐसा ॥ कैसा हे काये ॥ ७२० ॥

आंगी असतां येकपणं ॥ भेदु हें तया अभिधान ॥
आतां येकपण की अनेकपण ॥ ऐसें पुसा ॥ ७२१ ॥

पुसा तंवं येकु वचनीं ॥ आणि भेदु म्हणतां ते दोनि ॥
तेथिचाही येकु निदानी ॥ येकु नसावा ॥ ७२२ ॥

परमाणु परियंत तुटे ॥ परि दोनिपण तेंचि उमटे ॥
आतां अनंत वांटे फांटो ॥ अंश भेदाचे ॥ ७२३ ॥

तयामाजि कवणु ॥ पुसा कैसा म्हणौनु ॥
जाणता तोही परमाणु ॥ द्विविधु होये ॥ ७२४ ॥

आतां कैसा तो कवणु सांगावा ॥ रूप करूंनि भेदु दाखवा ॥
मग कैसा हे अनुभवा ॥ आणोनि सांगों ॥ ७२५ ॥

ऐसा रूपवंतु पुसतां ॥ भेदु तोचि सांडिला रूपवादु ॥
मग म्हणैल भेदु ॥ तो ऐसा आहे ॥ ७२६ ॥

अहो जीवां ईश्वरां सगुणां ॥ भेदु म्हणिजे भावना ॥
परि रूपवंतु असेना ॥ भेदु स्वतंत्रु ॥ ७२७ ॥

तरि भावना ते जीवाची ॥ कीं भावि तया ईश्वराची ॥
नाना उभय द्रष्टा तयाची ॥ भावना काये ॥ ७२८ ॥

शास्त्राची कीं वेदाची ॥ पुराणा की पराची ॥
भेदभावना कवणाची ॥ ऐसी सांगा ॥ ७२९ ॥

जयाची भावना म्हणाल ॥ तरि तोचि ते तिचा मूळ ॥
लक्षण तरि केवळ ॥ भाविजे तैसें ॥ ७३० ॥

आत्म इतरचि भावना ॥ म्हणतां हे आपुली भावना ॥
दुजयाची कल्पना ॥ ते यां नसे ॥ ७३१ ॥

आता जितुली तुमची ॥ तै काढावी पां क्रमेचि ॥
तेथे उरैल तू परावयाची ॥ तेचि पाहो ॥ ७३२ ॥

तुमची चित्ते जै भावना ॥ तै तुम्ही चित्ती ते जाणा ॥
ते रूपवंतू स्वतंत्र घडेना ॥ जे दुसरा जाणे ॥ ७३३ ॥

अहो भावना केली येकें ॥ तेथिचें दुजा कांही देखे ॥
आतां कैसी म्हणौनि विवेकें ॥ काये पुसावी ॥ ७३४ ॥

ऐसें नसीं ते सांगावीचि ॥ तरि सांगताते आमुची ॥
काजा नये येकाची ॥ येकांप्रति हे ॥ ७३५ ॥

रूपवंतु भेदु सांगता ॥ बोले तो गुंपे सर्वथा
भावना म्हणौनि म्हणतां ॥ ते आपणचि जाणावी ॥ ७३६ ॥

यापरी अर्थु नेणणें ॥ शब्दीं प्रकारू विस्तारणें ॥
प्रकर्ण वादु म्हणणें ॥ तयाचें नाम ॥ ७३७ ॥

एवं या तिन्हीं प्रकारीं ॥ आपण न गुंपावे उत्तरीं ॥
शब्दु धरुंनि चतुरी ॥ पुसेचि जाणावें ॥ ७३८ ॥

भाविकु तो येथे गुंपे ॥ सांगे तयाची मति हारपे ॥
पुसे तोचि दडपे ॥ ययेवादीं ॥ ७३९ ॥

दोघे भाविक न होती ॥ तरि न सरे तयाची युक्ति ॥
ऐसें असोंन वीरपती ॥ करिती वादु ॥ ७४० ॥

भाविक भोळे गोउंनि ॥ योग्यता जनी दाउंनि ॥
दंभु पोषिती ज्ञानी ॥ आसुर जन ॥ ७४१ ॥

रजतमात्मकु आसरु ॥ वेदी नाहीं तया अधिकारु ॥
आणि डंबास्तव नरु ॥ सिकेंचि जै ॥ ७४२ ॥

तै तया अर्थीं नाहीं ज्ञान ॥ न करी तैसे आचरण ॥
परि लोकामाजि जाणपण ॥ तोचि दावी ॥ ७४३ ॥

शास्त्री जाला प्रवीणु ॥ तेणें न करी निज प्रयोजनु ॥
जनी मी येकु शास्त्रज्ञु ॥ ऐसें दावी ॥ ७४४ ॥

स्वकर्मी ज्ञान संपूर्ण ॥ परि आत्मार्थ न करी आचरण ॥
लोकीं देखावें कर्मठपण ॥ हेचि दावी ॥ ७४५ ॥

सांग अथवा व्यंग ॥ नाम रुढ करी यज्ञयाग ॥
जेणें मानवे कीरु ज़ग ॥ तेचि विहित तया ॥ ७४६ ॥

अग्नहोत्री आम्ही म्हणौन ॥ स्वमुखेंचि करी स्तवन ॥
रुढा कां श्रीमंता पूजन ॥ करी अतिथि भावें ॥ ७४७ ॥

आपणूंचि दावी होमशाळा ॥ वार्त्ता सांगे समूळा ॥
एवं जो धर्मू तो डोळां ॥ दावी जनातें ॥ ७४८ ॥

स्नानसंध्या देवतार्चन ॥ भीक संपादी अनुष्ठान ॥
जनाची प्रवृत्ति पाहों न ॥ आसन घाली ॥ ७४९ ॥

धर्मशास्त्राची सामग्री ॥ तो विधु नाचरे शरीरीं
पराप्रति योग्यता भारी ॥ दावी दांभीकु ॥ ७५० ॥

मोक्षुधर्मु ना कामु अर्थु ॥ लोकीं मानावें हाचि पुरुषार्थु ॥
ऐसा कर्मु करुंति व्यर्थु ॥ जन्मु दवडिला ॥ ७५१ ॥

देवपूजा संकीर्तन ॥ कष्टी करुंनि जागरण ॥
पाहोनि लोकाचें वदन ॥ दंभार्थ नाशी ॥ ७५२ ॥

दांभिकु होये धनवंतु ॥ तोही वृथा करी अर्थु ॥
लोकी देखावें पुरुषार्थु ॥ हाचि जया ॥ ७५३ ॥

बहुरुपिया ऐसा नटे ॥ सुकुमारपण आणि मोटें
मंदीर करी गोमटें ॥ मनोरम ॥ ७५४ ॥

जे जे विळा सलक्ष्मीचे ॥ संग्रह करी तयां पदार्थांचे ॥
सन्मार्गे विश्व न वेचे ॥ तो वेचे कैसे ॥ ७५५ ॥

नागरिक मीनती जन ॥ तयां वोडवदाची आणूंन ॥
अन्न उदक पुष्पपान ॥ वेची तेथें ॥ ७५६ ॥

द्रव्यहीनु विद्याहीनु ॥ दरिद्री दांभिकु जनु ॥
तयाचाही परि तो गुणु ॥ नं मोडे सर्वथा ॥ ७५७ ॥

आंग पुसूंनि टिळक रखी ॥ सायं प्रातः विधिसारिखि ॥
त्रिकाळ संध्या पारिखि ॥ धोत्रें रंगाचीं ॥ ७५८ ॥

कर्मयोगा ज्ञानाचिया ॥ वार्ता सांगे बरविया ॥
वैराग्य वागाणी धनंजया ॥ व्यवहारीं दक्षता ॥ ७५९ ॥

ऐसा दांभिकु जो जनु ॥ तयाचा आंगी येक गुणु ॥
जेणे करुनि मान वे जनु ॥ तेचि करी ॥ ७६० ॥ (अ)

जनातें दावी मुखाकारु ॥ भाळावे म्हणौनि ॥
वैश्यें तें नाही भर्तारु ॥ ते करुनियां अलंकारु ॥ ७६० ॥ (ब)

जिये तें नाही स्वभर्तु ॥ ते जनातें साम्यवस्तु ॥
तिये वैश्य ऐसा दिसतु ॥ दांभिकु जो ॥ ७६१ ॥

कर्म फलांचा दाता ॥ ईश्वरु स्वामि सर्व देखता ॥
तयातें जाणोंनि न भजता ॥ दांभिकु जो ॥ ७६२ ॥ (अ)

कष्टीं करी आचरण ॥ तपवर्त्ता हितीर्थ दान ॥
भक्ती वैराग्य पूर्वज्ञान ॥ संपादूंनि ॥ ७६२ ॥ (ब)

लोकांतेंचि अनुसरे ॥ लोकांचे अनुसर मानी बारे ॥
ते वेश्या दासी ना खरें ॥ वृषळी रंडा ॥ ७६३ ॥

दांभिकु देखोनियां नरु ॥ तयातें उपदेशी जो गुरु ॥
आसुरी संपदेचा विस्तारु ॥ तेणे केला ॥ ७६४ ॥

तेणेंचि साधूतें छळिलें ॥ मार्गा तें कुश्चळ केलें ॥
हित नाशूनि बुडविलें ॥ अहितीं जना ॥ ७६५ ॥

दांभिकाचें व्यर्थ ज्ञान ॥ भक्ति वैराग्य कर्माचरण ॥
नाना पापा संग्रहो पतन ॥ घातक तें ॥ ७६६ ॥

दांभिकु अज्ञाता द्रव्य ॥ ही क्रिया कळा संपत्ती ॥
हांसोंनि बोले पुडती ॥ अयुक्तें यें ॥ ७६७ ॥

शब्देंचि दाटी येकांतें ॥ दृष्टीचि दावी जनातें ॥
शब्दु न फुटे सन्मुखांतें ॥ ऐसा तपे ॥ ७६८ ॥

जेणें करुनि दर्पिजे ॥ अर्जुना जाण प्रतिबिंबिजे ॥
दर्पणी आपणा देखिजे ॥ आपणा जैसे ॥ ७६९ ॥

तैसा विद्येचां पूर्णपणी ॥ आपणंचि आपणा देखे नयनी ॥
दुजयाची विद्या न मनी ॥ आपणावाचूंनि ॥ ७७० ॥

धनाढ्यपण पाहाता कैसें ॥ तेथें आपणूचि प्रतिबिंबला दिसे ॥
तया आपणा पाहोंनि हांसे ॥ आणिकां तें ॥ ७७१ ॥

ज्ञान योगीं साधनी ॥ वेदीं शास्त्री पुराणी ॥
आचारी व्यवहारी साधनी ॥
धनवंतु श्रेष्ठु म्हणौनि ॥ भलते न पक्षे ॥ ७७२ ॥

यापरि सर्वत्र दर्पला ॥ आपणा तेंचि देखों लागला ॥
तो दर्पु आम्ही म्हणीतला ॥ राजसां देही ॥ ७७३ ॥

॥ **अभिमानः च** ॥ ००० ॥

आता ययाचि दर्पा ऐसा ॥ अभिमानु ग्रहो राजसां ॥
तोचि आतां कैसा ॥ हें जै पुससील ॥ ७७४ ॥

श्रेष्टपदीं आपण बैसावें ॥ आपणा तेंचि समग्री मानावें ॥
बोलते न आपणासींचि बोलावें ॥ इतरांसी ना ॥ ७७५ ॥

दांभिकु अज्ञाता द्रव्यहीनु ॥ नेदी लोके जयामानु ॥
तो तरे परि वित्पन्नु ॥ न तरे सर्वथा ॥ ७७६ ॥

ऐसा वोखटा जो दंभु ॥ जयाचां ठांइं तो स्वयंभु ॥
आसुरी संपदेचा लाभु ॥ तया पुरुषी ॥ ७७७ ॥

ययाचि भावा सेजारी ॥ असे राजसीचां शरीरी ॥
तो कवणु जो वैरी ॥ साधु भावाचा ॥ ७७८ ॥

॥ **दर्पः** ॥ ००० ॥

दर्पाचे बीज पाहिलें ॥ तें ज्ञानयोगें अंकुरलें ॥
वित्पत्तीसीं पाल्हाइळें ॥ ऐसें जै कीं ॥ ७७९ ॥

दुजयाचिये युक्ती हांसणें ॥ आत्म जाणीवेचे नि गुणें ॥
शब्दीचि कुसरि घेणें ॥ करणें चेष्टा ॥ ७८० ॥

शास्त्रेंचि पोषला दर्पु ॥ तो भावार्थाचा करी लोपु ॥
व्याकर्ण बळे आटोपु ॥ करुनियां ॥ ७८१ ॥

महापंडितांतें म्हणे पोरें ॥ अज्ञुणि तुम्ही लेंकुरें ॥
आधीं बोलोसि का उत्तरें ॥ मग वादु करा ॥ ७८२ ॥

वेदेंचि दर्पु होये ॥ तै आणिकाचें मना न ये ॥
ठावे कोठे न माये ॥ पूर्णु जाला ॥ ७८३ ॥

द्रव्य अथवा मान्यता ॥ येणें जै होये पोषता ॥
तै आणिकाची श्रेष्ठता ॥ नाइकवे श्रवणी ॥ ७८४ ॥

अभाग्यां जनातें हांसणें ॥ आपुलेनि भाग्यें तेणें ॥
आपुलींचि कीं सांगणें ॥ इतरांप्रति ॥ ७८५ ॥

अहो यांचिया आणि युक्ती ॥ मा तेचि म्हणावें सर्वज्ञु ॥
मातेंचि आपुला मानु ॥ मीचि ईश्वरा समानु ॥
दुजा कैचा ॥ ७८६ ॥

कवण आगळें बोलैल ॥ आणिकातें आधी मानील ॥
मज समानु म्हणवील ॥ कवणु कैसा ॥ ७८७ ॥

माझीचि स्तुति करावी ॥ कीर्ती माझी वाखाणावी ॥
ऐसा अहंभाव  बहुजीवीं ॥ अभिमानु तो ॥ ७८८

राजा माते वंदील ॥ यती पाय झाडील ॥
देवा देव म्हणतील ॥ जन मातें ॥ ७८९ ॥

अथवा मी येकु पोषिता ॥ सकळांचा आगें नियंता ॥
माझी अवज्ञा माता पिता ॥ कैसीं करितील ॥ ७९० ॥

म्या केलें तेंचि चालावें ॥ मर म्हणणें तेणें मरावें ॥
बोलवीन तेणेंचि बोलावें ॥ येरा मौन ॥ ७९१ ॥

मी रुपवंतु मी धनवंतु ॥ योगी ज्ञानी मी विद्यावंतु ॥
नियंता प्रभु समर्थु ॥ मीचि येकु ॥ ७९२ ॥

यापरी सकळ भाग्य पाहातां ॥ तेथें मीपणें जो परता ॥
आपणा तेंचि मानी सर्वथा ॥ तितुलेंसि हा ॥ ७९३ ॥

ऐसा अभिमानु दुणावे ॥ जंवं जंवं तो योगु पावे ॥
करी तें चाले स्वभावें ॥ इतरावरि ॥ ७९४ ॥

कांही येक योगा नये ॥ अभिमानाची हानि होये ॥
तै याचा सारथी आहे ॥ तो पावे वीरु ॥ ७९५ ॥

॥ **क्रोधः** ॥ ००० ॥

क्रोधु हें अभिमान जयातें ॥ प्रसिद्ध कवण नेणें तयातें ॥
रुद्रा प्रलयीं वर्ते ॥ सामर्थ्ये जयाचें ॥ ७९६ ॥

पेटला जाळी अग्नी ते ॥ लागला पोळी सूर्यातें ॥
बाधकु होये पंचवदनातें तै तो सर्वस्वे नुरे ॥ ७९७ ॥

अमृत ना तें जीवन ॥ तेणें नाहीं जया सांतवन ॥
तयातें निववी ऐसें वचन ॥ आथीचि ना ॥ ७९८ ॥

तापसियां तरीं हा तस्करु ॥ विश्वासें लागला तप हरुं ॥
महाप्रळयींही हा अमरु ॥ क्रोधु जातो ॥ ७९९ ॥

राजसांचां हृदयीं उमटे ॥ तेणें सर्वांग तयांचें पेटे
मग विश्व जाळावया प्रकटें ॥ पाप रुंपुं ॥ ८०० ॥

कुंकुम लाविलें होये वदन ॥ तैसेंचि आरक्त नयन ॥
करकरां वाजती दशन ॥ जै क्रोधु पावे ॥ ८०१ ॥

चळचळां गात्रें कांपती ॥ नासा पुष्टे स्फुरस्फुरिती ॥
शरीरीं लागे ज्योति ॥ स्पंदती प्राणा ॥ ८०२ ॥

दंता अधरोष्ट्रां वैर लागे ॥ मुष्टी वळती वेगें ॥
वदन न हे उगें ॥ करी स्पंदन ॥ ८०३ ॥

नयनी लोटती अश्रुधारा ॥ तैतें शैत्य ना तो उबारा ॥
तापु आणि कंपु गात्रां ॥ येकुदांची ॥ ८०४ ॥

दणदणा वाजती चरण ॥ सण सण शब्दांचे बाण ॥
अवाच्य वाद मुखा माजून ॥ निघोंचि लागती ॥ ८०५ ॥

विवेकु पळाला आंसूंनि ॥ गेला सत्वांशु जळोनि ॥
मग विधु निशेध न मानी ॥ ते बुद्धी करपली ॥ ८०६ ॥

पिता माता ना अग्रजु ॥ गुरु मित्रु ना गोत्रजु ॥
नाहीं जयांचां देहीं उमजु ॥ तो काये करी ॥ ८०७ ॥

अवाच्यें बोले उत्तरें ॥ उचलिला करु हाणे सभारें ॥
देवतासन तें पापरें ॥ हाणोनि पाडी ॥ ८०८ ॥

आश्रमा लागला तया नुरवी ॥ थोर ही वर्णु तो सांडवी ॥
भूता ऐसें नाचवी ॥ मनुजा क्रोधु ॥ ८०९ ॥

आत्महत्या ब्रह्महत्या ॥ स्त्रीहत्या वीरहत्या ॥
बाळकहत्या गोहत्या ॥ जेणे घडती ॥ ८१० ॥

आंगे आंग झोंबवी ॥ अबळा आवांका दे जीवीं ॥
रोषा वेषु तो नाचवी ॥ हाट चोहोटां ॥ ८११ ॥

क्रोधु नेणे पुण्य पापा ॥ न चलती तऱ्हीं दे शापा ॥
वाळउंनि काचरी सोपा ॥ शरीर करी ॥ ८१२ ॥

जयाचा हृदयी हा असे ॥ तयातें न सेविती विदुषें ॥
पडलया सर्पा ऐसें ॥ दूरि वर्जावें ॥ ८१३ ॥

की नरकाची बेंद उत्ते ॥ कवणु सिंतोडा घे तेथे ॥
तामस मरे तयातें ॥ कवणें धरावें ॥ ८१४ ॥

क्रोधें शरीर विटाळलें ॥ तें जन्मूनि विचारें सांडिलें ॥
व मनी सुरस पडिलें ॥ खांड जैसें ॥ ८१५ ॥

ऐसा अभिमानु अपूरु ॥ तै चाले क्रोधाचा पुरु ॥
आतां तयाचाचि मित्रु ॥ येकु आहे ॥ ८१६ ॥

**॥ पारुष्यमेवच ॥ ००० ॥**

क्रोधेंसीं अभिमानु उठी ॥ तै दोघा तया पडे गांठि ॥
येकु येकेंसीं किरीटी वेगळा नव्हे ॥ ८१७ ॥

तया दोंहींचें येकपण ॥ तेथें पारुष्य म्हणिजे निष्ठुरपण ॥
तिसरें होये उत्पन्न ॥ तेंचि कैसें ॥ ८१८ ॥

दुखवैल कां हे मरैल ॥ नुपजे ऐसें केवळ ॥
प्राण घेता कळवळ ॥ नुपजे हृदयी ॥ ८१९ ॥

झोबतां हाडचि फोडी ॥ हाणतां माजाडाचि मोडी ॥
प्राण घेउंनि पाडी ॥ भूमीवरि ॥ ८२० ॥

कृपाहीन अंतःकरण ॥ न द्रवे तेणें मन ॥
पारुष्य अतिकठिणपण ॥ संहारु कर्ते ॥ ८२१ ॥

क्रोधेंही अभिमानेंवीण ॥ कौतुकेंचि घेती पर प्राण ॥
तयांचां हृदयी कठिणपण ॥ आहे जाणावें ॥ ८२२ ॥

बोधितांहीं न बोधे चित्त ॥ कठिण तैसेही अत्यंत ॥
पर पीडणें सुख होत ॥ ते तयाची करणी ॥ ८२३ ॥

नाना हत्यांचे तें कारण ॥ येकचि पुरे निष्ठुरपण ॥
आत्ता पापविषयीं संग्रहून ॥ बहुसाल काये ॥ ८२४ ॥

व्याघृ जैसा नृपाळा ॥ की तो भुजंगु काळा ॥
आप परावयां सकळां सारिखाचि ॥ ८२५ ॥

कृपाहीनु वरि क्रोधी ॥ अभिमाने धरी घात बुध्दी ॥
तो येक सांग पा आधीं ॥ कवणें निवारावा ॥ ८२६ ॥

अशक्तु तो ऐसा बरा ॥ भाग्यहीनु धनुर्धरा ॥
ना क्रमे तया दुसरा ॥ तै त्याचेंचि बरे ॥ ८२७ ॥

तया राज्यबळ अथवा तपोबळ ॥ आंगबळ अथवा योगबळ ॥
ते अनिवारू घातक प्रबळ ॥ तयाचें तया ॥ ८२८ ॥

अभिमानु क्रोधु निष्ठुरता ॥ कासाया पासूनि तया पूर्णता ॥
आणि येहीं पावे पुष्टता ॥ ते कवण म्हणसी ॥ ८२९ ॥

॥ अज्ञानंच ॥००॥

तरि दंभादि पाचही बोलिलीं ॥ अज्ञानापासावतीं जालीं ॥
आणि येहीं पाचीं बाणली ॥ दृढता अज्ञाना ॥ ८३० ॥

तें अज्ञान म्हणसी कवण ॥ तरि अनुश्रृत पांचांतेही कारण ॥
पांची बळावलें आपण ॥ तयां तेंचि करी ॥ ८३१ ॥

असो ते अज्ञान कैसें ॥ म्हणसील तरि वरियसें ॥
जेणे स्व पर स्वरूप न दिसे ॥ सत्य काये ॥ ८३२ ॥

मी हा कवणु दिसे हें काये ॥ बंधु कीं मोक्षु येणें आहे ॥
जाणवें कवणें उपायें ॥ ऐसे न कळे ॥ ८३३ ॥

येकचि आपुले अज्ञान ॥ ते सर्वापक्षी नेणपण ॥
सुबुध्दि केवळ विस्मरण ॥ ऐसें जाणावें ॥ ८३४ ॥

अज्ञानाचेनि आधारें ॥ विपरित होउंनि ज्ञान स्फुरे ॥
अन्यथा ज्ञान तेंचि खरे ॥ जाणतीं जाणावें ॥ ८३५ ॥

आतां आपुलें अयथार्थ ज्ञान ॥ तेणें सर्व विपरित भासे भान ॥
सर्वत्र अन्यथा ज्ञान ॥ तेंचि होये ॥ ८३६ ॥

तया अन्यथा ज्ञानाचिया वृत्ती ॥ दंभदर्पादि की समस्ती ॥
म्हणौनि अज्ञानातें आथी ॥ अनुश्रुत कारण ॥ ८३७ ॥

म्हणौनि राजसां तामसांचां ठांइं ॥ दंभादि भाव वर्तती जयी ॥
तद्रुप तितुलेंही अज्ञान तइं तेथे जाणावें ॥ ८३८ ॥

**॥ आसुरी संपदमभिजातस्य ॥ ०० ॥**

ते रज तमोमयी प्रकृति तीचां ठांइं जया संभूति ॥
आसुरी संपदि वीरपती ॥ वाखाणिली जे ॥ ८३९ ॥

तिचां ठांइं जो संभवला ॥ तिया जो पुरूषु घेतला ॥
तो अज्ञानु वरि भूतला ॥ अन्यथा ज्ञानें ॥ ८४० ॥

दंभादि सकळही गुण ॥ तयातेंचि होती जाण ॥
अज्ञान आणि अन्यथा ज्ञान ॥ तेणें तो युक्तु ॥ ८४१ ॥

तो असुरू हे जाण खरें ॥ मनुज परि साचोकारें ॥
देवद्रोही जाण बारे ॥ घातकु साधूंचा ॥ ८४२ ॥

**श्लोक**

दैवी संपद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता ।
मा शुचः सम्पदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥ ५ ॥ श्लोक ५ वा.

पांडुपुत्रा अवधारीं वचन माझें ययावरी ॥
या प्रकृति द्वयाची थोरी ॥ पुडती कैसी ॥ ८४३ ॥

**॥ दैवीसंपति ॥ ०० ॥**

संपत्सांगीतली जे पूर्वी ॥ अभिधान जियेचें दैवी ॥
ती प्रवर्त्तली यये विश्वी ॥ करी काये ॥ ८४४ ॥

**॥ विमोक्षाय ॥ ०० ॥**

समिपता आणि सलोकता ॥ स्वरुपता सगुण सायोज्यता ॥
ययां मोक्षांतें सर्वथा ॥ कारण होये ॥ ८४५ ॥

आणि माया अविद्याविनाशीं ॥ ब्रह्मते हेचि प्रकाशी ॥
निर्गुण सायोज्यता पुरूषासि ॥ संप्राप्तकरी ॥ ८४६ ॥

आसुरी वस्तुचें आचरण ॥ आत्मयां अविद्या बंधन ॥
अज्ञान अन्यथा ज्ञान ॥ एतदात्मिक ॥ ८४७ ॥

कामक्रोधादि निजगुणीं ॥ पुरूषा आश्रयातें वर्ते बांधोनि ॥
तयाही बंधनापासूंनि ॥ दैवी मुक्तु करी ॥ ८४८ ॥

आत्मयां अनात्म संबंधु ॥ अविया गुणकृतु बंधु ॥
करुंनि तयाचा छेदु ॥ तत्व प्रकाशी ॥ ८४९ ॥

असो सकळें उपाधीचे खंडण ॥ आत्मा ब्रह्म ऐसें ज्ञान ॥
दैवी ययाचें कारण ॥ भर्वसेना ॥ ८५० ॥

**॥ निबंध्धायासुरी मता ॥ ०० ॥**

आतां संपत्ती तेणेसीं दुसरीं ॥ तें बंधातें कारण आसुरी ॥
आश्रया पुरूषा पडे वरी ॥ जैसी विष निद्रा ॥ ८५१ ॥

की हे त्रिदोषाची मिठी ॥ पुरूषाचि माजूंनि उठी ॥
गति न चिंती गोमटी ॥ वरि सुटेही ना ॥ ८५२ ॥

संसार बध्दना हे मूळ ॥ कर्म तेंयि याचि समूळ ॥
जन्म मरणाची बंधन शाळा ॥ तेथें घाली ॥ ८५३ ॥

इया अज्ञान खरें केलें ॥ अन्यथा ज्ञान प्रकाशिलें ॥
गुणी गुणातीता गोविलें ॥ सोडिचिना ॥ ८५४ ॥

यिया युक्तत्वें असि जे ॥ तेंचि बंधन गा सहजें ॥
सांगिजैल तें तूं बुझें ॥ कौतुक महा ॥ ८५५ ॥

जाणि जें तेंचि बंधन ॥ जाणणे तेंचि आचरण ॥
यावरि कवळि जे नेणपण ॥ न सुटिजे तेणें ॥ ८५६ ॥

तैसें न धरि जे सावधानता ॥ तेंचि होये ज्ञान अन्यथा ॥
चिरकाळ बंधन तें आतां ॥ कासे न तुटे ॥ ८५७ ॥

तेथें प्रेत्नु जो जो की जे ॥ तें कर्मचि बंधन सहजें ॥
बंधातेंचि मोक्षु मानिजे ॥ सेविजे तो ॥ ८५८ ॥

आसुरी म्हणिजे महाविघ्न ॥ बंधमयी बंधाचें कारण ॥
ऐसें जाणोनि संपूर्ण ॥ मानिली हो ॥ ८५९ ॥

आतां तूं म्हणसील ऐसें ॥ आम्ही क्षेत्रीं करावें कैसें ॥
भू संबंधूचि धर्मु असे ॥ जयां आमुचा ॥ ८६० ॥

राज्य तेथें रजोगुणु ॥ कार्यीं उपजे तमोगुणु ॥
घेता परवयांचा प्राणु ॥ कैसी करुणा ॥ ८६१ ॥

आपुलें उणें न साहाणें ॥ प्रेत्नें इतरातें आणणें ॥
दर्पा नाहीं उणें ॥ शरीरीं माझा ॥ ८६२ ॥

अहो अभिमानु सांडावा ॥ ते हा संग्रामचि न करावा ॥
उणा बोलु न साहावा ॥ वैरियांचा ॥ ८६३ ॥

गुरु गोत्रज वधावे ॥ आपण राज्य अनुभवावें ॥
हे अज्ञान परि ज्ञान नव्हे ॥ ना चिन्ह ज्ञानाचें ॥ ८६४ ॥

दंभु तो सर्वथा लोकीकु ॥ आभुतें धर्मूचि आवशिकु ॥
करुं तो सकळ अविवेकु ॥ ऐसें असतां ॥ ८६५ ॥

आसुरी संपदेतें पावलो ॥ असुर भर्वसेन जालों ॥
देवद्रोही आतलों ॥ येणें मतें ॥ ८६६ ॥

बंधनी पडिलों हे निश्चित ॥ आसुरि या प्रकृतीयुक्त ॥
आता दैवी संपदा उचित ॥ आम्हा कैंची ॥ ८६७ ॥

देवा तू सर्वज्ञु अनंता ॥ नको प्रवर्ततुं येथें आता ॥
चिंतित्तां आमुचिया हिता ॥ तरि चाल म्हणसी ॥ ८६८ ॥

**॥ मा शुच ॥ ००० ॥**

तरि न करी ऐसा तूं शोकु ॥ सत्य मानी शब्दु येकु ॥
मी तंवं अहित पोषकु ॥ नव्हे तुमचा ॥ ८६९ ॥

॥ दैवी संपदमभिजातोसि ॥ ००० ॥

दैवी संपदा वाखाणिली ॥ मोक्षीं कारण जै सूचिली ॥
सत्वमयी उपपादिली ॥ प्रकृति जे ॥ ८७० ॥

तिचांचि ठांइं तू जालासि ॥ ना तिया युक्तु उपजलासि ॥
आतां ती पासाव सुटसी ॥ हेचि न घडे ॥ ८७१ ॥

दैवी तूतें सर्वत्र ॥ नाते चि सबाह्य अंतर ॥
आसुरी भावा मंदिर ॥ नसे तुझा ठांइं ॥ ८७२ ॥

श्लोक :-

द्वौ भूतसर्गो लोकेऽ स्मिन्दैव आसुर एव च ॥
दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥
अध्याय-१६-श्लोक-६

॥ हे पार्थ ॥ ००० ॥

अवधारीं पार्था वचन ॥ पवित्र तुझे अंतःकरण ॥
आइकतांचि प्रकृति निरोपण ॥ खोचलासि ॥ ८७२ ॥ (अ)

घेतले तुझेनि मने ॥ आता हे सर्व सांडणे ॥
साधु-साधु परि बोलणे ॥ माझें अनारिसें ॥ ८७३ ॥

॥ अस्मिनलोके ॥ ००० ॥

सकळ विस्तारु म्या केला ॥ त्या माजि मनुष्य लोकु आगळा ॥
मत्प्राप्तीचा आथीला ॥ अधिकारु यया ॥ ८७४ ॥

तथापि मनुष्य लोकीं यये ॥ आन येक कांही आहे ॥
तें सांगितलेंचि परि राहे ॥ सांगैन पुडती ॥ ८७५ ॥

॥ द्वौ भूतसर्गो ॥ ००० ॥

द्विविधु असे भूतसर्गु ॥ येकु तो मोक्षविषयी मार्गु ॥
येकु प्रतिबंधकु अमार्गु ॥ ऐसे दोन्ही ॥ ८७६ ॥

॥ दैवासुरएवच ॥ ००० ॥

येकु दैव येकु आसुरु ॥ हा मागां सांगीतला निर्धारु ॥
देवें मोक्षु इतरु ॥ बंधकु म्हणौनि ॥ ८७७ ॥

हा मनुष्याचा विचारु ॥ तू तंवं इंद्राचा अवतारु ॥
मी श्रीविष्णु सारंगधरुं ॥ ऐसे दोघे ॥ ८७८ ॥

तया तूतें सुरेश ॥ असुरत्व न ये सहसा ॥
तूं वर्त्ते पांभळे तैसा ॥ बाधु नाही ॥ ८७९ ॥

यातीचा आणि निर्मळ ॥ तया कामे लागे बाह्यमळ ॥
कांचना खता केवळ ॥ न चढे जैसा ॥ ८८० ॥

आतां सिद्ध तूं ऐसें नेणसी ॥ पंडूचाचि मी म्हणसी
तऱ्हीं परि असरु न होसि ॥ कुंतीसुता ॥ ८८१ ॥

यया शब्दा काये प्रमाण ॥ तरि तुझेचि विमळ ज्ञान ॥
आइक पुडती निरोपण ॥ बोधसील ॥ ८८२ ॥

**॥ दैवो विस्तरशः प्रोक्ता ॥ ००० ॥**

दैवु सर्गु सांगीतला ॥ विस्तारे तोतू तेहीं कळला ॥
आतां संदेहो उपजला ॥ तो ये असुर सर्गी ॥ ८८३ ॥

**॥ आसुरंभे श्रुणु ॥ ००० ॥**

तरि असुराचें निरोपण ॥ करी मद्वाक्यें श्रवण ॥
तेणें आसुरीचे पूर्णज्ञान ॥ होईल तूतें ॥ ८८४ ॥

काक कोकिळ समान ॥ सारिखें दोहीचें उडाण ॥
परंतु अधिकाराचें चिन्ह ॥ तें वेगळेंचि गा ॥ ८८५ ॥

कीं अंतर चिन्हें वीरपती ॥ बाह्य व्यापारीं जाणती ॥
सारिखी असोनि व्यक्ति ॥ काज काये ॥ ८८६ ॥

ते सुस्वर करी गायन ॥ मधुरा फळाचें सेवन ॥
तो कर्कशु जाउन ॥ झोंबे खरी ॥ ८८७ ॥

तैसा सारिखा नरा नरु ॥ परंतु केवळ जो असुरु ॥
तयाचें चिन्ह व्यापारु ॥ तयाचा सांगे ॥ ८८८ ॥

**श्लोक :-**

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।
न शौचं नापि चाचारो न सत्य तेपु विद्यते ॥ ७ ॥

॥ आसुराः जनाः ॥ ००० ॥

म्हणौनि जे आसुर जन ॥ तयांचें वेगळेंचि लक्षण ॥
आइक साकल्यें सांगैन ॥ बोधसील ॥ ८८९ ॥

॥ प्रवृत्तिंच ॥ ००० ॥

प्रपंचु हा कोठूनि जाला ॥ कवणे वस्तुचा रचला ॥
कैसा उपक्रमु आथिला ॥ याचिये उत्पत्तीचा ॥ ८९० ॥

ऐसी प्रपंचाची संभूति ॥ हेचि जाणावी प्रवृत्ति ॥
पुडती आइक वीरपती ॥ प्रवृत्तीपासाव ॥ ८९१ ॥

॥ निवृत्तींच ॥ ००० ॥

पुडती कैसा हा संहारे ॥ कवणें वस्तुचां ठांइं जिरे ॥
अभावें ययाचेनि उरे ॥ ते कवण तत्व ॥ ८९२ ॥

ऐसा प्रपंचाचा संहारु ॥ तोचि निवृत्तीचा प्रकारु ॥
अर्जुना म्हणे सारंगधरु ॥ उचित देइं ॥ ८९३ ॥

गुणाचा उद्भक ते प्रवृत्ति ॥ लयो गुणाचा तो निवृत्ति ॥
हेही येकीं वित्पत्ति ॥ ऐसी आहे ॥ ८९४ ॥

गुण ते कवणे वस्तूचे ॥ कवण कार्य कवणांचें ॥
गुणा पासाव साचें ॥ होये तें कवण ॥ ८९५ ॥

गुणातें क्रमे कैसा लयो ॥ आणि जालया गुणातें व्ययो ॥
कार्य संहित्तां उरे आश्रयो ॥ कवण गुणातें ॥ ८९६ ॥

अथवा गुणाची सकार्य संभूति ॥ ते कवणा पुरुषाची प्रवृत्ति ॥
गुण ग्रासु तो निवृत्ति ॥ कवणाची कैसी ॥ ८९७ ॥

अथवा गुणसहित भान होये ॥ येथ ये तदाकारें सत्य काये ॥
भान पुडती सामाये ॥ तेथें संत कवण ॥ ८९८ ॥

अथवा आनयेकि वित्पत्ति ॥ प्रवृत्ति म्हणिजे प्रवृत्ति ॥
कीं तैसा चार निवृत्ति ॥ ऐसें आहे ॥ ८९९ ॥

आतां निवत्ति लक्षण प्रवत्ति ॥ ते कैसी कवण हे युक्ति ॥
आणि प्रवत्ति रुपें निवत्ति ॥ तै कैसी काये ॥ ९०० ॥

किं प्रवृत्ति म्हणिजे प्रवत्ति ॥ म्हणिजे कव्हणी येकि असे युक्ति ॥
ते जाणतीं जाणावी संती ॥ महानुभावीं ॥ ९०१ ॥

प्रवत्तिचिं निवत्तिची म्हणिजे ॥ आतां दोहींची रीती
रीतीचि ऐसा भाॐ ॥ ९०२ ॥

कीं असतां प्रवत्ति निवत्ति ॥ निश्चयेंतीची गति कैसी ॥
ऐसी युक्ति साचकाये ॥ ९०३ ॥

किं प्रवत्ति म्हणिजे प्रवर्त्तणें ॥ निवृत्ति म्हणिजे न प्रवर्त्तणें ॥
ते कोठे कैसें का तेणे ॥ करूंनि काये ॥ ९०४ ॥

असो ऐसिये प्रवृत्तीतें ॥ आणि यये ऐसिचे निवृतीतें ॥
आसुरजन जाण ते ॥ जाणतही असतां ॥ ९०५ ॥

॥ न विदुः ॥ ०० ॥

नेणती निश्चयें करूंनि ॥ अंशाशेंही धनुःपाणी ॥
तया अज्ञानत्व म्हणौनि ॥ मागांचि सांगितलें ॥ ९०६ ॥

अज्ञानाचें हेंचि लक्षण ॥ जें प्रवृत्ति विषयिक ज्ञान ॥
न प्रकाशे तेणें करूंन ॥ सर्व न कळें ॥ ९०७ ॥

तू म्हणसील वीरपती ॥ अगाध हे प्रवृत्ति निवृत्ति ॥
माझां तंवं वर्ते चित्तीं ॥ इचें अज्ञान ॥ ९०८ ॥

तेणें पुरविला दृढपण ॥ जालें संशया लागुंन ॥
तरि आइकें माझें वचन ॥ म्हणें वासुदे ॐ ॥ ९०९ ॥

अगा नेणतया कळे सांगतां ॥ तै तो ज्ञानाधिकारी कीं पार्था ॥
दिवसें दिवसु जाणतां ॥ जाणताचि होये ॥ ९१० ॥

नेणता तो स्वयं नेणेचि ॥ सांगतांही जैसा तैसाचि ॥
पुरूषु अधिकारी नव्हेचि ॥ तो नेणता गा ॥ ९११ ॥

आतां तुझें जें नेणपण ॥ तेणें सांडिले असे स्थान ॥
सांगतांचि तया ज्ञान ॥ ग्रासूंनि ठाइल ॥ ९१२ ॥

पुसतासि प्रवृत्ति निवृत्ति ॥ तरि तिची ऐसी रीति ॥
अवधान देइं वीरपती ॥ सांगिजैल ॥ ९१३ ॥

प्रपंचु जाला ब्रम्हीहूंन ॥ ययाते निमित्य कारण ॥
सकार्य हें कारण ॥ भासलें असतां ॥ ९१४ ॥

भान मात्र तें मायेचें ॥ सत्यत्व तेथें वस्तूचें ॥
ऐसें रूप प्रपंचाचें ॥ कैसें रचलें ॥ ९१५ ॥

तरि शुध्दचि तें शबळ ॥ तेणें अव्यक्त जालें प्रबळ ॥
महदहंकरण केवळ ॥ पासूंनि तया ॥ ९१६ ॥

अहं कायें जालीं भूतें ॥ तीं पंचीकृता पंचीकृतें ॥
ऐसी प्रवृत्ति म्हणिजे ॥ ते उत्पत्ति जाणावी ॥ ९१७ ॥

निवृत्ति म्हणिजें संहारू ॥ कार्याचा कारणी मोडे आकारू ॥
तेथें उरे सत्यें सत्याकारू ॥ बिजरूप तो ॥ ९१८ ॥

पृथ्वी विरे जीवनी ॥ ते दहवी तो पवनी ॥
पवनु सामावे गगनी ॥ अहंकारीं गगन ॥ ९१९ ॥

अहंकारू महतत्वीं मिळे ॥ माये माजितें कवळे ॥
माया ग्रासूनि शबळें ॥ शुध्दत्वें उरिजे ॥ ९२० ॥

ऐसा उपक्रमोपसंहारू ॥ प्रवृत्ति निवृत्ति विचारू ॥
आसुर नेणती प्रकारू ॥ कांचि हा ॥ ९२१ ॥

कां गुणा आपुला अध्यासु ॥ तेचि प्रवृत्ति जाणिजसु ॥
निवृत्ति तो स्वरूपाध्यासु ॥ तयांचि गुणांतें ॥ ९२२ ॥

यापरी प्रवृत्ति निवृत्ति लक्षण ॥ माये अविद्येचे अनादिगुण ॥
प्रकाशु प्रवृत्ति मोहो जाण ॥ तीन्ही ऐसे ॥ ९२३ ॥

प्रकाशु ज्ञान तें सत्वाचें ॥ प्रवृत्ति स्फुरण रजाचें ॥
विस्मरण पडे दोहींचें ॥ ते तयाची क्रिया ॥ ९२४ ॥

प्रवृत्ती प्रपंचु स्फुरे ॥ अज्ञानें विसरू त्याचा भरे ॥
दोहीचा संहारू बारे ॥ होये ज्ञानें ॥ ९२५ ॥

सत्संगे सत्व उत्तम ॥ असत्संगें रज तम ॥
स्वरूपसंगें धर्म ॥ सकळ संहारती ॥ ९२६ ॥

तो गुरूमुखें स्वरूप संगु ॥ गुणी आत्मा दावी असंगु ॥
तेणेचि साधने गुणवेगु ॥ स्वरूपीं जीये ॥ ९२७ ॥

की स्वतंत्रता नाही प्रवृत्ती ॥ तेचि आश्रया पुरूषाची प्रवृत्ति ॥
तो करी तरीचि उत्पत्ति ॥ तिची होये ॥ ९२८ ॥

म्हणोनि पुरूषु परमात्मा ॥ तैसाचि तदंशु जीवात्मा ॥
हे प्रवर्तले स्वरूप धर्मा ॥ निज ज्ञाने ॥ ९२९ ॥

तेचि प्रकृति तेचि गुण ॥ जें ईशाचें वृत्तिस्फुरण ॥
जो तेंचि न करी तै गुण ॥ सामावती तेथें ॥ ९३० ॥

एवं निमिषोन्मेष व्यापार ॥ पुरूषाचे हे समग्र ॥
येणेंसीं प्रकृति इतर ॥ नसे म्हणौनियां ॥ ९३१ ॥

अथवा प्रवृत्तिरूपें प्रवर्तलें ॥ तें भान नसे सत्यावेगळें ॥
म्हणौनि ब्रम्हचि आभासलें ॥ रूपें प्रवृत्तीचेनि ॥ ९३२ ॥

ते प्रवृत्ति भान मोडतां ॥ जैसी तैसी अखंडसत्ता ॥
चढु वोहटु सर्वथा ॥ तेथें नाहींचि ॥ ९३३ ॥

सागरीं जैसी लहरी ॥ जीवनचि तिचां आकारीं ॥
तें लयातें पावे जऱ्हीं ॥ तऱ्हीं तेचि सत्य ॥ ९३४ ॥

किं आभासु तया मृगजळाचा ॥ कीर्णचि चढु वोहटु तयाचा ॥
तैसा प्रवृत्ती निवृत्तीचा ॥ ब्रह्मचि आकारू ॥ ९३५ ॥

कीं स्वानुभवाचें बोलणें ॥ प्रवृत्ती निवृत्ती रूप करणें ॥
तेंचि येणें निरोपणें ॥ सूचिजत आहे ॥ ९३६ ॥

स्वरूपविषयीं प्रवर्त्तणें ॥ तै सकळे प्रवृत्तीतें सांडणें ॥
निवृत्तीरूप करणें ॥ प्रवृत्तीसी ॥ ९३७ ॥

ऐसी निवृत्ति तेचि प्रवृत्ति ॥ आतां निवृत्तीवीण जे आथी ॥
ते प्रवृत्तिही परती ॥ स्वरूपापासाव ॥ ९३८ ॥

करणें ते करूं वोसरणें ॥ वोसरणें तें केवळ करणें ॥
हें अनुभवी तो जाणें ॥ येरांतें ठक ॥ ९३९ ॥

कीं प्रवृत्ति म्हणिजे ते प्रवृत्ति ॥ करणी ते करणीचि आथी ॥
न करणे मात्र नाथी ॥ तयांचां ठांइं ॥ ९४० ॥

गुणी अकर्म दिसे ॥ तेथे करणी कांही असे ॥
नातरि सुषुप्ति तेचि निष्ठा ऐसें ॥ नहो तें कासया ॥ ९४१ ॥

गुणाचिये निवृत्ती ॥ न करितां वीरा प्रवृत्ति ॥
कृतकृत्यता तै वीरपती ॥ पशुही मुक्त ॥ ९४२ ॥

या लागूंनि वीरा जाण ॥ आरंभा तया पासूंन ॥
निष्ठा परियंत साधन ॥ प्रवृत्तीचि असे ॥ ९४३ ॥

आता ते प्रवृत्ति न कीजे ॥ ते निवृत्तीचि साच बुझें ॥
यत्नायत्नी माजे ॥ ते कायें करावी ॥ ९४४ ॥

प्रवृत्ती प्रवृत्ति निवृत्ती ॥ ते अवघीचि सत्प्रवृत्ति ॥
ती वेगळी प्रवृत्ति निवृत्ति ॥ अप्रवृत्ति ते ॥ ९४५ ॥

कीं असतां प्रवृत्ति निवृत्ति ॥ तेथिची सत्ताभाति ॥
आपणचि द्रष्टा वीरपती ॥ आत्मा आहे ॥ ९४६ ॥

तरि प्रवृत्ति ते प्रवृत्ति नव्हे ॥ निवृत्ति निवृत्ति स्वभावें ॥
आत्माचि द्रष्टा सद्भावें ॥ आपणु तेथे ॥ ९४७ ॥

कांही ती प्रवर्त्तणें ॥ अहिती अविहिती न प्रवर्त्तणें ॥
प्रवृत्ति निवृत्ति मानणें ॥ ऐसी तन्ही ॥ ९४८ ॥

हित म्हणिजे आत्मज्ञान ॥ विहित तयाचें साधन ॥
कर्मभक्ति आणि ज्ञान ॥ वैराग्य चौथे ॥ ९४९ ॥

ययाचे आचरण करितां ॥ मोक्षु होये सायोज्यता ॥
यया विपरीत पार्था ॥ तेथें निवृत्ति ॥ ९५० ॥

एवं हित विहित तें करणें ॥ अन्यथा काहीं न करणें ॥
ऐसी प्रवृत्ति निवृत्ति साधनें ॥ साधकी सूचिली ॥ ९५१ ॥

हें सांगतांचि तूतें सोपान ॥ कळो आलें तू तें जाण ॥
मुखाचि वरूनि चिन्ह ॥ जाणीतलें आम्हीं ॥ ९५२ ॥

आसुरां तें हें नकळे ॥ सांगीतलें ही येके वेळे ॥
तयांचे झाकले डोळे ॥ बाहेरि अंतरी ॥ ९५३ ॥

आन अवधारी अर्जुना ॥ सांगताचि तयां भेटेना ॥
आणि भेटलाही तो कळेना ॥ माने न कळला ॥ ९५४ ॥

मानला तन्हीं तो न संगे ॥ सांगीतलेंही तो नेघे ॥
घेतलें तें जाये अवघें ॥ तेव्हांचें तेव्हांचि ॥ ९५५ ॥

पाषाणु भिजे बारे ॥ पालथा घटीं तो ये न भरे ॥
तें येक देसी बाहेरें ॥ माणूंस गा ॥ ९५६ ॥

तूं ऐसां म्हणसील वीरपती ॥ तयातें साधु कां न संगति ॥
सांगीतले न थरे चित्तीं ॥ तें कवणें गुणें ॥ ९५७ ॥

**॥ तेषु ॥ ०० ॥**

तरि तयांचां ठांइं कारण ॥ यये अर्थी आहे कवण ॥
तेंचि सांगैन उकलून ॥ पांडुपुत्रा ॥ ९५८ ॥

**॥ शौचं न विद्यते ॥ ०० ॥**

शौचहीन ते अवधारीं ॥ अशूच अमंगळ बाह्यांतरी ॥
अत्यंतु कुश्चिळ शरीरीं ॥ तोही कां टाळे ॥ ९५९ ॥

आतां अंतरिचें कुश्चिळपण ॥ ज्ञान अप्राप्तिचें कारण ॥
तयाचें कैसें लक्षण ॥ सांगिजैल ॥ ९६० ॥

कामुक्रोधु मदुमछरू ॥ दंभु प्रपंचु अपारू ॥
निमिषोन्मेषी विसरू ॥ सिकलिया बोलाचा ॥ ९६१ ॥

संकल्प विकल्प कामना ॥ परदारा द्रव्यीं वासना ॥
वरि सांगिजे ते कळेना ॥ ऐसी जडता ॥ ९६२ ॥

निदां मछरू पराशा ॥ व्देषु मोहो वीरेशा ॥
चित्त गुंपले अळसा ॥ तें आपायेचि ना ॥ ९६३ ॥

हृदयीं त्रुष्णेचा अतिभरू ॥ दिवा रात्रौ स्तेय विचारू ॥
घातु पातु नेणें नरू ॥ पुढेचि पाहे ॥ ९६४ ॥

निष्ठुरता हृदयीं असंवर ॥ गर्वाचे मान अपान ॥
अहंकाराचें मंदिर ॥ नांदते तो ॥ ९६५ ॥

अविश्वासाची थोर खाणी ॥ परापवादाची उभवणी ॥
आसुरू जनु धनुःपाणी ॥ सूयावंतु ॥ ९६६ ॥

वांकुडेंचि जाणें येणें ॥ नीट गोष्टी नाहीं बोलणें ॥
ना नसीं वसे उणें ॥ दुसरेयाचें ॥ ९६७ ॥

वादी तंवं अपारू ॥ अविवेकीं अनावरू ॥
विचारा नाही पदरू ॥ माजिरि घावया ॥ ९६८ ॥

बहुसाल शोकु हृदयीं ॥ चिंता करितां उसंतु नाहीं ॥
मोहो ममता देहीं ॥ स्वजनी गृहादिकीं ॥ ९६९ ॥

अनास्था पाहिजेचि तुली ॥ हितविहित विषयीं भरली ॥
स्वास्था नाहीं मुळीं ॥ निमिषनिमिषार्ध ॥ ९७० ॥

प्रश्नेचा माल्हवला दीपु ॥ प्रेत्नाचा नुठी संकल्पु ॥
बहु बोलतां ये कोपु ॥ परावयाचा ॥ ९७१ ॥

केलें दुजयाचे न मने ॥ सांगीतले नाइके बोलणें ॥
आपुलेंचि मत माने ॥ जे जाण योगु सुभक्तांचा ॥ ९७२ ॥

कुटीळ परावें मानसीं ॥ बोलतांचि उठी कळहेंसी ॥
तया प्रतिकायिसी ॥ ज्ञान वार्त्ता हे ॥ ९७३ ॥

निद्रा न पुरे कल्पें येकें ॥ चट गोष्टिंचे भातुकें ॥
विनोदु क्रीडा तेणें सुखें ॥ रंजवी मन ॥ ९७४ ॥

श्रवणी मानस कां टाळें ॥ कुवादु तो मागे बळें ॥
बाह्य विषयीं सोकलें ॥ रातलें मन ॥ ९७५ ॥

एवं अंतरी चोखट कांही ॥ पाहिजे ते वस्तू नाही ॥
जेवि नरकाचां महाडोही ॥ वासु कापुराचा ॥ ९७६ ॥

अज्ञान अन्यथा ज्ञान ॥ हृदयी अपार दुष्टगुण ॥
अर्जुना अंतरिचें तें अशूचपण ॥ ऐसें आहे ॥ ९७७ ॥

बाह्य देखोनि प्रवर्त्तावें ॥ तरि शरीर ते शरीर नव्हे ॥
अशूच अपवित्र पाहावे ॥ साधूतें दृष्टी ॥ ९७८ ॥

स्नानाचा सर्वदा अभाउँ ॥ नुपजे संध्यावरि भाउँ ॥
तेथे देवाचा नाठाउँ ॥ तो कैचा असैल ॥ ९७९ ॥

प्रात:काळिचे मुखमार्जन ॥ सायंकाळी करी जाण ॥
जन्मुनि नेणे दर्शन ॥ कैसे उटावे ॥ ९८० ॥

गंधीं भरलें तें वदन ॥ चिडिबिडीत दोन्ही नयन ॥
मृन्मळाचें विलेपन ॥ बहुसाल आंगी ॥ ९८१ ॥

स्वेदें घाण तो असे नरु ॥ उन्मतु जैसा कुंजरु ॥
मलीन दिसे आकारु ॥ वर्णलोपकु ॥ ९८२ ॥

उभेंचि मुत्र सोडणें ॥ मळांचा त्यागु करणें ॥
तेथे शौचविधु पुसणें ॥ हेचि काये ॥ ९८३ ॥

सोविळे वोविळे न कळे ॥ भोजनी भलयतें आतळे ॥
वरुषावि सांतीसांची मुळें ॥ सांगा तें जेववी ॥ ९८४ ॥

येक धर्म विरुध्द केवल ॥ उगीचि लावी झळफळ ॥
तेंही शरीर कुश्चिळ ॥ मानावें जनी ॥ ९८५ ॥

नित्य नाहे आंगधूपी ॥ देवाचें आगंण न चेपी ॥
ब्राह्मणा नातळे पापी ॥ चोखट पण ॥ ९८६ ॥

भलतयांचे असो अन्न ॥ चोखट ते करी सेवन ॥
शीतळ निर्मळ जीवन ॥ वाम करे घे ॥ ९८७ ॥

ऐसी धर्मविरुध्द निर्मळता ॥ तेही परि नये मानितां ॥
चांडाळाची सुंदरता ॥ काये करावी ॥ ९८८ ॥

श्वान धूतलें जयापरी ॥ राषभ चोखालिलें जऱ्हीं ॥
तऱ्हीं याति दोषु तो शरीरीं ॥ अपवित्रु गां ॥ ९८९ ॥

स्वधर्मु सांडिताचि अंशु ॥ यातिवरि पडला दोषु ॥
तो प्रक्षाळितां अंशु ॥ मळाचा न फिटे ॥ ९९० ॥

आतां स्वधर्म युक्ती पार्था ॥ बाह्य जाली पवित्रता ॥
तरिं अंतरी मळ असतां ॥ पवित्र नव्हे ॥ ९९१ ॥

असो बाह्यांतरी अशूचपण ॥ तयाचें ऐसे लक्षण ॥
आतां ते असतां संपूर्ण ॥ आसुरांचा ठांइं ॥ ९९२ ॥

तया कवणु उपदेशिला ॥ काये कैसें तया कळैल ॥
म्हणौनि कुश्चिळ ते कुश्चिळ ॥ वायांचि गेलें ॥ ९९३ ॥

आतां साधु आपुलें महिमान ॥ तया गुप्त करी जाण ॥
अपवित्रा पवित्रपण ॥ कवणें आणावें ॥ ९९४ ॥

॥ आचारोपिन विद्यतेचा ॥ ०० ॥

असो सांगीतल्या ऐसी कांहीं ॥ आचरणूक घडे देहीं ॥
हाही परि प्रकारू कांहीं ॥ न देखिजे तेथें ॥ ९९५ ॥

पुरे जालें आचमनें ॥ मा उगाचि तऱ्ही चुळभरणें ॥
हे काये जया नमने ॥ पवित्रा पवित्र ॥ ९९६ ॥

विटाळ दावा म्हणे दृष्टी ॥ अर्धभोजनी बैसे उठी ॥
मळ सोडितां गोष्टी ॥ सांगे जाणा ॥ ९९७ ॥

करूं नयें ते बळे करणें ॥ नये भक्षूं ते भक्षणें ॥
सुटला संध्यास्नानें ॥ मुक्त म्हणवी ॥ ९९८ ॥

चहूं वर्णीं मागे अन्न ॥ स्नान संध्या माओपासना ॥
ऱ्याऱ्ही आश्रमवर्ण ॥ ययां जो वेगळा ॥ ९९९ ॥

जया इंद्रिया जें पाहिजें ॥ ते उगेंचि तया देइजे ॥
विहिता विहित नेणिजे ॥ आसुरीं तेही ॥ १००० ॥

ब्रह्मचारीचि पुत्रवंतु ॥ गृही षट्कर्म विरहितु ॥
संन्यासी आणि कळत्रवंतु ॥ आसुरू जो ॥ १००१ ॥

अतिथि नये आश्रया ॥ सर्वदा रतु अधर्मा ॥
त्याज्यु केला वीरोत्तमा ॥ उत्तमी लोकीं ॥ १००२ ॥

तीर्थ दान व्रतपूजा ॥ नाहीं भाऊँ जया कपिध्वजा ॥
अक्रिया आचरे माजा ॥ आले पणें ॥ १००३ ॥

मनादि इंद्रियां आवरण ॥ कर्माचे नाही बंधन ॥
ने घे कांटाळा अंतःकरण ॥ आसुराचें ॥ १००४ ॥

मद्यमांस नित्य जेवी ॥ बळेंचि विटाळ कालवी ॥
रूतवंती अनुभवी ॥ कामीनी जो ॥ १००५ ॥

दिवा रात्रौ स्त्री वस्तु ॥ वेश्येचां मंदिरीं वसतु ॥
अन्नपानादि विषयो समस्तु ॥ युक्त संपादी ॥ १००६ ॥

पांचही महापातकें ॥ सहजचि केलीं कौतुकें ॥
तेणें दोषु तो नोळखे ॥ पुडती करी ॥ १००७ ॥

बळेंचि परदारा भोगावी ॥ ऐसा साक्षेपु बहुजीवीं ॥
धर्मा अधर्माची पदवी ॥ मोडिली तेणें ॥ १००८ ॥

पाहिजे तो न करी आचारू ॥ तात्पर्यें अनाचार परू ॥
नेघे कव्हणाचा विचारू ॥ तो दैत्यु जाणावा ॥ १००९ ॥

कर्मयोगु ना भक्तिसाधन ॥ वैराग्य ज्ञान जाण ॥
कांहीचि न करी आचरण ॥ शुभांचें तो ॥ १०१० ॥

आचारू म्हणिजे धनु:पाणी ॥ भलयती विहित करणी ॥
मोक्षो पायालागूंनि ॥ वेदोक्त जे ॥ १०११ ॥

ते न करणें हा जयाविधु ॥ करणें ॥ तो महानिशेधु ॥
ऐसा आसुरू तो बध्दु ॥ अन्यथा कर्मे ॥ १०१२ ॥

ऐसिया कवणें सांगावें ॥ शुभकर्म जया न संभवे ॥
सांग तयाने अभ्यासावे ॥ योग कवणें ॥ १०१३ ॥

तूं म्हणसील वचन ॥ असो तयाचे अपवित्रपण ॥
नाही शुभाचें आचरण ॥ अशुभाचें आहे ॥ १०१४ ॥

ऐसीही असतां अपवित्रु ॥ आइकेचिं नित्यविचारु ॥
तो न करितांही आचारु ॥ बुध्दीवंतु होये ॥ १०१५ ॥

बुध्दि जाल या प्रवीण ॥ प्रवृत्ति धरी मन ॥
आचरे ना कां साधन ॥ पावित्रपण न धरी ॥ १०१६ ॥

ऐसिया आक्षेपा परिहारु ॥ आइकें जनु जो आसुरु ॥
तो अनाचारी अपवित्रु ॥ ऐसाही असतां ॥ १०१७ ॥

॥ सत्यं न विद्यते ॥ ०० ॥

तयांचा ठांइं सत्यपण ॥ तें काहीचि न देखिजे जाण ॥
आइक तयांचें चिन्ह ॥ सांगिजैल ॥ १०१८ ॥

असत्य अप्रिय बोलणें ॥ परहित नाशे जेणें ॥
आपण ही जाये प्राणें ॥ ऐसा शब्दु ॥ १०१९ ॥

असत्यचि आणि जाणपण ॥ असत्य दावी आचरण ॥
असत्य मायिक पवित्रपण ॥ पापियांचे ॥ १०२० ॥

बकु जै साध्यानशीळ ॥ बहुरूपी खेळेखेळ ॥
मैदांचा आचारु निर्मळ ॥ परघाता कारणें ॥ १०२१ ॥

करी येक बोले येक ॥ असे येक सांगे आणिक ॥
दिसे येक संपादी देख ॥ अनारिसेचि तें ॥ १०२२ ॥

असत्य आणूंनि जाणपण ॥ असत्य धरूनियां ध्यान ॥
नाशावें कीं येणे जन ॥ योग्य ते पासाव ॥ १०२३ ॥

आणि असत्यवादी ठांइंचा ॥ शब्दु काये मानावा तयाचा ॥
विश्वासु जालिया साक्षात्काराचा ॥ तो काये तेथे ॥ १०२४ ॥

तूं ऐसे बोलसी वचन ॥ देखोनि साधू सज्जन ॥
धिग्य म्हणौनि असत्यपण ॥ न संडी हा ॥ १०२५ ॥

धांउनि येकु बैसला ॥ येकु उपवासीचि म्हणे घाला ॥
परंतु मनी तंवं खोचला ॥ लाजावी रे ॥ १०२६ ॥

येका समर्थातें देखोनि ॥ लटिकेंचि आपण जो मनी ॥
तो वोसावला मनी ॥ उतरोचि लागे ॥ १०२७ ॥

येकाचें पाहोनि पवित्रपण ॥ तैसें आपणा मानी जाणोंन ॥
तथापिं तें आपुले मन ॥ नेणंते नव्हे ॥ १०२८ ॥

येकाचें देखोनि खरें ॥ आपुलें खोटें त्यांहूनि बरें ॥
बोलेचि परि अभ्यंतरे ॥ बाणु लागे ॥ १०२९ ॥

सत्यवादियासीं बोलतां ॥ असत्य न पवे सिध्दांता ॥
तेथ तया शंकवी भलेता ॥ शंके आपणूंही ॥ १०३० ॥

तैसा धर्महीनु अपवित्रु ॥ असत्य सर्वदा नरु ॥
तया सत्संगु साचारु ॥ घडला असतां ॥ १०३१ ॥

तया दुर्जेनि न संगता ॥ आपणूंचि होये जाणता ॥
बुध्दि लाजवी चित्ता ॥ तयाचिया ॥ १०३२ ॥

क्रमेंचि असत्य सुटैल ॥ क्रमेचि सत्य उपजैल ॥
क्रमेचि पवित्रपण येइल ॥ संताचेनि संगे ॥ १०३३ ॥

यालागि उपदेशु तया तो असो ॥ सत्संगो मेघु वर्षो ॥
अंकुरु बुध्दी चे दिसो ॥ येती ह्रदय भूमिके ॥ १०३४ ॥

ऐसें बोलसील तू वचन ॥ सत्संगे तरती असुरगण ॥
तरि तयां दैत्यांचे लक्षण ॥ अनारिसें असे ॥ १०३५ ॥

॥ श्लोक ॥

असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहूरनीश्वरम् ।
अपरस्परसम्भूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥

तरि आतां ते आसुरजन ॥ असत्य आंगाचे आपण ॥
अशूच आणि धर्महीन ॥ वेद बाहीं ॥ १०३६ ॥

प्रवृत्ती निवृत्ती ते नेणती ॥ दुष्टांगुणी पूर्ण आहाती ॥
तयांचा आंगी युक्ती ॥ वेगळीचि ते ॥ १०३७ ॥

॥ आहू: ॥ ०० ॥

मग ते आपुलिया मती ॥ आपण ऐसे विश्व देखती ॥
काये म्हणौनि बोलती ॥ सिध्दांत मुखें ॥ १०३८ ॥

॥ जगदसत्यं ॥ ०० ॥

जग हे अवघेंचि असत्य ॥ कोठें आहे याथातथ्य ॥
मावदाउंनि अत्यंत ॥ स्वार्थु पोषिता ॥ १०३९ ॥

अहो पैल ते महानुभाव ॥ आम्ही जाणो म्हणती सर्व ॥
तें मिथ्या अवघी माव ॥ पदार्थ दाविती ॥ १०४० ॥

ब्रह्म तें कवणें देखिलें ॥ काळें निळें की पिवळें ॥
जाणपण दाविती आगळें ॥ तें मिथ्या सर्व ॥ १०४१ ॥

आम्हाचि ऐसें हे खाती ॥ गोड कडू सर्व जाणती ॥
ते आम्ही नहों हे होति ॥ महंत कैसे ॥ १०४२ ॥

आम्हाचि ऐसे संसारी ॥ आसक्त गृही व्यापारीं ॥
आतां ययातेंचि कायीसी थोरी ॥ महानुभावपणाची ॥ १०४३ ॥

एक पोर आम्हा तरि ॥ सातपांच याचां उदरीं ॥
आता आम्हीची काये केली चोरी ॥ जे सत्पुरुषु न हो ॥ १०४४ ॥

योगी बैसले साधक ॥ तयांचें अवघें फोका शितोष्ण ॥
होये बाधक ॥ सारिखेंचि ॥ १०४५ ॥

आम्हा जाणतां हा उपजला ॥ सांपें सांपें योगी जाला ॥
अहो पोटालागि घेतला ॥ सकळ वेषु ॥ १०४६ ॥

यया जाले ब्रह्मज्ञान ॥ येथ काये जाणावें प्रमाण ॥
साच नमनु वाचाळपण ॥ अनुभउ दावा ॥ १०४७ ॥

मेघ वर्षावा अकाळीं ॥ जळा अग्नी चांडवाळी ॥
हाणोंन हृदय कमळीं ॥ दुःखस्त हा ॥ १०४८ ॥

अहो पैल ते कर्मठ ब्राह्मण ॥ ययांचे मिथ्याज्ञान ॥
त्रिकाल संध्यावंदन ॥ जपु करिती ॥ १०४९ ॥

विश्वामित्रे श्रृष्टि केली ॥ तैसी क्रिया इही दाविली ॥
तरी ते गायत्री मानली ॥ ययांची आम्हा ॥ १०५० ॥

दंडाचा करावा दिनकरु ॥ दंभावरी धरावा मेरु ॥
तरि तो मानूंन साक्षात्कारु ॥ ययांचा आम्ही ॥ १०५१ ॥

येथ विचारें पाहातां ॥ ते हे गायत्रीचि नव्हे तत्वता ॥
पोटाकारणे गाथा ॥ रचिला येकु ॥ १०५२ ॥

तोचि वेदु हा होईल ॥ हे काये साचे घडैल ॥
आता प्रतीति दाविजैल ॥ रोकडीचि ॥ १०५३ ॥

वेदु सत्य कीं असत्यु ॥ आता असत्यु नव्हे जै सत्यु ॥
तरि आसीर्वादु असत्यु ॥ वेदोक्तु न व्हावा ॥ १०५४ ॥

वेदोक्त आसीर्वाद अघवे ॥ बोलतां ते कळोंचि लागावे ॥
सर्वदा वेदु असत्यु नव्हे ॥ ऐसे जरी ॥ १०५५ ॥

आवाहनी अग्नि यावा ॥ सुर्यो वरुणु पाचारावा ॥
नातरि वेदु सत्य मानावा ॥ कैसियापरी ॥ १०५६ ॥

वेदवचनचि असत्य ॥ ना वेदीं बोलिलें तें काय सत्य ॥
असो शोधन अत्यंत ॥ वेद मिथ्या ॥ १०५७ ॥

पोटार्थ केले ब्राह्मणी ॥ न करुं आम्ही ऐसी करणी ॥
पूर्वील वेद सत्यमानी ॥ तोही मुर्खु ॥ १०५८ ॥

पूर्वी वेदाचें वचन ॥ सत्य होये म्हणौन ॥
यये अर्थी प्रमाण ॥ काये असे ॥ १०५९ ॥

पुराणावरुंनि मानावें ॥ तें हीं कां असत्य नव्हे ॥
पोटार्थ तर्डक नवें ॥ ब्राम्हणी केले ॥ १०६० ॥

पुराणाआतुली कथा ॥ कवण जाणे त्यांची सत्यता ॥
ऐसें आम्ही येक आता ॥ पुराण करुं ॥ १०६१ ॥

तीर्थ दान तपव्रत ॥ यावरुंन मिथ्या हे समस्त ॥
शास्त्र महर्षी प्रकृत ॥ हेही न घडे ॥ १०६२ ॥

कैंचे होते महर्षी ॥ प्रमाण काये या बोलासि ॥
असो आता ठावा तयांसि ॥ आमुतें डोळां ॥ १०६३ ॥

मेले वा गेले रुषेश्वर ॥ तरि दावा तयांचे घर ॥
बदरी आश्रय समग्र ॥ हें जें बोलणें ॥ १०६४ ॥

तें झुकवणेंचि कां नमनावें ॥ साच कासया तें म्हणावें ॥
सत्य नव्हे अघवे ॥ चराचर ॥ १०६५ ॥

तपे हा जै दिवाकरु ॥ देवो ऐसा निर्धारु ॥
तैसाचि सोमु इतरु ॥ हें जै होतें ॥ १०६६ ॥

तै प्रत्यक्ष देतां गाळी ॥ हा कां आमुतें न जळी ॥
सेवा करितां भूमंडळी ॥ पावेना कां ॥ १०६७ ॥

काय तें असो कैसें ॥ हा तंवं प्रत्यक्षु दिसे ॥
साच कीं लटिका ऐसें ॥ जाणवैल ॥ १०६८ ॥

या लागूंनि दिनकरु ॥ तो नव्हे देउॅं साकारु ॥
कवण जाणें ते जाकारु ॥ काये असे ॥ १०६९ ॥

पितरांची करिती सेवा ॥ कांहीं नेदेव त्यानि देवां ॥
मेलियां समानें होती देवां ॥ हे काय सत्य ॥ १०७० ॥

पितरेचि देवा जालीं ॥ तै दरिद्रता वंशा कां आली ॥
मुर्खें पामरें भुललीं ॥ श्राध्दें करिती ॥ १०७१ ॥

ममत्वें पितरां द्यावें ॥ तरि ते कवणा अन्न पावे ॥
विचारा आणा बरवें ॥ जाण ते जन ॥ १०७२ ॥

पितरचि त्रुप्त होती ॥ तरि ब्राह्मणाची क्षुधा न पुरती ॥
पुरे जे वेव्हार म्हणती ॥ न म्हणावें तें ॥ १०७३ ॥

पूर्व जन्मीचे आपुले ॥ देती तें आपणा पावलें ॥
कै ऐसें देखिलें ॥ न खाता त्रुप्तपण ॥ १०७४ ॥

म्हणौनि वेदशास्त्रपुरण ॥ तीर्थ तपव्रत दान ॥
कर्मभक्ति ज्ञान ॥ साधन जें कां ॥ १०७५ ॥

तें सर्व अवघेंचि लटिकें ॥ कल्पिलें कव्हणें येकें ॥
कैचे स्वर्ग कैंची सुखें ॥ कैंचे देवा ॥ १०७६ ॥

येथे उदर येक साचार ॥ तदर्थ नाना आचार ॥
विचारितां लटिकें समग्र ॥ मनोंमान सें ॥ १०७७ ॥

यापरी महानुभावांचां ठांइं ॥ असत्यपण देखे सर्वही ॥
तयातें तो संगु कायी ॥ देइल फळ ॥ १०७८ ॥

तीर्थ असत्य मानूंन ॥ लोकार्थ करी स्नान ॥
ते असत्याचे वाचूंन ॥ तया सत्य नव्हे ॥ १०७९ ॥

असद्भावें देवदर्शन ॥ असद्भावें साधुसेवन ॥
असत्य जाणोंनि गुरुवचन ॥ आइकत असतां ॥ १०८० ॥

तया सत्य तें काये फळैल ॥ बुध्दि कैसी उजळैल ॥
मनपरति धरील ॥ ऐसें न घडे ॥ १०८१ ॥

जें देखे तें असत्य ॥ बोलिजे तें नमनी सत्य ॥
करी आपणु अकृत्य ॥ तैसें जग पाहे ॥ १०८२ ॥

आपणु असत्य वर्ते बोलें ॥ तया सत्य दुजयाचें न कळे ॥
विश्व असत्य हेंचि कळे ॥ कपटी मायावी ॥ १०८३ ॥

अथवा विश्वाचें असत्यपण ॥ तयाचें अनारिसे ज्ञान ॥
आसुरुं बोले वचन ॥ जनु पाषांडी ॥ १०८४ ॥

अहो हें विश्व (विश्व) अवघें भासे ॥ परंतु सर्वही असत्य असे ॥
सिध्दांतु जाणती माणुसें ॥ तींचि ज्ञाती ॥ १०८५ ॥

गेलें तें नये पुडती ॥ शेषीं भाॐ कांहींचि नाथी ॥
अत्रैव विश्वाचा आदि अंतीं ॥ शून्य साचार ॥ १०८६ ॥

पूर्वीं काये बीज होतें ॥ काये उरे पुढें मागुतें ॥
शून्यचि साचार येथें ॥ विश्वाचां ठांइं ॥ १०८७ ॥

पूर्वी शून्य पुढें शून्य ॥ मध्ये विश्व जै हें अशून्य ॥
तै बीज शून्येंसी अन्य ॥ ते काये असे ॥ १०८८ ॥

कव्हणी ऐसें म्हणैल ॥ लिंगदेह बीज उरैल ॥
तया बोला विश्वासैल ॥ तोचि मुर्खु ॥ १०८९ ॥

देह पातीं जीरु उरता ॥ मग ते जन्मांतर पावता ॥
तै पूर्वजन्मिची कथा ॥ सांगा तुम्ही ॥ १०९० ॥

प्रत्यक्ष न ये स्वानुभावा ॥ तो शब्दु काये मानावा ॥
म्हणौनि आभासु दिसे तो नवा ॥ ययां भूतांचा ॥ १०९१ ॥

पाचांचेनि संगे जिणें ॥ योगें पांचांचेनि उपजणे ॥
वियोग तेंचि मरणें ॥ महाभूतांचा ॥ १०९२ ॥

यापरी संगेंचि विश्व असें ॥ संगु सुटतां काहीचि नसे ॥
शून्यमय सर्व असे ॥ परमसिध्दांती ॥ १०९३ ॥

भूतसंगूंचि दिसे वर्ततां ॥ येथ जिता ना कोण्ही मरता ॥
नावेक देहाची साकारता ॥ इतुलाचि संसारु ॥ १०९४ ॥

यापरी आत्मशून्य हे भान ॥ चराचर वस्तु अकिंचन ॥
असत्य स्वरुप आस्तिहीन ॥ ऐसा शून्य वादु ॥ १०९५ ॥

याया ब्रह्म सर्वेश्वरु ॥ कैंचें महत्त्व अहंकारु ॥
सकळ शाब्दिकु व्यवहारु ॥ नये प्रतीती ॥ १०९६ ॥

आत्माभावें जें असे ॥ ते असंत जन्हीं भासें ॥
जग असत्य जाण ऐसें ॥ आसुर बोलती ॥ १०९७ ॥

आतां असत्य हें जन ॥ भान येणें आचारावे धर्म कवण ॥
ऐसें पुसिलें असतां वचन ॥ काये बोलती ॥ १०९८ ॥

॥ अप्रतिष्ठां ॥ ६० ॥

अहो हें जन आतां ॥ यया धर्माधर्म व्यवस्था ॥
ते का आली सर्वथा ॥ असिजे जंवं ॥ १०९९ ॥

असिजे तंवं सुखें असावें ॥ आवडे ते तेव्हाचि भोगावें ॥
मेलियावरि जावें ॥ शून्य होउंनि ॥ ११०० ॥

मरणापुढे जन्मु नाथी ॥ पाप पुण्य तें कवणाप्रति ॥
भोगावें भोगाये भोगिती ॥ वदंती हे ॥ ११०१ ॥

नलगे संध्या नलगे स्नान ॥ नलगे यज्ञुयागु हवन ॥
देवकथापूजन ॥ लागेचि ना ॥ ११०२ ॥

तप तीर्थ दानव्रत ॥ धर्मु नव्हे कव्हणा सुकृत ॥
ऐसें आसुराचें मत ॥ पांडुपुत्रा ॥ ११०३ ॥

देहीं जालें तेंचि बंधन ॥ सुटि का तोचि मोक्षु जाण ॥
जेणे उपायें तें साधन ॥ ऐसें संपादिती ॥ ११०४ ॥

जो धर्मु जया करणा तें ॥ तोचि धर्मु तेथें वर्ते ॥
ऐसिया शरीर व्यापारातें ॥ स्वधर्मु म्हणती ॥ ११०५ ॥

आतां इंद्रियांचा व्यापारु ॥ आनेंकी जे तो अनाचारु ॥
इंद्रियां आपुला व्यापारु ॥ तें पापचि नव्हे ॥ ११०६ ॥

देहेंचि पुरवावी वासना ॥ हेचि तयां आत्मउपासना ॥
ऐसिया स्वमत ज्ञाना ॥ ज्ञान म्हणती ॥ ११०७ ॥

स्तेय अथवा हरण ॥ मागणें अथवा वारुण ॥
घेउंनि रक्षावे प्राण ॥ हेचि आत्म उपासना ॥ ११०८ ॥

परदारा बळे भोगावी ॥ नातरि पा तेजउंन न्यावी ॥
परि वासना उरों नेदावी ॥ भोगविषयीची ॥ ११०९ ॥

भोगितां वासना नुरे ॥ तोचि निर्वासनु सोचाकारें ॥
म्हणौनि दृष्टी पडलें बरें ॥ ते सोडूंचि नये ॥ १११० ॥

धर्माधर्मु हेंचि बंधन ॥ यापासाव सुटणें मोक्षु जाणें ॥
म्हणौनि विधनिशेधी मन ॥ आसक्त न करिती ॥ ११११ ॥

कर्मातें न करी नमना ॥ तो कर्ममुक्तु ऐसी बोलणी ॥
आतां तो करु करणी ॥ आवडे तै ॥ १११२ ॥

शौचु करी तो अमुक्तु ॥ उभाचि खाये तो मुक्तु ॥
चहूंवर्णी भिक्ष्यावंतु ॥ संतु तो हो ॥ १११३ ॥

कुश्चिळ तें बळें सेवी ॥ वाइट तेंचि अनुभवी ॥
कर्ममुक्तता दावी ॥ अभिमानें तो ॥ १११४ ॥

मद्य मांस नि पूजा ॥ परस्त्री आणी ती भोगकाजा ॥
काम्युधर्मु हा दुजा ॥ आसुरातें ॥ १११५ ॥

यापरी वैदिक धर्म ॥ तें सकळ जनातें अधर्म ॥
इच्छी चार सर्वधर्म ॥ विधी संपादिती ॥ १११६ ॥

एवं प्रतिष्ठा म्हणिजे धर्मु साधून ॥ विश्व देखता तेणेवीण ॥
मग अधर्मु सिध्दांतु करुंन ॥ बोलती ते ॥ १११७ ॥

विश्वीं वैदिकु धर्म कांही ॥ बोलिजे तो उचितु नाहीं ॥
आतां असावें जैसें कांही ॥ जया आवडे ॥ १११८ ॥

अथवा प्रतिष्ठा म्हणिजे जगस्थिति ॥ वर्ण आश्रम भेदमती ॥
ययां पासाव याती ॥ तिया वेगळालिया ॥ १११९ ॥

तयां जें जें विहित ॥ तें तेंचि कर्म उचित ॥
येर पाप अनुचित ॥ करुंचि नये ॥ ११२० ॥

ऐसी धर्मशास्त्रें आचारणें ॥ विश्व भेदु हा पाळणें ॥
आथेकें चतुर्वणें ॥ धर्मु हे स्थिति ॥ ११२१ ॥

धर्मु तरि च्यान्ही वर्ण ॥ अधर्मे नाशती ते जाण ॥
मग वर्ण नाशीं येकपण ॥ सकळां याती तें ॥ ११२२ ॥

तेथें जें कर्म निपजे ॥ तेणें मनुष्ये देहें तो नुपजे ॥
यापरी नरयोनीचीं बीजें ॥ करपलीं कीं ॥ ११२३ ॥

मग मनुज देहेंवाचूंन ॥ भोगा नये क्रियामाण ॥
तेधवां कर्मयोगी तें कवण ॥ बीज उरलें ॥ ११२४ ॥

एवं जीवसृष्टि संहारे ॥ तै कां तपावें दिनकरें ॥
मेघ वोलावे अंबरे ॥ ते चाड राहिली ॥ ११२५ ॥

मग कां असावी धरणी ॥ वेश्वानरु ना अन्नपाणी ॥
आतां रिते ब्रह्मांड म्हणोनि ॥ इशें सांडिलें ॥ ११२६ ॥

सकळा प्रपंचाचा लयो ॥ अधर्मे होये जग क्षयो ॥
म्हणौनि धर्मु हा आश्रयो ॥ स्थिति सर्वांची ॥ ११२७ ॥

धर्मु भूतांची व्यक्ति ॥ धर्मु भूतांची स्थिति ॥
वेगलालीं भूतें नांदतीं ॥ धर्मेचि येणें ॥ ११२८ ॥

धर्मनाशें विश्वनाशावे ॥ आसुर कर्म हें स्वभावे ॥
यालागि धर्महीन ॥ अघवें बोलती जग ॥ ११२९ ॥

अहो शूद्रा देही रक्त मांस ॥ ब्राह्मणा देहीं काये पीयूश ॥
अन्नचि कारण सर्वांस ॥ धातूचां ठांइं ॥ ११३० ॥

उत्तम आलें कोठूंन ॥ मध्यम अधम जन ॥
मागुते आलयां मरण ॥ कोठें सामावती ॥ ११३१ ॥

येकेंचि भूमिवरि असणें ॥ येकेंचि जिणें मरणें ॥
आदिं अंतीं स्थानें ॥ नव्हतीं वेगळालीं ॥११३२॥

म्हणौनि सकळा याती येकपण ॥ मिथ्या कल्पना हे वर्ण ॥
भूतपंचक अभिन्न ॥ बीज ययांचे ॥ ११३३ ॥

उपजणें नांदणें मरणें ॥ येकेचि भूतपंचकीं असणें ॥
असो भेदाभेदु सांडणें ॥ हेचि ज्ञान ॥ ११३४ ॥

चहूंवर्णाची धरणी ॥ येकेचि ठांइं मिळे पाणी ॥
दहनी दहन जीवनी ॥ जीवन सर्वांचे ॥ ११३५ ॥

आकाशीं आकाश मिसळे ॥ तै काय उरैल वेगळे ॥
आता भेदाभेद ज्ञान जळे ॥ जेणें ज्ञानें ॥ ११३६ ॥

तें ज्ञान आसुरांचे ॥ संहारी वर्ण भेदभूतांचे ॥
तेंचि विविधपण जनाचें ॥ नाही करी ॥ ११३७ ॥

एवं धर्महीन वर्णहीन ॥ आसुर बोलति युक्त जन ॥
भेदाभेद आचरण ॥ तें पाप सर्वां ॥ ११३८ ॥

कव्हणी ऐसें म्हणैल ॥ पापियां यमु दंडील ॥
ते वचन आइकोनि हांसैल ॥ आसुर जनु ॥ ११३९८ ॥

॥ अनीश्वरं ॥ ०० ॥

आसुर बोलती जन ॥ अहो हे ईश्वरहीन ॥
येथें कवणा दंडी कवण ॥ आन येक आइकां ॥ ११४० ॥

मेलियां उरणेचि नाहीं ॥ तै यमें दंडावे कवणा काई ॥
आतां दंडु होइल देही ॥ पापियांतें ॥ ११४१ ॥

अवतरैल महाविष्णु ॥ चतुर्मुखी त्रिनयनु ॥
नांगीकारी ईशु सगुणु ॥ पापियांतें ॥ ११४२ ॥

ते विष्णु विरंची त्रीनयनु ॥ चौथा ईश्वरु सगुणु ॥
यया भूतालागूंन ॥ दंडु करिता ॥ ११४३ ॥

तरि कवणु कोठें कैचा ॥ लटिकाचि भाऊॅ तयाचा ॥
लयो उध्दरु भूतांचा ॥ तो जै करी ॥ ११४४ ॥

ते मातेंचा उदरीं तिघेजण ॥ बैसोंनि करिती पिंडरचन ॥
सांडा हे कल्पित पुराण ॥ भ्रांतिकर्ते ॥ ११४५ ॥

उपजु होतां पिंडांचा ॥ गर्भी विरंची कैचा ॥
तो जीउ तेथें विष्णुचा ॥ संचारुचि नसे ॥ ११४६ ॥

अन्नें जिणें मरणें ॥ तेथे विष्णु तो मानावा कवणें ॥
नरे तें रुद्रें मारणें ॥ हे कासयावरुंनि ॥ ११४७ ॥

येक उपजती येक मरती ॥ येक वाढती येक नांदती ॥
येक गर्भी रचती ॥ तेथें कैंचे देव ॥ ११४८ ॥

तेहीं की त्या ठांइं होआवें ॥ जी मरे विश्व अघवें ॥
आतां असो ऐसें नव्हें ॥ ईश्वरु कैंचा ॥ ११४९ ॥

जळीं तरंग उपजती ॥ उपजले ते येक विरती ॥
विराले न येति ॥ पुडती आकारा ॥ ११५० ॥

तैसा पांच भौतिक प्रकारु ॥ रसमयु पूर्णसागरु ॥
येथिचा तरंग विकारु ॥ ते हें जग ॥ ११५१ ॥

येथ ईश्वरें काये करणें ॥ शास्त्रवादियांचे झंकवणें ॥
आम्ही नाही मानणें ॥ सर्वथैव ॥ ११५२ ॥

अहो ईश्वरु नाही भूतांते ॥ ते कोठूंनि उत्पति जगातें ॥
ऐसें आदिकारण आमुतें ॥ सांगा तुम्ही ॥ ११५३ ॥

ऐसिया आक्षेपा उत्तर ॥ कैंसे देती आसूर ॥
तें सांगैन सविस्तर ॥ तयांचें बोलणें ॥ ११५४ ॥

॥ अपरस्परसंभूतं ॥ ०० ॥

अहो विश्व कोठूंनि होत ॥ ऐसें आक्षेपिले येथ ॥
तरि अपरस्परसंभूत ॥ जग जाणावें ॥ ११५५ ॥

पर म्हणिजे आत्मइतर ॥ तेणेंसी आपण अपर ॥
येवं आपपरावयापासाव ॥ समग्र विश्व जालें ॥ ११५६ ॥

पुरुषातें परस्थानी ॥ स्त्री येकी असे म्हणौनि ॥
नेंसीं अपरत्व मानी ॥ आपुलां ठांइं ॥ ११५७ ॥

स्त्रीतें आत्म इतरु ॥ पुरुषु तो असे परु ॥
आपुला देहो अपरु ॥ तो तयाहूंनि ॥ ११५८ ॥

ऐसें आप आणि पर ॥ स्वगोत्र आणि पर ॥
बोधू येक येका इतर ॥ तीं स्त्री पुरुषें ॥ ११५९ ॥

तयां स्त्री पुरुषापासून ॥ जगाचे यया निर्माण ॥
अपरस्परसंभूत म्हणौन ॥ बोलिजे हें ॥ ११६० ॥

येथें ईश्वरु जै कर्ता आथी ॥ तै पुरुषेंचि कां प्रजा न होति ॥
अथवा ब्रह्मा करी उत्पत्ति ॥ तै पुरुषु कासया ॥ ११६१ ॥

स्त्रीपुरुष संयोगेंवीण ॥ कवणाचें जालें निर्माण ॥
ईशु कर्ता तै संगेवीण ॥ तें व्हावें कां ॥ ११६२ ॥

स्त्री पुरुषी संगु जाला ॥ वीर्येवीण तो वायांचि गेला ॥
म्हणौनि उभयवियें रचला ॥ पिंडू साकारु ॥ ११६३ ॥

कव्हणी करील येथ युक्ति ॥ तरि येकें अपुत्रकें कां असति ॥
वीर्ययोगेंचि उत्पत्ति ॥ हैं जै साचारु ॥ ११६४ ॥

तरि तेथ जाणावी वंध्य स्त्री ॥ अथवा वांज पुरुषु तऱ्ही ॥
वीर्य नरा हे उत्तरीं ॥ तिथे वंध्ये तें ॥ ११६५ ॥

खोकरीं न राहे पाणी ॥ कां भग्नछुटीं जाये निघोनि ॥
तैसें पडतांचि वीर्य द्रवोनि ॥ जाये स्वभावें ॥ ११६६ ॥

येकांतें तत्काळेंचि क्षरे ॥ येकी तें अहोरात्रें पाझरे ॥
मृण्मय पात्रकोंरे ॥ कां खोकरे जैसें ॥ ११६७ ॥

स्त्री वंध्येचें लक्षण ॥ ऐसें ययाचें प्रमाण ॥
आतां पुरुषाचें वांजपण ॥ तेंचि कैसें ॥ ११६८ ॥

उष्णें बीज उकडलें ॥ कां अग्निसंगे भाजलें ॥
तें सेती वानिवटे केलें ॥ पिकेचिना ॥ ११६९ ॥

तेवि विर्यकोष्टीं जयातें ॥ नाशक तेज अतिवर्ते ॥
तेणें ते वीर्य उकडेतें ॥ पिकेचिना ॥ ११७० ॥

कव्हणी बोले ऐसें वचन ॥ गळें कां गर्भ राहोंन ॥
तयाप्रति हें प्रतिवचन ॥ योजिजत असे ॥ ११७१ ॥

स्त्रीपुरुषें संगा येती ॥ तेथे उभयवीर्य मीनती ॥
तेथे तत्काळेंचि मारुती ॥ संचरता होये ॥ ११७२ ॥

तो जै पडे तेथपुरा ॥ ते दीर्घ आयुष्य चढे कुमरा ॥
अल्पु मिळे तो अपूरा ॥ न पुरे पिंडरचने ॥ ११७३ ॥

तया वायोचेनि अधारें ॥ कांहीं पिंडु आकारें ॥
तो सरे तेंचि क्षरे ॥ द्रवे पिंडु ॥ ११७४ ॥

उपजोनि नाशावया कारण ॥ तेहीं वायोचें अपूर्णपण ॥
आइक आतां प्रमाण ॥ कैसे करिती ॥ ११७५ ॥

सवा तोळा पुरुषाचें ॥ तेथे तोळा येकु रक्त स्त्रीचें ॥
तेथे वो ते कुमाराचें ॥ रुपमुस ॥ ११७६ ॥

तया शुक्ला रक्ताचा मेळ ॥ भ्रमवी तो वायो सबळ ॥
किंचित डोलवी तो अबळ ॥ पिडपात्ती ॥ ११७७ ॥

वृध्दी वायो न उरे ॥ उपजोनि बाळक मरे ॥
आता वीर्याचेनिचि भारें ॥ चेपला जो ॥ ११७८ ॥

तो अल्पवायो वीर्यस्तु ॥ प्रमथं न शके संघातु ॥
आणि गर्भासि तवें पातु ॥ ऐसे न घडे ॥ ११७९ ॥

तयाचिया अनुसार बळा ॥ पिंडुगर्भी रचने आला ॥
तयाचा क्षीभुनि माला ॥ तै गर्भपातु होये ॥ ११८० ॥

कव्हणी म्हणैल ऐसें ॥ शुक्लरक्त पवन समरसें ॥
पिंडाची उत्पत्ति असे ॥ हें जै साचार ॥ ११८१ ॥

तै नि गर्भसंभवावा ॥ मग वाढो अथवा पडावा ॥
ऐसिया आक्षेपा बरवा ॥ परिहारु असे ॥ ११८२ ॥

शुक्लरक्त होये संगु ॥ तिसरा न घडे पवन योगु ॥
तेणें तो उभय वीर्यभागु ॥ वाढि न धरी ॥ ११८३ ॥

जऱ्ही म्हणाल पवनेंवीण ॥ वीर्यांते नाही त्राण ॥
पवनसहितचि ते संक्रमण ॥ श्रोणि ती करी ॥ ११८४ ॥

तरि वीर्य संगे जाये ॥ तै साधायो काजा नये ॥
येथिची युक्ति आहे ॥ अनारिसी ते ॥ ११८५ ॥

वीर्य संगेंचि धांवीनला ॥ श्रोणितीं जाऊंनि संचरला ॥
वायो वीर्य हयासि गुतला ॥ निवडेचिना ॥ ११८६ ॥

शुक्लरक्त जैसीं दोन्ही ॥ तैसा तिसरा वायो तये स्थानी ॥
वाढे तिघांचि मिळणी ॥ आकारे पिंडाचेनि ॥ ११८७ ॥

वायो उदका झगटला ॥ तो स्पर्शोनि वेगळा गेला ॥
ते तरंग फेनमाला ॥ न होती बुध्दुदांचिया ॥ ११८८ ॥

पवंनु हाणें जीवनातें ॥ किंचित आपणु तेथें गुंतें ॥
संगु न सुटे तयातें ॥ तो आवरला जलें ॥ ११८९ ॥

तेथे तरंगाचे आकार ॥ पवनाधारें समग्र ॥
उदका तया असे येक शरीर ॥ तंवं तरंगते ॥ ११९० ॥

तैसी शुक्लरक्तें मीनलीं ॥ ती वायो तें गवसूंनि राहिलीं ॥
ऐसी प्रत्यहीं विधि घडली ॥ पाहिजेकी ॥ ११९१ ॥

कव्हणी म्हणैल ऐसें ॥ पीडीं शुक्लरक्ताचि दिसे ॥
तिसरा वायो तो न दिसे ॥ ऐसें जै ॥ ११९२ ॥

तै मातेचें रेतरक्त ॥ तयाचे ती नि पदार्थ ॥
त्वाचा मांस श्रोणिता ॥ तयाचि ऐसे ॥ ११९३ ॥

शुक्लवीर्य पुरुषांचे ॥ च्यारिपदार्थ तयाचे ॥
अस्थि मज्जस्नायु देहिचें ॥ नाडी समूह ॥ ११९४ ॥

ऐसे वीर्यद्वयें निपजले ॥ सातही पदार्थ बोलिले ॥
आतां पवनें काये आधीलें ॥ यये पिडीं ॥ ११९५ ॥

सातांहीं धातूंचे बळ ॥ अव्यक्त अनुश्रुत सकळ ॥
तें अव्यक्तें अनुश्रुते केवळ ॥ असे पवने ॥ ११९६ ॥

पवन सांडी दोहीं तें ॥ तें बळ ते वृत्ती न वर्ते ॥
पतन होये पिंडातें ॥ तयेचि क्षणी ॥ ११९७ ॥

बळ तरि विया योगु जाला ॥ बळ तरि गर्भु राहिला ॥
बळ तरि देहो वाढीवला ॥ दिवसेंदिवसु ॥ ११९८ ॥

बळेंवीण तिया अस्थी ॥ आपणचि गळोंनि जाती ॥
जडा देहा उचलिता ॥ हे काये घडतें ॥ ११९९ ॥

सातही सांगीतलिया धातु ॥ येकचि बळ तयां आंतु ॥
जेणें वागे हा संधानु ॥ बैसे उठी ॥ १२०० ॥

कव्हणी करील ऐसी युक्ति ॥ तिहीं योगी देहाची व्यक्ति ॥
तरि शतां संवछरां तऱ्ही पुडती ॥ नाशे कासया ॥ १२०१ ॥

तरि ययाचे स्वभाव क्षर ॥ सहज यया सविकार ॥
क्रमेचि आइका समग्र ॥ सांगिजतिला ॥ १२०२ ॥

शुल्करक्तवात योगु ॥ गर्भी रचे हा संयोगु ॥
देहो निपजोनियां सांगु ॥ प्रगुप्त असे ॥ १२०३ ॥

हा उगाचि येकु विकारु ॥ जाणे जनु चतुरु ॥
यावरि कैसा विचारु ॥ दुजया विकाराचा ॥ १२०४ ॥

गर्भीपासाव होये पतन ॥ शरीर शरीरा विलक्षण ॥
आपेंआप परती दीन ॥ तये काळीं ॥ १२०५ ॥

आहारापासाव पुडती ॥ सातही धातू वाढती ॥
आपें आपचि पींडाकृति ॥ थोर होये ॥ १२०६ ॥

ऐसा विकारु हा तिसरा ॥ ययातें न करी दुसरा ॥
स्वभाऊँ चिया साकारा ॥ शरीराचा ॥ १२०७ ॥

धातूचिये वृध्दी पासूंन ॥ आपेंआप ये तरुणपण ॥
चौथया विकाराची खूण ॥ सांगीतली हे ॥ १२०८ ॥

क्रमेचि तारुण्य वोसरे ॥ वार्धक्य सहज तेथे उरे ॥
वळित पळित होये गात्रें ॥ बळें सांडवती ॥ १२०९ ॥

कवणें तारुण्य काढिलें ॥ तैसेंचि वार्धक्यही गेलें ॥
मरणी देह पडिले ॥ हा विकारु सावां ॥ १२१० ॥

तेथें पांचही भूते कारणी ॥ मिळती आपुलांलां स्थानी ॥
बळ जाउंनि रिघे पवनी ॥ ऐसें असतां ॥ १२११ ॥

कवणें गर्भी देह रचिलें ॥ नवांचि मासा सिध्द केलें ॥
प्रसूतीकाळीं जन्मविलें ॥ कवणें सांगा ॥ १२१२ ॥

आपणचि पावे वृध्दी तें ॥ कीं कव्हणी येत्नु करी ॥
तेथें तैसेंचि तारुण्य दशेते ॥ आलें आपेंआप ॥ १२१३ ॥

वार्धकीं काया पालटली ॥ ते सहज कीं कवणी केली ॥
तैसीचि आपेंआप नाशली ॥ व्यक्ति देहाची ॥ १२१४ ॥

आंब्र वृक्षाचे फळ ॥ पुष्पामागे कोमल ॥
ते स्वभावें तुरठ केवळ ॥ घसा बैसे ॥ १२१५ ॥

तें सहजचि फळ झडे ॥ उरले फळ सहज वाढे ॥
तया ते महाआंवि चढे ॥ ते कवणें घातली ॥ १२१६ ॥

मंग तेंचि पाडा येउंनि ॥ आपेंआप तुटे देट्टूंनि ॥
तैचा स्वादु पालटूंनि ॥ कवणे ठेविला ॥ १२१७ ॥

महा तें अडीये बैसवितां ॥ आंबट फूट परि सर्वथा ॥
पावे अत्यंत पक्वता ॥ ते कवणे घातली ॥ १२१८ ॥

शर्कराहूंनि असावे स्वादूळ ॥ अमृताचे तया कलोळ ॥
पुढती तैसेंचि असतां केवळ ॥ नाशेंनि जाये ॥ १२१९ ॥

तैसेंचि हें साकार शरीर ॥ षड्भाव विकार ॥
आपेंआप क्षर ॥ गळोंनि जाये ॥ १२२० ॥

येथे कव्हणी म्हणैल ऐंसे ॥ तरि तरुणपणीचि कांहे नाशे ॥
सांही विकाराचे ऐसें ॥ साचार जरि ॥ १२२१ ॥

तरि शरीराची संवें निपजले ॥ वैरी देहींचि गुप्त आथिलें ॥
ते वात पित्त वाढो लागले ॥ कफादिक ॥ १२२२ ॥

अन्नापासावसात धातु ॥ वाढे यां रोगांचा संघातु ॥
मग ती ही पासूनि अमितु ॥ परिवारू होये ॥ १२२३ ॥

मग जैते आगळे होती ॥ तया देहातें हाणति ॥
तैचि मरणाची प्राप्ति ॥ सिध्द होये ॥ १२२४ ॥

वाजे घाउँ कां पाथरू ॥ घे सर्पू अथवा व्याघृ ॥
प्राशी विष वरि उतारु ॥ भेदेचिना ॥ १२२५ ॥

यापरी येकें निमित्यें मरण ॥ तें अकाळीं पावे जाण ॥
बाळदशें निमित्यें वाचूंन । तें पवनुगती ॥ १२२६ ॥

कव्हणी बोलैल म्हणति ॥ स्त्री पुरुष कां याति ॥
तरि परिहारु यये अर्थी ॥ ऐसा आहे ॥ १२२७ ॥

आगळे पुरुष रेतपडे ॥ तै गर्भी पुत्रु वाढे ॥
स्त्रींचें आगळें रक्तघडे ॥ तै होये कन्या ॥ १२२८ ॥

दोहींचे वीर्य समान ॥ वो ते नपुंसक बाळ निपजे तेथें ॥
आक्षेपु करिता येथें ॥ कव्हणी येका ॥ १२२९ ॥

अहो आगळें जालें स्त्री रक्त ॥ तरि वाढावें त्वचा मासरक्त ॥
जै धातु त्रय निपजत ॥ स्त्रिचेनि रुतें ॥ १२३० ॥

आगळें जालें पुरुषाचे ॥ तें वर्धक अस्त्यादिकांचे ॥
तेथें कारण पुत्रत्वांचें ॥ ते काये असे ॥ १२३१ ॥

समानें दोन्ही मिळति ॥ तेथें नपुंसकांची कां उत्पत्ति ॥
कारण यये अर्थी ॥ प्राचीन कां नव्हे ॥ १२३२ ॥

यया आक्षेपा परिहारु ॥ काये बोले जनु आसुरु ॥
अहो प्रकाशु असतां अंधकारु ॥ आइसा प्राचीनाचा ॥ १२३३ ॥

अहो धातु शोध निवाडें ॥ माजि प्रमी तूचि कळंकु पडे ॥
तरिं ताम्रापुठ देतां जोडे ॥ स्वर्णा अैसें ॥ १२३४ ॥

तैसिया धातू निपजती ॥ तेथें साही पाक होती ॥
तेथे शुल्करक्त निगुति ॥ वायोचि असे ॥ १२३५ ॥

पुरुष वीर्यांचिया धातु ॥ निपजतां रक्त पाहिजे आंतु ॥
परि चर्तुथांशें पाहिजतु ॥ योगु तयाचा ॥ १२३६ ॥

रक्ताचिया धातू निपजती ॥ तेथ पुरुष देत मिश्रीत आथी ॥
परंतु चतुर्थांशें संगति ॥ तेथें तयाची ॥ १२३७ ॥

ऐसें जै हें नसतें ॥ तै अस्थि वाढतिया कवणें मतें ॥
गर्भी बाळक स्त्रीरक्तें ॥ होते मांसचेंचि ॥ १२३८ ॥

आणि उपजलियाही वरि ॥ अस्थी वाढावया कणव सामग्री ॥
अन्नापासाव थोरी ॥ होये ते कैसी ॥ १२३९ ॥

अन्नाची रसधातु निपजें ॥ रक्तें मांसमज्जासहिजें ॥
तेणेचि अस्थी स्नायु आपजे ॥ आपेंआप ॥ १२४० ॥

तैसें येक येकि वाचूंन ॥ वाढो न शके जाण ॥
येथें आहे प्रमाण ॥ जाणावें तें ॥ १२४१ ॥

ऐसा प्रमाणेंचि रसु ॥ आटता आधिकु तो होये उरता ॥
तो आणिका देहा सर्वथा ॥ वीर्यभुतु ॥ १२४२ ॥

पुरुषाचे आगळें ते उरे ॥ तेणे पुरुष रेतें पुरुषत्व खरें ॥
सातां पाकीं सार उत्तरे ॥ तें शेष कीं ॥ १२४३ ॥

म्हणौनि वीर्य अन्य शरीरा । यापरी उपजु जाला कुमरा ॥
आता कन्या होये अवधारा ॥ तेथिचें कारण ॥ १२४४ ॥

स्त्रीचे रेत आगळें ॥ तेंचि रक्त सेवटीं उरलें ॥
तें रुतु तेणे निपजलें ॥ कन्यरत्न ॥ १२४५ ॥

धातू आटती बराबरि ॥ कांहींचि नुरे सामग्री ॥
तेथें शुक्ल ना रक्त शरीरीं ॥ बीजचि नाथी ॥ १२४६ ॥

तोचि निपजे नपुंसकु ॥ ऐसा लिंगत्रयाचा विवेकु ॥
आतां अंगहीनु मुकु ॥ बधिरू कां होये ॥ १२४७ ॥

आणि विर्यापासाव होणें ॥ हें स्थूल देहाची कारणें ॥
वांचूंनि कर्ता आणि करणें ॥ वेगळीचि तीं ॥ १२४८ ॥

विषय पंचकाचें ज्ञान ॥ पंचविध ज्ञान करण ॥
जीवा अंतरस्थापासूंन ॥ बाहेरि प्रकाशे ॥ १२४९ ॥

पाच पंचकाचि या गती ॥ कर्मेंद्रियाचिया प्रवृत्ती ॥
जीवें तो जीउ जो व्यक्ति ॥ जीव वीस्थूळाची ॥ १२५० ॥

देह जड अचेतन ॥ ययातें जीवेंचि चेतन ॥
तया जीवाचे निर्माण ॥ नसे वीर्यापासाव ॥ १२५१ ॥

ऐसिया आक्षेपा परिहारु ॥ करिता होये आसुरु ॥
अहो तो पंचीकृत प्रकारु ॥ वेगळाचि असे ॥ १२५२ ॥

स्थूळेंसी जीउ वेगळा ॥ लिंगदेहसहितु निराळा ॥
कणवें देखिला डोळा ॥ ऐसें सांगा ॥ १२५३ ॥

शुक्ल आणि मीने रक्त ॥ जीव रुप तें कैंचे तेथ ॥
देह पाती प्रत्यक्ष जात ॥ कणवें देखिलें ॥ १२५४ ॥

देहापासाव सुटलें ॥ आणिकाचां उदरीं संचरलें ॥
देह धरावया प्रवर्त्तलें ॥ आपण येक ॥ १२५५ ॥

ऐसा प्रत्यक्षानुभउ जाला ॥ जीउ तो कवणें देखिला ॥
शब्दूचि विश्वासें घेतला ॥ परि प्रतीत्ती नसे ॥ १२५६ ॥

आलिये प्रतीती वांचून ॥ उगेंचि मानि जे वचन ॥
तें झकणे परंतु ज्ञान ॥ नव्हें मिरवी जैसें ॥ १२५७ ॥

काये कैसे तें न कळे ॥ आता येक पाहिजे सिध्द केले ॥
तेणें नाहीं ते कारण कल्पिलें ॥ बोधिले अज्ञान ॥ १२५८ ॥

तयाचेनि वचनें कार्य ॥ कार्य चतुरांतें आहे ॥
प्रत्यक्षानुभउ पाहे ॥ तोचि जाणता ॥ १२५९ ॥

जे वीर्य स्थूलादेहाचें ॥ तें बीज भूतपंचकांचे ॥
आतां गर्भी शरीर रचे ॥ तेथ सामग्री ॥ १२६० ॥

शब्दयोगें असे गगन ॥ स्पर्शयोगे पवनु जाण ॥
रुपांचे आधी निर्मळपणा ॥ तेचि तेज ॥ १२६१ ॥

सरस आप निर्मळ ॥ गंधें पृथ्वी केवळ ॥
ऐसें भूतपंचक सकळ ॥ असे वीर्यरुपें ॥ १२६२ ॥

शुक्ल रक्त समरसु ॥ तो पांच भौतिकु रसु ॥
आता पांचा वेगळा निवासु ॥ नव्हे तया ॥ १२६३ ॥

आता स्वाधिष्ठाना उंचवटीं ॥ मणिपुराचां तळवटीं ॥
येक तिये स्त्रिचां पोटीं ॥ कमळ असे ॥ १२६४ ॥

तेथें तीनी दिवस प्रसारण ॥ अशुध्द वाहे जाण ॥
तोचि रुतु जाण खूण ॥ प्रत्यक्ष हे ॥ १२६५ ॥

तया उपरि परियस ॥ दिन तेरास विकास ॥
प्रवाहों नाहीं रक्तास ॥ तें अंतरीचि राहे ॥ १२६६ ॥

ऐसे सोळा दिवस पाहिले ॥ मासाचे अतिक्रमले ॥
पुढे दिन चौदा उरले ॥ तेणे आंकोचन ॥ १२६७ ॥

आंकोचन विकासन प्रसारण ॥ प्रतिमासीं सारिखे समान ॥
आता विकाशाचे तेरा दिन ॥ तयांमाजि ॥ १२६८ ॥

पुरुषेंसी होये संयोगु ॥ शुक्लरक्त होये योगु ॥
कमळकोशा अंतरंगु ॥, स्थिरावतो ॥ १२६९ ॥

शुक्लारक्ता भेटि होतां ॥ संकोचे कमळ सर्वथा ॥
पुडती न विकाशे तत्वता ॥ ऐसें जाणावे ॥ १२७० ॥

जव होवे पिंडरचना ॥ तवं नवमास तया आंकोचन ॥
आता असे स्थान ॥ कैसें भौतिक ॥ १२७१ ॥

कमळ कोशाचें अंतराळ ॥ शुक्लरक्त जेथें निश्चळ ॥
ते पांच भौतिक केवळ ॥ प्रत्यक्ष जाणावें ॥ १२७२ ॥

केवळ आकाश ते गगन ॥ तें पवनयुक्त असे जाण ॥
येथिचि येकि खूण ॥ जाणावि विचारें ॥ १२७३ ॥

पवनु म्हणिजे तेथ कैंचा ॥ तरि आंकोचन धर्मु कवणाचा ॥
प्रकाशना प्रसारणाचा ॥ हेतुभूतु जो ॥ १२७४ ॥

योनि मुखी आकोंचन ॥ तैसेंचि कमळमुखी जाण ॥
परि हे करावें तयालांगून ॥ सहज होणें ॥ १२७५ ॥

आंकोचन प्रकाशन ॥ साच पवने प्रसारण ॥
म्हणौनि पवनातें स्थान ॥ असे कमळकोशीं ॥ १२७६ ॥

उष्णता असे ते तेजाची ॥ सारद्रता केवळ जळाची ॥
कठीणता कमळदळाची ॥ तेचि धरणी ॥ १२७७ ॥

ऐसें पांच भौतिक स्थान ॥ तेचि भूमिका क्षेत्रासमान ॥
तेथें जाले बीजारोपण ॥ साधली वाफ ॥ १२७८ ॥

पृथ्वीमाजि पेरिले ॥ परि पाणिये पाउसेंवीण गेलें ॥
ऐसे नव्हे चालिलें ॥ तेथें जीवन ॥ १२७९ ॥

माता सेवी अन्नपान ॥ तयाचा रसु जैसें जीवन ॥
सुटलें मलांपासूंन ॥ सार निवडे ॥ १२८० ॥

तयाचा पाकु होये पुडती ॥ तेथिचे मळ त्रिदोष निवडती ॥
सत्व उरे उर्ध्वगती ॥ सांचे अंशाशें ॥ १२८१ ॥

तेंचि रक्त होये स्वभावें ॥ तयाचा पाझरु द्रवे ॥
तों वीर्य समरसीं ऐकय पावे ॥ आपेंआप ॥ १२८२ ॥

तेहीं रक्त येक परि ॥ भूतपंचक गा अवधारीं ॥
सातही धातु शरीरीं ॥ तेणेंचि वाढती ॥ १२८३ ॥

पांच भौतिक अन्न ॥ पांच भौतिकु रसु जीवन ॥
पांच भौतिक तया पासूंन ॥ तें रक्त जाणावें ॥ १२८४ ॥

ते गोठे पृथ्वीचेनि गुणें ॥ द्रवें रक्तसारद्र जीवने ॥
उष्णता तयामाजि ते दहनें ॥ असे जाण ॥ १२८५ ॥

पवनाचेनि गुणे ॥ सोपे निपजति पिंडाते ॥
स्पर्शेला गेलीं पै आ ऐसें ॥ पिंडूचि होये ॥ १२८६ ॥

चहूं भूतांचें आयन ॥ रक्त रुपें तेंचि गगन ॥
अव्यक्तां गुणास्थान ॥ बहुसतें ॥ १२८७ ॥

पांच भौतिका ते मेदिनी ॥ पांच भौतिक बीज अरोपूंनि ॥
पांच भौतिक वरिपाणी ॥ रक्तचाले ॥ १२८८ ॥

येकें पांचही बीजरुपें ॥ पांच दुजी पृथ्वीरुपें ॥
तीं जीं पाच जलरुपें ॥ ऐसा योगु ॥ १२८९ ॥

अवघांचि मिळोंन वाढे ॥ मग तयाचा पिंड घडे ॥
येये अर्थी निवाडे ॥ दृष्टांतु अवधारा ॥ १२९० ॥

आळें करुंनियां निर्माण ॥ तेथे कीजे बीजारोपण ॥
वरि पाववितां जीवन ॥ यथाकाळी ॥ १२९१ ॥

पृथ्वीचीयां अंशांघोंटी ॥ उदकरी घे बीजापोटीं ॥
मग तें उकली आंठी ॥ आणूंनि मृदपण ॥ १२९२ ॥

तेथें उपजला कोंभु दिसे ॥ तो तया बीजातें धर्मु असे ॥
परंतु दिवसेंदिवसें ॥ पोसे वाढे जळें ॥ १२९३ ॥

तैसे वीर्यें होये पिंडरचन ॥ तयां अंकुरवी अवनी जीवन ॥
पांच भौतिक म्हणौन ॥ सांगीतलें जें ॥ १२९४ ॥

विकार बीजें होती ॥ तेयां इतरीं पोषती ॥
तया सवीची येकि याति ॥ असे म्हणौनि ॥ १२९५ ॥

आतां तेचि बीज आणिले ॥ आनारक्त मेलविलें ॥
अणिके ठाइं बैसविलें ॥ वाढेचिना ॥ १२९६ ॥

म्हणौनि बीज भूत आणि प्रवर्धक ॥ रुत रुप रक्त येक ॥
रुतस्थान आणिक ॥ येक गर्भस्थान ॥ १२९७ ॥

तयामाजि शुक्ल मिळे ॥ पवन तदंगें खेळे ॥
तोही तैसाचि तयाचा केवळें ॥ अग्रें जाला ॥ १२९८ ॥

यापरी अन्न जातें समस्तें ॥ मीनती येकें येकातें ॥
पींडु आकारे तेथें ॥ अंकुर होती ॥ १२९९ ॥

आतां शुक्लरक्त मिसळलें ॥ अंकुरे पवनाचेनि बळें ॥
तेथे महाभूतें सकळें ॥ मंथन होती ॥ १३०० ॥

प्रथम भ्रमे आवर्तु ॥ मग तो स्थिरु राहे समस्तु ॥
तेथे स्थूळ सूक्ष्म भागु विविक्तु ॥ स्वभावें होये ॥ १३०१ ॥

पया देउनि मुरवण ॥ कीजे दधीचे मंथन ॥
तेथें सार असार भिन्न ॥ भाग निवडती ॥ १३०२ ॥

मग तेंनि सारा वेगळें ॥ सार तया पै न मिळें ॥
तैसेंचि पांच भौतिक मथलें ॥ लागे निवडों ॥ १३०३ ॥

पहिला आला फेनु ॥ तैसा सारांशु तो महीगुणु ॥
पांचाह्यही विलक्षणू ॥ जाला निवडता ॥ १३०४ ॥

पुडती होता मंथन ॥ पांचाचे निवडे जीवन ॥
तयावरि प्रमन ॥ होतचि असतां ॥ १३०५ ॥

तेजांशु पांचांचा निवडे ॥ क्रमेचि पवनांशु पडे कडे ॥
अवघियां सेवटीं जोडे ॥ सार तें आकाश ॥ १३०६ ॥

आतां पृथ्वी भागु ते विषये ॥ पांचांचे जळांशु ज्ञेय ॥
तें पंचकर्मेंद्रिय ॥ ऐंसे जाणावें ॥ १३०७ ॥

तेजांशतें ज्ञानकरण ॥ पवनांश पांचही प्राण ॥
व्योमांश अंत:करण ॥ मन बुद्धि चित्त अहंता ॥ १३०८ ॥

ऐंसी पाचही निवडलीं ॥ पांचां ठाइं बैसली ॥
आइका कवणे कवणाची जालीं ॥ ऐसी कथा ॥ १३०९ ॥

व्योमीव्योम अंत:करण ॥ वायोव्यानु तेज श्रवण ॥
वाचा जळ शब्दु निर्माण ॥ जाला महीरुपें ॥ १३१० ॥

पवनी गगन तें मन जाणा ॥ वायो पवनी समानु म्हणा ॥
तेजत्वाचा पवना ॥ जळ ते कर ॥ १३११ ॥

पवनी स्पर्शु ते धरणी ॥ ऐंसी पाच पवना पासूंनि ॥
वेगलीं जाली निर्वाणीं ॥ येकामेका तें ॥ १३१२ ॥

तेजी बुद्धि ते आंकाश ॥ वायोउदानु तेजांस ॥
चक्षु तेज पादांस ॥ उदक बोलिजे ॥ १३१३ ॥

तेजी रुप पृथ्वीगुणे ॥ ऐसें विभागले तेज येणें ॥
प्रकारें तें निरोपणें ॥ प्रकट केलें ॥ १३१४ ॥

आपीं गगन चित्त होये ॥ प्राणवायु आपीं आहे ॥
रसना तेज उपायें ॥ सार निवडलें ॥ १३१५ ॥

शिश्न जळ तयें जळीं ॥ रसधरणी निवडली ॥
पंचधा मेदुनी जाली ॥ प्रकारे येणें ॥ १३१६ ॥

अहंकार पृथ्वीचें गगन ॥ वायो अपानु आइका वचन ॥
तेज पृथ्वीचे तें घ्राण ॥ भर्वसेनी ॥ १३१७ ॥

उदक पृथ्वीचे तें गुद ॥ गंधु पृथ्वी आपण सिध्द ॥
ऐसे पांचांचे पंचवीस भेद ॥ होत जाते ॥ १३१८ ॥

पंचवीसही ये सारे ॥ येही केलीं पाच पुरे ॥
तिचि कैसीं विचारें ॥ करा श्रवण ॥ १३१९ ॥

पांचही अंश पृथ्वीचें ॥ विषय पूर तयाचें ॥
ज्ञेयकार्य भोक्तयांचे ॥ भोग्य तें तें ॥ १३२० ॥

पाचही जळांची मीनलीं ॥ कर्मपुरी तेही वसविली ॥
कर्म करणें लागलीं ॥ वेगळीचि नांदो ॥ १३२१ ॥

ते जे वसविले ज्ञान पूर ॥ पंचधातेज तेथे पवित्र ॥
ज्ञान करणाचे प्रकार ॥ वेगळेंचि ते ॥ १३२२ ॥

पंचधा पवनु मिनला ॥ चेष्टा ग्रामुदेहीं केला ॥
प्राण पंचकु वेगळा ॥ तो आपुलेनि भावें ॥ १३२३ ॥

पांचही व्योमे सारिखी ॥ अंत:करणादिकें तें कीं ॥
ज्ञात्रुत्व पुरी ते लोकी ॥ नाही वसवली ॥ १३२४ ॥

पांचही पुरे वेगळालीं ॥ माजि जीं तत्वें वसिनली ॥
तीं व्यापारी प्रवर्त्तलीं ॥ आपुलाला पुरी ॥ १३२५ ॥

तंवं विषया नाहीं आपुले ज्ञान ॥ चेष्टा ज्ञात्रुत्व साधन ॥
ते अवघेचि जड म्हणौन ॥ व्यापारु न चले ॥ १३२६ ॥

तैसीचि कर्मकर्णे अज्ञानें ॥ कर्त्रुत्व नाहींना चेष्टणें ॥
आणि भोग्य तें पुरें तेणें ॥ न संपडे तेथ ॥ १३२७ ॥

न कळे ज्ञानकरणा साधन ॥ आणिले हीन ये ज्ञातेपण ॥
आणि जाणावे ते विषयभान ॥ ज्ञानपुरी नसे ॥ १३२८ ॥

प्राण नेणती क्रियेतें ॥ विषयो ना ज्ञान तेथें ॥
आणि प्रवृत्ति करवी जेणें तें ॥ ज्ञात्रुत्व ना कर्तृत्व ॥ १३२९ ॥

अंत:करणादि पांचही जणें ॥ केवळ कर्त्ता करण हीनें ॥
ज्ञाता परंतु ज्ञानकरणें ॥ सुटलीं ऐसीं ॥ १३३० ॥

ज्ञानहीनु ज्ञाता ॥ कर्महीनु काये कर्त्ता ॥
तेथें कार्य तें सर्वथा ॥ वर्त्तेचिना ॥ १३३१ ॥

करणा पाहिजे कर्त्तेपण ॥ आणि कार्य जें तयाचें भान ॥
आणि कर्ता तो कार्यकरण ॥ तयांते अपेक्षी ॥ १३३२ ॥

कर्ते न करणेंवीण ॥ न सुधें कार्याचे जें भान ॥
तें आहें कीं नाही आपण ॥ हेचि नेणे ॥ १३३३ ॥

म्हणौनि अंत:करणादि कर्त्ते ॥ आश्रयी करण संयोगातें ॥
मग निपजवी कार्यातें ॥ जाणे निपजलिया ॥ १३३४ ॥

कर्त्ता कार्य विषयीं उदीतु ॥ तो प्राणपुराप्रति येतु ॥
मग प्राणाचा संघातु ॥ धरुंनियां ॥ १३३५ ॥

प्राणसहितु येक सरा ॥ चेष्टावंतु होये खरा ॥
मग तया समवेतु ज्ञानपुरा ॥ प्रति पावे कीं ॥ १३३६ ॥

ज्ञानपुरीं ज्ञातेपण ॥ आंगिचे ज्ञात्रुत्व चंचळपण ॥
मग कर्मपुरीं येउंन ॥ वसति करी ॥ १३३७ ॥

ज्ञानसहितु ज्ञाता ॥ चेष्टामयु तत्वता ॥
तो कर्मकरणी वर्त्तता ॥ कर्ता होये ॥ १३३८ ॥

कर्त्रुत्वाभिमान पुरस्कारें ॥ कार्य रचलें सत्यस्फुरे ॥
मग ज्ञाता चेष्टकु संचरे ॥ तये ठांइं ॥ १३३९ ॥

एवं ज्ञात्रुत्व कर्त्रुत्व निश्चित ॥ चेष्टायुक्त ज्ञानयुक्त ॥
होउंनि होये क्रियारुप तै पदार्थ ॥ ज्ञानसाधन ॥ १३४० ॥

म्हणौनि परस्पर मिलती ॥ परि स्वयातीवीण ना नुसरती ॥
यालागी प्रत्यगू प्रत्यभूतीं ॥ त्रिपुटी वर्त्ते ॥ १३४१ ॥

ज्ञाताकर्त्ता अंत:करण ॥ व्यानु तेथें चेष्टा करण ॥
ज्ञान बोलिजे तें श्रवण ॥ कर्म करण वाचा ॥१३४२ ॥

विषयो अंत:करणालागुंनि ॥ तो गुणवर्ते गगनी ॥
ययालागी ती जाउंनि ॥ तेथेंचि मिलती आना ॥ १३४३ ॥

गगनापासूंनि जालीं ॥ पांचापुरीं तीं राहिलीं ॥
तथापि स्वयातीची वेगली ॥ न मिळती आना ॥ १३४४ ॥

मनचि जेथें ज्ञाता ॥ तेथें समानाची चंचळतां ॥
त्वगेंद्रिय ज्ञान तत्वता ॥ तया मनातें ॥ १३४५ ॥

समान योगे चेष्टा रुपता ॥ त्वगेंद्रिय योगें ज्ञानरुपता ॥
पाणि कर्म तरि कर्त्ता ॥ तितुलेनिचि मन ॥ १३४६ ॥

विषयो स्पर्शु तयातें ॥ गुणु तो तया पवनातें ॥
म्हणौनि पवनीचि व्यापारुवंते ॥ पवन जातें यी ॥ १३४७ ॥

पांचही वेगळाली पुरें ॥ परियाति याती अनुसरे ॥
यापरी त्रिपुटी व्यापारें ॥ तितुलेनी चित्ते ॥ १३४८ ॥

बुध्दि स्वस्थानी ज्ञाता ॥ तेथें उदानाची चेष्टा तत्वता ॥
चक्षु ज्ञानकवण सर्वथा ॥ कर्मकरण पाद ॥ १३४९ ॥

तो ज्ञाता कर्त्ता साधकु ॥ तेणेचि प्राणे होये चेष्टकु ॥
ज्ञाता कर्त्ता विषयज्ञु येकु ॥ वेगळाचि तितुला ॥ १३५० ॥

रुपविषयो तेथ वर्ते ॥ तो तेजीं गुणु ते जातें ॥
यापरी वेगलीं परि तें ॥ येके येकाचीं ॥ १३५१ ॥

ज्ञाताचित्त ज्ञान रसना ॥ चेष्टा प्राणु ऐसे जाण ॥
शिश्न कर्म करण रसगुण ॥ विषयो करी ॥ १३५२ ॥

उदका पासावयें जाली ॥ जऱ्हीं वेगळालीं बैसलीं ॥
तऱ्ही कार्यसाधु प्रवर्त्तली ॥ तै ऐसी येकें ॥ १३५३ ॥

अहंकारु ज्ञाता आपणु ॥ तेथें चेष्टा करण अपानु ॥
ज्ञान विषयिक घ्राणु ॥ पायु क्रिया वृत्ति ॥ १३५४ ॥

तेथें विषयो गंधु साचार ॥ पृथ्वी यां अवधियांचे शरीर ॥
म्हणौनि वेगलीं ही व्यापार ॥ येकत्वें करिती ॥ १३५५ ॥

यांचे परस्परा अनु मीळन ॥ कर्म न चले तेणेंवीण ॥
ना तरि देखिले तयाचें अभिधान ॥ वाचा नेणावें ॥ १३५६ ॥

त्वचा मनाची असतां ॥ तेथ जाला स्पर्शु तो जाणतां ॥
वाचा अंत:करणाची तत्वता ॥ तीं न नेणावे ॥ १३५७ ॥

दृष्ट न धरावें करें ॥ पुष्प घ्राणाचें सोइरें ॥
परिमळ जाणोनि वाचे द्वारें ॥ सांगावा कैसा ॥ १३५९ ॥

म्हणौनि अंत:करण पंचक ॥ तें अवघें ज्ञातें येक ॥
भेदु बोलती मूर्ख ॥ तेही न विवेकी ॥ १३५९ ॥

ज्ञातयाचेनि येकपणे ॥ पाच होती विषयज्ञानें ॥
अंतरी येकचि जाणणें ॥ म्हणौनिया ॥ १३६० ॥

अक्षरांचिया पंक्ती ॥ अंगूळिका न्यासूनि वाचिती ॥
ते आपण आइकोनि नेणती ॥ तै वाचणेंचि न घडे ॥ १३६१ ॥

म्हणौनि येकीचि ते ज्ञानवृत्ति ॥ येकीचि तैसी कर्मप्रवृत्ति ॥
अंगभेदेंनि निपजति ॥ व्यापार भिन्न ॥ १३६२ ॥

बोलावया आधी जाणें ॥ जावया सामधी करणें ॥
करावया देणें घेणें ॥ ऐसे असतां ॥ १३६३ ॥

कर्मवृत्ति असतिया भिन्ना ॥ तै येकी येकी साह्य होती ॥
सिध्द न होती प्रयोजना ॥ केवळें भेदें ॥ १३६४ ॥

पांचाहीं विषया येकपण ॥ भूताकृती असे जाण ॥
पुष्पचि येक ज्ञान ॥ तयाचें करितां ॥ १३६५ ॥

तयातें शब्दु असे ॥ स्पर्शुरुप आभासे ॥
गोडी गंधु विषें ॥ पुष्पाचां ठांइं ॥ १३६६ ॥

आंगावरि पृथ्वीचिया ॥ भेदु तो नाथी विषयां ॥
यापरी जाणतां तया ॥ रुप येका ॥ १३६७ ॥

एवं विषयां विषयां अभेदु ॥ कर्म करणा तथाविधु ॥
ते विज्ञान करणासिद्धु ॥ नव्हे करितां ॥ १३६८ ॥

प्राणा प्राणा भेदु असता ॥ तै येकु श्वासु देहुंनि होतां ॥
येरु समूह उरता ॥ तयां प्राणाचा ॥ १३६९ ॥

श्वासोश्वासीं येकु पवनु ॥ तो जातां देह सांडूंनु ॥
इतरु तरि आनु ॥ प्राणु पाहचि ना ॥ १३७० ॥

यापरी प्राण ते अभिन्न ॥ चेष्टारुप पांचही जाण ॥
ऐसे बोलती आसुरगण ॥ अंत:करण येकचि ॥ १३७१ ॥

आतां अंत:करणा भेदु प्राणा ॥ कर्मकरणा ज्ञानकरणा ॥
विषय न मिळती जाणा ॥ ते वेगळे ययां ॥ १३७२ ॥

तरि येक अंत:करण ॥ प्राण तयाची चेष्टा म्हणौन ॥
नसे तेणे विलक्षण ॥ अंत:करणेंसीं ॥ १३७३ ॥

ज्ञानेंद्रिये ज्ञानकरण ॥ तें ज्ञाते नसीं नसे विलक्षण ॥
प्रकाशु वेगळा रत्न ॥ तेणेंसीं जैसें ॥ १३७४ ॥

कर्त्तयाची क्रियावृत्ति ॥ ते पाहातां कर्त्ताचि आथी ॥
विषय ते तयाप्रति ॥ गोचर भाव ॥ १३७५ ॥

आंगाचे गोचरपण ॥ आगेंसीं असते भिन्न ॥
तें अनवस्था मागुते ॥ न तेथें होती ॥ १३७६ ॥

कां विषयो आंगेंचि होणें ॥ आपण पयां जाणणें ॥
तेंचि भूतांचे भासणें ॥ प्रत्यक्षाकार ॥ १३७७ ॥

भूतांविषयां अभेदु ॥ विषयां विषय ज्ञात या विधु ॥
माजि करणातें भेदु ॥ तो कवणें करावा ॥ १३७८ ॥

भूतांचेनि याति भेदें ॥ पंचवीस जाली विविधें ॥
आणि स्थुळें पांचप्रसिध्दे ॥ नदतें असति ॥ १३७९ ॥

आतां भूतांचे बीज वीर्य ॥ तें येकचि असतां ज्ञेय ॥
आणि तयाचेंचि कार्य ॥ देहे असतां ॥ १३८० ॥

भूत भेदु वेगळा देहेंसी ॥ न घडे पांच भौतिके स्थळेंसी ॥
त्रिपुटी ते तया पिंडासि ॥ सोडूंनि नसे ॥ १३८१ ॥

स्थळावेगळें सूक्ष्म मानी ॥ ऐसा कुबुध्दि कव्हणी ॥
तयाप्रती ययां वचनी ॥ आक्षेपु करावा ॥ १३८२ ॥

जो आकारु इंद्रियाचा ॥ तोचि ठसा या देहाचा ॥
देहो तोचि इंद्रियांचा ॥ येकत्र मेळावा ॥ १३८३ ॥

शरीरा वेगळें कर चरण ॥ तरि शरीरा न व्हावे गमन ॥
देहाते जाते सांडून ॥ अवेव ते ॥ १३८४ ॥

देह बोले तेचि वाचा ॥ शिश्न पायु भागु देहाचा ॥
देहावेगळा नयनु कैंचा ॥ होउंनि देखे ॥ १३८५ ॥

देहावेगळा श्रवणु ॥ निवडितां न ये घ्राणु ॥
कूरसना प्राणु ॥ पंचविधु तोही ॥ १३८६ ॥

देहा वेगळें अंत:करण ॥ कांढूनि न्या आपुलें मन ॥
मग रीत तया देहा दंडुन ॥ होयेना कां ॥ १३८७ ॥

म्हणाल स्वप्नी निवडलें ॥ कां सुषुप्तिकालीं सुटलें ॥
मनोधर्माचि सुटले ॥ शरीरा पासावा ॥ १३८८ ॥

तरि भलयती असो अवस्था ॥ यया देहा दंडु होतां ॥
मन तें नेणतें वार्त्ता ॥ तया दु:खाची ॥ १३८९ ॥

स्पर्शतांचि जागृत होये ॥ तै मनावेगळें देह काये ॥
कीं देहा वेगळें आहे ॥ गलें मन ॥ १३९० ॥

देहचतुष्टय कल्पिती ॥ अवस्था चतुष्ठय तया आरोपिती ॥
तयांचा निरासीं बोलती ॥ ब्रह्मैक समाधि ॥ १३९१ ॥

तरि करुंनि देहांचे निरसन ॥ समाधीं पावले मन ॥
आतां रीतें देहे तेणेंवीण ॥ उरलें जैयी ॥ १३९२ ॥

तरि येथिचे प्राण निरोधावे ॥ मने चडफडूंनि न यावे ॥
यया अनुभवा नेणावें ॥ अवरोधाचिया ॥ १३९३ ॥

दंडु होता देहासि ॥ समाधी न कळता मनासि ॥
तरि वेगळीक देहेंसीं ॥ होती तया ॥ १३९४ ॥

करि जे तें देहीं सांवधान ॥ कां उठी समाधीपासूंन ॥
असौ जैसी निद्रा जैसे स्वप्न ॥ तैसा अभासु हा ॥ १३९५ ॥

स्पर्शु करितां देहातें ॥ मन जागृत होये तेथें ॥
निद्रा कां स्वप्न भासतें ॥ तें काहीं उरे ॥ १३९६ ॥

तैसेचि समाधीस्थ अंतःकरण ॥ थापटिंता देहीं होये सावधन ॥
तै समाधी होती ते खूण ॥ कांही उरे ॥ १३९७ ॥

सावधान होतां जें नाहीं ॥ तै स्वप्नचि ऐसें ना तरी कायी ॥
वायां तेणें मरावें डोहीं ॥ जाणपणाचां ॥ १३९८ ॥

देहपाती स्वप्न उरे ॥ जागृत होतांचि जें क्षरे ॥
तैसेंचि जाणावें चतुरें ॥ अनुभव लक्षण ॥ १३९९ ॥

देह स्फुरणें जें हारपे ॥ देहत्व काये तेणे करपे ॥
असो आतां साक्षेपें ॥ येक बोलों ॥ १४०० ॥

देहांतीं हे उरैल ॥ मोक्षु येणें होइल ॥
हे झकवणें केवळ ॥ शास्त्रवादियांचे ॥ १४०१ ॥

यया शब्दाची प्रतीति ॥ पाहा मग करा युक्ति ॥
वृथा आपुलीचि मति ॥ पुढे न करा ॥ १४०२ ॥

देह दंडनीचि हें नुरे ॥ मन येऊंनि देहीं संचरे ॥
तरिं दुःख काये तयाहूंनि बरें ॥ म्हणौनि धावे ॥ १४०३ ॥

तैसे देह असतां पीडित ॥ निवडा पां देहाहूंनि चित्त ॥
भी न तरि खेदु येथ ॥ म्हणौनि जावे ॥ १४०४ ॥

आतां तें देहनाशु पावे ॥ तवं पूर्वीचे हें माळवे ॥
विक्षेपु आधी दुःखानुवे ॥ सिध्दु जाला ॥ १४०५ ॥

आतां देहांती होतां विस्मरण ॥ आपणचि नुरे मन ॥
तेथें समाधिते कवण ॥ जे कल्पना मनाची ॥ १४०६ ॥

म्हणौनि स्थूळेंसींचि जागणें ॥ स्थुळेंसी चि असे निजणे ॥
स्वप्नु सुषुप्ति भोगणे ॥ स्थुळाधारेंचि ॥ १४०७ ॥

स्थुळाधारेंचि ते तुरिया ॥ स्थुळाधारेचि समाधि आत्मयां ॥
स्थूळावेगळें असावया ॥ कैंचे मन ॥ १४०८ ॥

सूक्ष्मकारण महाकारण ॥ स्थूळचि तया स्थान ॥
ऐसे ये ये स्थुळी भान ॥ उदंड उठी ॥ १४०९ ॥

च्यान्ही अवस्था येथेंचि ॥ हें सोडूंनि समाधि नाहींचि ॥
तेथे इंद्रिये ती कैंची ॥ जे वेगळीं देहा ॥ १४१० ॥

स्थुळा वेगळा नयनु असता ॥ तै काढिला ही तो न निघता ॥
घट्ट तो दिसतूचि असता ॥ बुबळेंविण ॥ १४११ ॥

ययां वेगळीं अणिकें ॥ करणे म्हणितलीं येकें ॥
तयाचेनि वृथा विवेकें ॥ नाशले जन ॥ १४१२ ॥

सूक्ष्में करणें वेगळीं असती ॥ तरि स्थुलीं कफवात पित्तोत्पति ॥
तेणें अंधमूक बधीर होती ॥ कां पांहे जन ॥ १४१३ ॥

सूक्ष्म देह निरामय ॥ तथा न बधिती आमय ॥
तै करण गण स्वकीय ॥ ते कां गेले ॥ १४१४ ॥

आतां हा पांच भौतिकु योगु ॥ येकु सबाह्य अंतरंगु ॥
न निवडे तंवंचि सांगु ॥ देहो असे ॥ १४१५ ॥

योगु होणें तें उपजणें ॥ योगे असणें तें जाणें ॥
वियोगु पांचाचा ते मरणें ॥ ऐसे असता ॥ १४१६ ॥

शेष तें कांहींचि नुरे ॥ वचन हे सर्वथा खरें ॥
कवणा कैंची जन्मातरें ॥ पाठी माग ॥ १४१७ ॥

भीतीचें आधारें भासे ॥ तें भींति नाशीं सर्वनाशे ॥
तया चित्राचि ऐसें ॥ सर्वथा हे ॥ १४१८ ॥

सारद्र निवडतां जळ ॥ नुरती तरंग फेन कल्लोळ ॥
तैसें देह हानी केवळ ॥ सर्वही शून्य ॥ १४१९ ॥

देहें अवस्था अभिमानी ॥ गुणप्रपंचु सर्वकारणी ॥
आप परावें मुख्य करुनि ॥ सर्व शून्य ॥ १४२० ॥

ऐसा देहींचि आत्मा तत्त्वता ॥ देहविलयें आत्मशून्यता ॥
प्रत्यक्षचि प्रमाण तत्वता ॥ हे आसुर बोलती ॥ १४२१ ॥

ऐसा गंर्भी पिंडू रचला ॥ स्त्री पुरुष वीर्यें जाला ॥
पांच भौतिकु विकासला ॥ आपेंआप ॥ १४२२ ॥

येथें अंधुमुकु बधीरु ॥ अंगहीनु कां होये नरु ॥
तरि कफ पित्त समीरु ॥ ययाची बाधा ॥ १४२३ ॥

जेणें अन्नें पोषे देह ॥ तेणेंचि मुख्य रोगत्रय । तयापासाव आमय ॥
नाना होती ॥ १४२४ ॥

अंगहीन तेचें कारण ॥ रोग असती सनातन ॥
यावरि कव्हणी वचन ॥ येथ बोलैल ॥ १४२५ ॥

जन्मतांचि येकु बधीरु ॥ अंधु मूकु पाउडा नरु ॥
खुळ्ळुला हा प्रकारु ॥ कासे न जाला ॥ १४२६ ॥

तरि यये अंर्थी निरोपण ॥ आइका गर्भदोष कथन ॥
संक्षेपेचि तें सांगैन ॥ होइल बोधु ॥ १४२७ ॥

होतां निर्माण पिंडांचें ॥ बळ तया वीर्यस्था वायोचें ॥
सामग्री या येरा देहाचें ॥ निर्माण होतां ॥ १४२८ ॥

पवनु निजगुणे डोलता ॥ तो जेथं होये अपुरता ॥
तें गर्भ वाढि धरितां ॥ उगेंचि सुके ॥ १४२९ ॥

येक अंग सबळ ॥ येक अंग ते निर्बळ ॥
येक सूक्ष्म येक स्थूळ ॥ ऐसे जे चेष्टा ॥ १४३० ॥

खुळें लुळें उडें ॥ कां येक अंग आगळें वाढे ॥
अथवा येक न चढे ॥ आरंभाचि पासून ॥१४३१ ॥

जामुन वामन म्हणिजे ॥ डावखरे येणेंचि निपजे ॥
ऐसा विर्यस्था बोलिजे ॥ क्षोभु पवनाचा ॥ १४३२ ॥

अगांची आणि बळाची ॥ हीनता पूर्णता तेया वायेची ॥
आतां भूमिका काय या बीजाची ॥ मातृ गर्भीजे ॥ १४३३ ॥

तेहीं पाच भौतिक निखळ ॥ तेथें दोष तिनि प्रबळ ॥
भूतेंचि पाचही मूळ ॥ तयांचे तेथें ॥ १४३४ ॥

जे येक अंग रचतां ॥ वायोचि आगळा होये होता ॥
ते जरी कां सारद्रता ॥ तया जळाची ॥ १४३५ ॥

तेचि दोष त्रय जाण ॥ तेणें तेचि अंग होये हीन ॥
येथिचें येक कारण ॥ साच आहे ॥ १४३६ ॥

पांचहीं तेजांश निपजती ॥ ज्ञानकरणाचिया आकृती ॥
जलांशें कर्म करणें हे उक्ती ॥ मागांचि संपादली ॥ १४३७ ॥

आतां जेथे जो सूक्ष्म तेजांशु ॥ तया आपुला तंवं प्रकाशु ॥
परि येरां भूतांचा विशेषु ॥ साह्य पाहिजे ॥ १४३८ ॥

नाना लोहाचें निर्मळपण ॥ नव्हे तेणेसीं विलक्षण ॥
तैसें तेजांश होती गहन ॥ परि भूतां अवेगळें ॥ १४३९ ॥

दर्पणु निर्मळ आंगाचा ॥ परि तो आकारु लोहाचा ॥
तेणें लोहेंवीण कैंचा ॥ निर्मळ भागु तो ॥ १४४० ॥

लोहातें चढे मळ ॥ तै तो नव्हे निर्मळ ॥
आतां उजळाऊँ तया वेगळू ॥ तो असेचिना ॥ १४४१ ॥

तैसें पंचविध तेज विशेषे ॥ ते जयांचां आंगीं असे ॥
ते भूतपंचक सारांसें ॥ कवण जाणावें ॥ १४४२ ॥

श्रोत्रीं सछिद्रता तें गमन ॥ पवनयोगें ध्वनीचें स्थान ॥
तेज उष्णता जीवन ॥ सारद्रता तेथिची ॥ १४४३ ॥

तयाचां आंगी व्योमतेज ॥ म्हणजे तें याचेंचि सहज ॥
आत्तां त्वगेंद्रिय पवन प्रज ॥ तेज जें कां ॥ १४४४ ॥

तेथें सछिद्रता व्योमाची ॥ स्पर्श प्रभा वायोची ॥
सूक्ष्मता कैसी तिची ॥ रुपहीन ॥ १४४५ ॥

हिमाचे येती कांटाळे ॥ तेजीचे स्वभाव डोहाळे ॥
रोमांच उभे होती वेळे ॥ शांत होती ॥ १४४६ ॥

त्वचेचेनि संबंधे ॥ व्यक्तुस्पर्शु जीतें भेदे ॥
मग त्वचा तेवि नोदें ॥ जे जागृत करी ॥ १४४७ ॥

ऐसी पवन कळा तत्वता ॥ तेज तें आंगाची उष्णता ॥
जळसार द्रमुद्रता ॥ रुक्षता महीची ॥ १४४८ ॥

आंतु बाहेरि रुप भेदु ॥ तो सछिद्रता येकु भेदु ॥
नयनी व्योमाचा प्रसिध्दु ॥ नांदतु असे ॥ १४४९ ॥

चंचळता तेथ वायोची ॥ सोज्वळता असे तेजाची ॥
साद्रता तया उदकाची ॥ पृथ्वीचें मांस ॥ १४५० ॥

रसनेंचा ठांइं सछिद्रपण ॥ तेंचि जाणावें गगन ॥
चंचळता चळन वळन ॥ तें तया पवनाचें ॥ १४५१ ॥

तेजाचें दीप न आंगी ॥ द्रॐ उदकाचा तेथ संगी ॥
मांसरसनेचां आंगीं ॥ तें तिथे धरणीचें ॥ १४५२ ॥

धाणी सछिद्र तें गगन ॥ आकर्षण गंधाचें पवने ॥
करूंनी उपजती जयापासून ॥ श्वासोश्वास ॥ १४५३ ॥

उष्णता वर्ते तेजाची ॥ सारद्रता तें तया जळाची ॥
व्यक्ति मासळ पृथ्वीची ॥ ऐसीं पांचही ॥ १४५४ ॥

पांचही पाचांची तेजस्थानें ॥ तेथे भूतपंचक निर्मळपणें ॥
मीनलें मग प्रकाशें तेणें ॥ बाह्यस्फुरे तेज ॥ १४५५ ॥

आता सांगीतले गर्भदोष ॥ आगळे जे भूतत्रय अंश ॥
उष्ण शैल्य वायो परियस ॥ येणें आकारे ॥ १४५६ ॥

ती उपजति यां अंगा हाणती ॥ पांचांमाजि येक पाडिती ॥
तेणें माल्हवेते ज्योति ॥ सर्वथैव ॥ १४५७ ॥

येकेंवीण अविधि यांते ॥ गुण नाहीं हे निरुतें ॥
तै यथावीण तेज तें ॥ कणवें वस्तूचें ॥ १४५८ ॥

ज्ञाता तो इछाचि करी ॥ परि प्रकाशु स्फुरे याव्दारी ॥
मग अर्थबोधु बाह्यांतरी ॥ प्रकटू होये ॥ १४५९ ॥

श्रोत्रवत्ती तेज सैत्यें ॥ असतां हालें नयनिचें वातें ॥
तेणें प्रकाशु नाही येरांतें ॥ अंधु बधीरु होये ॥ १४६० ॥

कां उष्णे हालाशैं त्यांशु ॥ तेथे उष्णें उष्णाचा होये ग्रासु ॥
चक्षु नयनु पडे वोसु ॥ इतुलेनीची ॥ १४६१ ॥

कर्परु अवधा सरे ॥ तैचि तो पावकुही नुरे ॥
कीं जळीं उष्णता सहज खरें ॥ तें नसे तेणेवीण ॥ १४६२ ॥

तैसे तेज तया सारद्राचें ॥ की सारद्रपण तया उष्णांचें ॥
दोन्ही गुण धरणीचे ॥ की तयाचें रुप हे ॥ १४६३ ॥

असो येके येकाचा भाऊँ ॥ विण येकें येकाचा अभाऊँ ॥
येहीं अवघा होये ठाऊँ ॥ ज्ञानकरणां तया ॥ १४६४ ॥

पांच भौतिकें जेणें रसें ॥ जननी जठरी गर्भू पोषे ॥
तोही तिचेनी देह दोषें ॥ दोषावंतु ॥ १४६५ ॥

का जया द्रव्याचा निपजला ॥ रसु देहाकृती गोठला ॥
सातां धातू तें लागला ॥ परि पुष्टकरू ॥ १४६६ ॥

वातुळें पितुळें श्लेषाळे ॥ द्रव्यें ती होतीं सकळें ॥
म्हणौनि तैसाचि रसु तत्काळें ॥ होता जाला ॥ १४६७ ॥

तेणें तया गर्भाप्रति ॥ वात पित्त कफ होती ॥
त्रिविधा दोषीं उठिती ॥ बाल दोष ते ॥ १४६८ ॥

ताप स्फोटक पुळिका ॥ अर्षादि व्याधी अनेका ॥
इंद्रियव्याधी आइका ॥ आदि करूंनि ॥ १४६९ ॥

वण व्रण गुल्म हरळ ॥ यां व्याधींसींचि जन्मे स्थूळ ॥
कां बाळपणीचि प्रबळ ॥ उमटती रोग ॥ १४७० ॥

आता शुक्लरक्त जेणें काळें ॥ येकस्थानी वायोमिळे ॥
तै स्त्रीपुरुषांची शरीरें ॥ दोषवंतें असता ॥ १४७१ ॥

की ठांइंची चि कुष्टे युक्तें ॥ वातुलें पितुळें रोगवंते ॥
असती उभेषे तेथें ॥ तैसेचि वीर्यनिपजे ॥ १४७२ ॥

सदोषें वीर्यें तेणें ॥ कुष्टाचें कुष्टचि होणें ॥
वातुळ पितुळ तेणेंचि मानें ॥ होये बालक ॥ १४७३ ॥

एवं राहिले काळी दोघांते ॥ शरीरीं व्याधि जे वर्ते ॥
ते तैचीचि बाळकातें ॥ अनिवार होये ॥ १४७४ ॥

आतां असो हा प्रकारु ॥ जन्मला असता कुमरु ॥
येकु तो अत्यंत चतुरू ॥ येकु जडु कां ॥ १४७५ ॥

येकु तो आचारशीळ ॥ येकु होये चांडाळ ॥
येकु शांतु येकु चांडाळ ॥ ऐसें हे कां ॥ १४७६ ॥

येकु उपजतांचि वेडा ॥ येकु ज्ञानी योगी धडफुडा ॥
येकु सभाग्यु येकु उघडा ॥ द्रारिद्री कां ॥ १४७७ ॥

यया आक्षेप वचन ॥ बहुविध असे येथ कारण ॥
जाणतें जाणती सज्ञान ॥ न कळे येरां ॥ १४७८ ॥

सात्विकें राजसे तामसें ॥ द्रव्यें असती बहुशे ॥
निपजे तयांचेनि रसें ॥ तें तद्वत वीर्य ॥ १४७९ ॥

तेणें वीर्ये जो निपजे ॥ तया तेचि गुणु देहीं आपजे ॥
मग जन्मतां तैसाचि उपजे ॥ तेणें स्वभावें ॥ १४८० ॥

सात्विकें होये ज्ञानवंतु ॥ राजसे तेवीचि क्रियावंतु ॥
विषयभोगीं होये आसक्तु ॥ भर्वसेन ॥ १४८१ ॥

तामसें जडु तामसु ॥ अलसीप्रभादी पुरुषु ॥
ऐसा हा प्रत्यक्ष वीर्य दोषु ॥ कवणें न मनावा ॥ १४८२ ॥

सात्विक कार्य जितुलें ॥ सात्विकाचा ठांइं तितुलें ॥
राजसा राजसु बोलिलें ॥ तें सकळ लक्षण ॥ १४८३ ॥

तामसा तामस गुण लक्षण ॥ जाणावें गुण विभांगांवरुन ॥
आतां तें कवण अन्न ॥ ऐसें पुसतां ॥ १४८४ ॥

सात्विक अन्न सांगिजैल ॥ रसिक स्निग्ध निर्मळ ॥
करी संजीवन पुष्टीबळ ॥ नाशी रोगातें ॥ १४८५ ॥

स्त्री विशेषहर बुद्धि कर ॥ सेवितां सेविलियां सुखकरा ॥
धातुंचा ठांइं स्थिर ॥ राहे चिरकाळ ॥ १४८६ ॥

मुग्ध तंदुळ गोधुम ॥ गव्यपय घृत उत्तम ॥
दधिमधु शर्करा ये तत्सम ॥ शांतद्रव्य ॥ १४८७ ॥

तें सात्विक जाणावें ॥ आतां राजस कैसे स्वभावें ॥
जें सेविता हित नव्हें ॥ प्राणियांसि ॥ १४८८ ॥

केशर शीतळ केवल उष्ण ॥ केवळ रुक्ष कठिण ॥
तीक्त आम्ल लवण ॥ कटु ऐसें ॥ १४८९ ॥

तुरट घुरट खोमट ॥ सेवितां सेविलयां होती कष्ट ॥
आमय जेणे पुष्ट ॥ देह कवळावया ॥ १४९० ॥

सोफा चाले जें सेवितां ॥ घुर्मी उमजु न पडे चित्ता ॥
शूळादि व्यग्र करिती व्यथा ॥ त्यांते जें करी ॥ १४९१ ॥

नवेचि को द्रव्य राळ ॥ वाल निबर कोवळे ॥
लोंकाजुनियां चे ढोकळे ॥ महिषीचें तक्र ॥ १४९२ ॥

द्विदळ उडिद वाटणे ॥ चणे कोरडे ना फुटाणे ॥
कुळिथ मोहाळ जेणें ॥ उदरबाधा ॥ १४९३ ॥

राई लवण सुरणु ॥ मीरीं कोरडा लसणु ॥
चिंचा फुटें सलवणु ॥ पदार्थु बहु ॥ १४९४ ॥

ऐसीं येके विरसें ॥ येकत्र मेळउनि समरसें ॥
स्वादा आणुंनि विषेसें ॥ सेविती जन ॥ १४९५ ॥

ती राजसें द्रव्यें जाणावी ॥ तेही बुद्धि नाशे अघवी ॥
आतां तामसें वोळखावीं ॥ तीं अन्नें कैसीं ॥ १४९६ ॥

शिळें आणि विटाळलें ॥ का अमेध्यासमान म्हणितलें ॥
धर्मशास्त्रीं दूशिलें ॥ नये सेउं ॥ १४९७ ॥

माजिरें आणि अपवित्र ॥ निस्वाद आणि भ्रमकर ॥
महाआमय अपार ॥ तयांते करी ॥ १४९८ ॥

ऐसें तामस द्रव्य सकळ ॥ सेवितां अन्न स्वादुळ ॥
वीर्य निपजे केवळ ॥ तैसेचि तें ॥ १४९९ ॥

एवं विहित विचारितां अन्न ॥ निरामय तेचे कारण ॥
बुद्धि होये सुप्रसन्न ॥ तें सात्विक जाणावे ॥ १५०० ॥

सेवितां पाप नाही परी ॥ बाधक पापी रोगा करी ॥
तें राजस बरविया परी ॥ अन्नादि द्रव्य ॥ १५०१ ॥

आतां पाप घडे जें सेवितां ॥ प्रसवे रोगां अनंतां ॥
भ्रमातें करी सर्वथा ॥ तामस ते ॥ १५०२ ॥

ऐसियां अन्नाचीं वीर्यें जाली ॥ तेणे अपत्यें जी उपजलीं ॥
ती तीहिचि गुणी आथिलीं ॥ ऐसा वीर्यदोषु ॥ १५०३ ॥

असो रोकडें जे अन्न सेविता ॥ सर्वांगा जीवन निरामयता ॥
बुद्धितें होये सुप्रसन्नता ॥ रोकडीचि १५०४ ॥

तेणें वीर्य जे निपजैल ॥ तें तैसेंचि जाणावे केवळ ॥
पुढें अपत्य होईल ॥ तेणें वीर्यें ॥ १५०५ ॥

तैसेंचि होये गुणांचे ॥ अपूर्व यथा बोलाचें ॥
काये असे दृष्टीचें ॥ जाणणे असे ॥ १५०६ ॥

आतांचि स्ववेव्हारु माजे ॥ सत्प्रवृत्ति जेणें विझे ॥
इंद्रिया प्रवृत्ति निपजे ॥ कामु उठी ॥ १५०७ ॥

तेणें वीर्ये होईल ॥ तें तैसेचि कीरु आसैल ॥
येथें प्रत्यक्ष जाणु होइल ॥ तोचि थोरु ॥ १५०८ ॥

सदोष अन्न सेवितां ॥ माजिरे द्रव्यवरि चित्ता ॥
तेणे भये भलयता ॥ विस्मरण पडे ॥ १५०९ ॥

तेणें अन्नें जें वीर्य निपजे ॥ तेणें तैसेंचि तामस उपजे ॥
येथ काये सांगैल दुजे ॥ असे प्रत्यक्ष ॥ १५१० ॥

अन्न सात्विक ते ज्ञानकर ॥ राजसें इंद्रिय विकार ॥
तामसे भ्रमु साचर ॥ विसुरुचि पडे ॥ १५११ ॥

ऐसीं अन्ने त्रिगुणात्मकें ॥ त्याचीं वीर्ये तदात्मकें ॥
त्यापासाव होती बाळके ॥ तैसींचि तीं ॥ १५१२ ॥

ब्राह्मण ते शुद्ध अनारिसें ॥ शुद्रां ब्राह्मणाते विचि तैसें ॥
वैश्य क्षेत्री विशेषें ॥ दृष्टीचि वोळख वती ॥ १५१३ ॥

जयांपासूंनि जे जाले ॥ ते बाळक जऱ्ही धाकुले ॥
तऱ्हीं ते कळों आले ॥ वेगळेचि ॥ १५१४ ॥

वीर्य तैसा ह्रदयी गुणु ॥ वीर्य तैसा बाहेरि वर्णु ॥
वीर्य तैसा मृदकठीणु ॥ पुरुषु निपजे ॥ १५१५॥

कव्हणी म्हणैल वचन ॥ ब्राह्मणही येक कठीण ॥
कळा कर्मगुण हीन ॥ शूद्रा ऐसे ॥ १५१६ ॥

तरि ययाचि लागीतीं अन्नें ॥ लागली आम्हा सांगणे ॥
पुडती आहेचि बोलणें ॥ तंवं आक्षेपु कायीसा ॥ १५१७ ॥

नित्य शूद्रान्न भक्षिती ॥ तेणें अन्नें जे निपजती ॥
ते शूद्राचि ऐसे होति ॥ हा प्रत्यक्ष अनुभउ ॥ १५१८ ॥

येक करुंनि शूद्रवृत्ति ॥ शूद्राचि ऐसे जी ती ॥
तयाचेंनि वीर्यें होती ॥ तैसेचि पुत्र ॥ १५१९ ॥

शूद्रासंगेंचि जो वाढे ॥ तो शूद्रवंतूचि होये पुढे ॥
काळी अुवसवी लु गजें ॥ स्वेत होये ॥ १५२० ॥

अन्न व्यापारु संगु ॥ जयाचा जया घडे योगु ॥
तैसाचि तो बाह्यतरंगु ॥ आपणु होये ॥ १५२१ ॥

मां पुत्र होती अपूर्व काये ॥ पित्रुवंतुचि वीर्य आहे ॥
जयाचें तया ऐसें होये ॥ थुं कि न पडे ॥ १५२२ ॥

जे योनि तोचि आहारु ॥ तैसाचि प्रजा कारु ॥
तद्वतु तैसा विचारु ॥ यये चराचरी ॥ १५२३ ॥

प्रत्यक्ष पाहतां डोळां ॥ नरलोकीं जो वर्णु कुळा ॥
तोचि मनुजां सकाळां ॥ वर्त्तुतु असे ॥ १५२४ ॥

कृष्ण वदनाचे कृष्ण वदन ॥ ताम्राननाचे ताम्रानन ॥
ऐसिया कां आलें प्राचीन ॥ वीर्यदोषु तो ॥ १५२५ ॥

उत्तमाचां उदरी तत्वता ॥ उत्तम अन्ने सेवितां ॥
पुत्रु होये अवचिता ॥ अनारिसा जै ॥ १५२६ ॥

तै कारणकाळ वासना ॥ तेथ जाणावी लागे सुजाणा ॥
न कळे जया अज्ञाना ॥ ते काय बोलती ॥ १५२७ ॥

काळ तो येकु संभूतिकाळ ॥ दुजा प्रसूति समयो केवळ ॥
तेथें वासना तो निर्मळ ॥ स्वभाऊँ दोघांचा ॥ १५२८ ॥

दिवसा राहे होये असुरु ॥ संध्याकाळी निशाचरु ॥
आतां निशिकाळ पवित्रु ॥ संयोगाचा ॥ १५२९ ॥

तयाही माजि पंचाग शुद्धी ॥ जो काळ उतरला त्रिशुद्धी ॥
तेथें व्रत तप दान विधि ॥ ऐसी विचारितां ॥ १५३० ॥

पवित्रें काळे जो राहे ॥ तो पवित्रु भाग्यवंतु होये ॥
ना सहजीही आहे ॥ महिमा काळाची ॥ १५३१ ॥

मासफळ पक्षफळ ॥ दिवसफळ निशिफळ ॥
अयनफळ संधिफळ ॥ फळ प्रहारांचे ॥ १५३२ ॥
मुहूर्तफळ घटिकाफळ ॥ विचारितां दिनशुद्धी ग्रहबळ ॥
पळाहूनि अर्धपळ ॥ निमिष उन्मेषु ॥ १५३३ ॥
सभाग्यता आणि निर्भाग्यता ॥ पवित्रता आणि अपवित्रता ॥
गुणागुण सर्वथा ॥ होती काळ दोषें ॥ १५३४ ॥
ज्ञाता अज्ञाता विरक्तु ॥ संसारी आसक्तु दःखितु ॥
नानाविधु भाऊँ समस्तु ॥ काळ दोषें होये ॥ १५३५ ॥
आतां व्याकुळ चित्ते रमती ॥ तेथें उन्मत्तेंचि अपत्यें होती ॥
वासना ते ऐसी बोलती ॥ स्त्रीपुरुषाची ॥ १५३६ ॥
सुख वासना दुःखवासना ॥ पवित्र अपवित्रता उपजे मना ॥
ते काळीं कामना ॥ झोंबे ज्या अर्था ॥ १५३७ ॥
तयाचि भावासारिखा ॥ स्वभाऊँ होये त्या बाळका ॥
वासना लागे आणिका ॥ तै तेणें रुपें उठी ॥ १५३८ ॥
कव्हणी ऐसें बोलतील ॥ जन्मतां दरिद्री मूळ ॥
पुढे भाग्यवंत प्रबळ ॥ तेणें न व्हावें ॥ १५३९ ॥
आणि काळाचेनि बळें ॥ भाग्यवंतू उपजला यथाकाळें ॥
तयापुढें दरिद्र ना तले ॥ ऐसें असावें ॥ १५४० ॥
ऐसिया आक्षेपा वचन ॥ काळाचें तंवं येकविधपण ॥
परंतु सूक्ष्म काळ आन ॥ ऐसें आहे ॥ १५४१ ॥
असो काळ येकु जाला ॥ परि ग्रहगणु वेगळा ॥
सांगु काळ सांपडला ॥ तै अपूर्व कीं ॥ १५४२ ॥
वारफळ असे उत्तम ॥ तंवं तिथीचें फळ मध्यम ॥
योगु नक्षत्र उत्तम ॥ अवघेंचि नसे ॥ १५४३ ॥
करण फळ तयाविरुद्ध ॥ नियमु व्रत विविध ॥
चरणीं नाही हे ॥ वेगळाले भाव ॥ १५४४ ॥
म्हणौनि जे काळीं जे जैसे ॥ देही ते घडो तैसें ॥
कारणी विरोधु भेदु असे ॥ अप्रमीतुता ॥ १५४५ ॥

ग्रह्यांचिया गती नाना ॥ वासना ही येकविध असेना ॥
ययाहि वरि जाणा ॥ प्रेत्नु फळे ॥ १५४६ ॥

अन्नें जालें अजीर्ण ॥ हरीतकीने विरेचन ॥
तेथें कवण प्राचीन ॥ तये ठांइं ॥ १५४७ ॥

तैसा राजपुत्रु राजा तोचि ॥ ब्राह्मणु तो ब्राह्मणचि ॥
जे जे जे वृत्ति जयाची ॥ ते लागे वंशा ॥ १५४८ ॥

नष्टाचा नष्टु मातलिजे ॥ सुष्टाचा सुष्टु सहजें ॥
गाइचा पोटी उपजे ॥ तें पांखिरुं नव्हे ॥ १५४९ ॥

ऐसी ये कि परंपरा ॥ सहज कारण अवधारा ॥
वरि कीजे तो प्रेत्नु खरा ॥ जरि कां साधे ॥ १५५० ॥

न जे चित्तां न भरे पोट ॥ बैठ्या न क्रमे वाट ॥
चाले तया वांकुडें नीट ॥ निजतां नये ॥ १५५१ ॥

म्हणौनि जो प्रेत्नु कीजें ॥ अथवा होयें सहजें ॥
तोही कारण बोलिजे ॥ भाग्या अभाग्या ॥ १५५२ ॥

प्रेत्नु तो खरा येकु वरि ॥ काळ वासना यीं दुसरी ॥
आतां पुसावया उरी ॥ नसे कांही ॥ १५५३ ॥

ऐसें स्त्री पुरुषांपासूंन ॥ जाले म्हणती आसुरगण ॥
येथें आक्षेपु करिती आन ॥ तोचि कैसा ॥ १५५४ ॥

अहो दोनि अपत्यें जावळीं ॥ संभवती येके काळीं ॥
आयुष्यें भविष्यें वेगळी ॥ ती तयां ते कां ॥ १५५५ ॥

ऐसा आक्षेपु उपजला ॥ तो आसुरी मर्घांचि खंडिला ॥
ते काये बोलती नृपाळा ॥ आइक वचन ॥ १५५६ ॥

अहो पवनाचेनि आंगें ॥ आघातलें वीर्य दुभागे ॥
दो ठांइं वाढे लागें ॥ तींचि जावळी ॥ १५५७ ॥

संभवता जाला येकु काळ ॥ तथापि वेगळा भौतिक मेळ ॥
तेणें स्थूळ सूक्ष्म भागु वेगळू तो येकु नव्हे ॥ १५५८ ॥

तयांचेनि वेगळेपणें ॥ वेगळालिं कर्तीं कार्यें करणें ॥
वेगळाले प्रेत्न तेणें गुणें ॥ जन्म काळ वेगळा ॥ १५५९ ॥

ऐसें असतां वेगळपण ॥ पवना अधीन जीणें मरण ॥
तया कैसें होये एकपण ॥ वेगलां देहीं ॥ १५६० ॥

जन्मकाळेचेनि भेदें ॥ भविष्यही वेगलालें साधे ॥
वरि प्रेत्न ते न सुधे ॥ न वचतीची ॥ १५६१ ॥

जो जें करी तो तें पावे ॥ संगु साधन फळे अघवें ॥
आहार व्यवहार स्वभावें ॥ भिन्न फलती ॥ १५६२ ॥

एवं माता पितरांपासूंन ॥ उपजावया ऐसें हे जन ॥
काये कैसें कवण ॥ कारण असे ॥ १५६३ ॥

**॥ कामेहैतुकम् ॥ ००० ॥**

ऐसे कव्हणी बोलेल ॥ तया हें उत्तर पावैल ॥
अहो कामहैतुक सकळ ॥ विश्व आहे ॥ १५६४ ॥

स्त्रीपुरुषाचा जो कामु ॥ तोचि हेतुरुपु उत्तमु ॥
हो यावया वीर्यांचा संगमु ॥ कारण जो ॥ १५६५ ॥

**॥अन्यक्तिं ॥ (अन्यत्किं) ॥ ००० ॥**

ययावेगळें आणिक ॥ प्रत्यक्ष कारण येक ॥
तें काय असे मूर्ख ॥ ऐसें बोलती ॥ १५६६ ॥

ईश्वरु अथवा प्राचीन ॥ हें नमने जयां प्रमाण ॥
प्रत्यक्ष तेंचि वांचून ॥ येर नमने तयां ॥ १५६७ ॥

प्राचीन आणि ईश्वरु ॥ हा पदार्थु साचारु ॥
केवळ अनुमान गोचरु ॥ मिथ्या जाणावा ॥ १५६८ ॥

मांर्गी जातां पांथु ॥ पाहातां दिसे दुरुनि स्वस्थु ॥
तेथें उभा आहे तटस्थु ॥ हा अनुमानु जैसा ॥ १५६९ ॥

अनुमानें कल्पिलें जळ ॥ तंवं तें प्रत्यक्ष मृगजळ ॥
शुक्ति देखोनि केवळ ॥ रजत म्हणिजे ॥ १५७० ॥

एवं प्रत्यक्षाहूंनि अनारिसा ॥ अनुमानु होये भले तैसा ॥
म्हणौनि धरुं नये भरवसा ॥ सत्य तयाचा ॥ १५७१ ॥

शब्दाचे मानावें प्रमाण ॥ केवळ आप्तांचे वचन ॥
तरि आधीं तयाचें आप्तपण ॥ कैसें वोळखावे ॥ १५७२ ॥

येक असोनि अन्यथा सांगे ॥ अनुभवितां प्रत्यक्ष नलगे ॥
तयाचें आप्तपण येणें जगे ॥ कैसें मानावें ॥ १५७३ ॥

सर्व ब्रह्म ऐसें वचन ॥ येकांचे घेववी उपसमदर्शन
तयाही वरी ॥ १५७४ ॥

सर्व खल्विदं ब्रह्म ॥ द्वासुपर्णा ॥ न हिंसेत्सर्वाणि भूतानि ॥
यज्ञसोमियं पशुमालभेत्तू ॥ नेति नेति ॥ सत्येसर्वप्रतिष्ठितं ॥
सन्यास योग तू यज्ञो वैविष्णुः ॥ प्रज्ञाप्रतिष्ठा प्रज्ञानंब्रह्म ॥
यतोवाचो निवर्त्तते ॥

ऐसीं विरुध्देंही वचने ॥ कवण प्रमाण मानणें ॥
येथें पूर्वपक्षु सिद्धांत करणें ॥ आपुलिया मती ॥ १५७५ ॥

तरि ऐसें करितां शास्त्रे जाली ॥ ती परस्परा भांडोंचि लागलीं ॥
अद्यापि नाहीं उमजलीं ॥ मानावें कवणाचें ॥ १५७६ ॥

उपमा न बोलावें कांही ॥ तरि प्रत्यक्षेंवीण तें कायी ॥
कवणा कैसें म्हणिजे तै ॥ काये दावावें ॥ १५७७ ॥

प्रत्यक्षेवीण उपमेय ॥ उपमान नव्हे ज्ञेय ॥
बोधु बोधकु तेथ काये ॥ बोध्य बोधे ॥ १५७८ ॥

अश्वाचिया सिंगा ऐसें ॥ खपूष्प वाटोळें असे ॥
वंध्यजु सांगे तया पुसे ॥ नपुंसक सुत्तु ॥ १५७९ ॥

तैसे प्रत्यक्षते वांचूंन ॥ उडालें न सुधे उपमान ॥
यालागि प्रत्यक्ष तेंचि प्रमाण ॥ येरि वृथा कल्पना ॥ १५८० ॥

असो प्राचीन कारण पिंडातें ॥ तरि अशंका हेचि येथे ॥
जें पापापुण्यां या दोहींतें ॥ येकत्व नसे ॥ १५८१ ॥

प्राची नें धरिलें स्थूळ ॥ तें तंव येकचि केवळ ॥
तेथ भोगा आलें निर्मळ ॥ शुभशुभ फळेंसीं ॥ १५८२ ॥

पापदेहें तें न भोगावे ॥ पुण्य देहेंचि पाहिजे भोगावें ॥
यालागि शुभ अनुभवावें ॥ शुभेंचि करुंनि ॥ १५८३ ॥

तरि शुभाचें फळ भोगितां ॥ तो भोगु तुटे अवचिता ॥
तेथें अशुभ फल तत्वता ॥ भोगासि ये ॥ १५८४ ॥

तरि दुष्टाचें तें देह नव्हे ॥ तेणें दुष्ट भोगु तया न संभवे ॥
यये अर्थी पावे ॥ कवण उत्तर ॥ १५८५ ॥

पुण्यफल सरलें म्हणती ॥ उरलें पापफळ भोगाप्रति ॥
तरि तें देहचि पुडती ॥ नवें उपजावें ॥ १५८६ ॥

म्हणती पापपुण्य हो समान ॥ परि तया नाही येकपण ॥
यालागि हो आवेंचि देहपतन ॥ पुण्यांशु सरता ॥ १५८७ ॥

आतां पापापुण्या नाही भेदु ॥ देह येकत्वें ऐक्यवादु ॥
तरि विपरित भोगुसिद्धु ॥ न व्हावा तो ॥ १५८८ ॥

जाणेंमरणें येकवाटतें ॥ सुखदुःख येकचि होतें ॥
लक्ष्मी अलक्ष्मी सांगातें ॥ ऐसेंचि भोगा यावें ॥ १५८९ ॥

पापापुण्या येकपण ॥ तै भोग दोहींचे कां भिन्न ॥
तीं वेगळीं तै आन ॥ असावे देहाभास ॥ १५९० ॥

असो प्राचीनचि जै साचार ॥ तै लटिक हें प्रवृत्तिशास्त्र ॥
प्रायश्चित दंड व्यवहार ॥ आचार खोटे ॥ १५९१ ॥

वेव्हार तैसें होइल ॥ प्रेत्नु मिथ्यासकळ ॥
तै कर्म उपासना केवळ ॥ तुमचेंचि मत ॥ १५९२ ॥

कवणु कवणें मारिला ॥ आणि ययाचेनि तो कां मेला ॥
असो तो भोगु आला ॥ ते प्रायश्चित काये ॥ १५९३ ॥

कर्म पूर्वील आनवारु ॥ तेणें भोगु आणि व्यापारु ॥
ते सारावें की धर्मशास्त्रु ॥ आड करावें ॥ १५९४ ॥

मना आवडें तें करावें ॥ भोगा आले तें भोगावें ॥
पापपुण्य तेणें नव्हे ॥ पशुचि या ऐसें ॥ १५९५ ॥

सर्वही प्राचीन होतें ॥ तै प्रेत्न कोठे नसते ॥
तै भोगे सरतें पडतें ॥ शरीर तें ॥ १५९६ ॥

तै पुडती कां शरीर ॥ अता असो हे उत्तर ॥
कल्पितचि प्राचीन समग्र ॥ दिसे तें खरें ॥ १५९७ ॥

डोळा पाहाणें कवण प्राचीन ॥ श्रोत्रांचा ठांइं श्रवण ॥
हे सहज स्वभाविक गुण ॥ वर्तती व्यापारी ॥ १५९८ ॥

चरणु तो कां चाले ॥ वाचा ते कां बोले ॥
तया प्राचीन नियमिलें ॥ कव्हणी काये ॥ १५९९ ॥

करीं कां नेणावा रसु ॥ रसने तें तयाचा सोसु ॥
एवं जयाचा जो गुणदोषु ॥ तो तया आंगी ॥ १६०० ॥

पृथ्वी कां सांग कठीण ॥ उष्णा तेजा कवण प्राचिन ॥
वायो चंचळ जीवन ॥ तैसें नव्हे ॥ १६०१ ॥

ऐसें स्थूळ आणि सूक्ष्मु दोन्ही ॥ वर्त्तता असतां निजगुणी ॥
येकत्र जंवं मिळणी ॥ पिंडा प्राणाची ॥ १६०२ ॥

तंवं निपजे व्यापारु ॥ तें कर्म पाहातांचि होये अकर्म ॥
नुरे पूर्वकृताचें रुपनाम पाहा तयाप्रति ॥ १६०३ ॥

रोकडें जे साचार नव्हे ॥ तें देहाती सत्य संभवे ॥
ऐसें आप्तवचन नव्हे ॥ घातकांचे ॥ १६०४ ॥

देही अथवा अदेहीं ॥ प्राचीन असे तें दावा कांहीं ॥
अनुभउ तोचि जयाचा नाहीं ॥ तें काये साचार ॥ १६०५ ॥

म्हणौनि देहोचि आपणु साकारु ॥ पांच भौतिकु आकारु विकारु ॥
प्रकारु व्यवहारु विस्तारु ॥ यये चराचरी ॥ १६०६ ॥

पांचही यें विलया जाती ॥ पांचां ठांइं मिळती ॥
कारणें पांचही असती ॥ नसे तो आपणु ॥ १६०७ ॥

तेथें शून्यता ते कायी ॥ मा पुडती संचरे अन्य देही ॥
अभासे तेंचि तैसें नाहीं ॥ ऐसें असतां ॥ १६०८ ॥

कवणा पाप कवणी पुण्य ॥ देहांती देह अन्य ॥ ऐसे जाणणें ॥
तें नैपुण्य ॥ आसुर म्हणती ॥ १६०९ ॥

**श्लोक**

एतां दृष्टिवष्टभ्य नष्टात्मानो ऽल्प बुद्धयः ।
प्रभवन्त्युग्रकमणिः क्षयाय जगतो ऽ हिताः ॥ ९ ॥

**॥ एतांदृष्टिं ॥ ००० ॥**

ऐसी कुयुक्ती प्रकाशली ॥ कुडी दृष्टी जाण वहिली ॥
यये प्रत्यक्षींचि सरकली ॥ नेणे ययापरी ॥ १६१० ॥

पापपुण्य तें न निहाळे ॥ वेदशास्त्र पक्षा न मिळे ॥
सत्व प्रकाशें नु चेल ॥ ऐसिये दृष्टीतें ॥ १६११ ॥

॥ अवष्टभ्य ॥ ००० ॥

अवलंबूनिया अन्यादरें ॥ कामक्रोध माजविती भरें ॥
मग तयाचेनि संचारे ॥ कैसे होती ॥ १६१२ ॥

॥ नष्टात्मानः ॥ ००० ॥

नाशलियां स्वभावांचे ॥ विटाळलया मनाचे ॥
चुकलिये बुद्धीचे ॥ देहांचे भ्रष्टां ॥ १६१३ ॥

॥ अल्पबुद्धयः ॥ ००० ॥

प्रत्यक्ष मानिती प्रमाण ॥ जयाची बुद्धिसाधारण ॥
चुकली आपुलें स्थान ॥ तऱ्हीं परंतु ॥ १६१४ ॥

जयांचिये वीरा मती ॥ पुढें मागें पैसुचि नाथी ॥
प्रत्यक्षाया देहाचि पुरती ॥ जयाची प्रज्ञा ॥ १६१५ ॥

असों भूतें भूती जालीं ॥ तरि पृथ्वी हे कवणें केली ॥
जयांचीं अन्ने निपजलीं ॥ तीं धान्ये कैंची ॥ १६१६ ॥

कवणें केलें हे जीवन ॥ वायो तेज गगन ॥
काळी मेघांचे वर्षण ॥ कवणापासाव ॥ १६१७ ॥

कवण बीज या देहांचे ॥ सृष्टीपूर्वी काये होतें ॥
माता पितरें ते तेथे ॥ तीं कवणें होती ॥ १६१८ ॥

यापरि पुढें मागें नेणती ॥ आपणही आपणाप्रति ॥
देहाचि पुरती युक्ति ॥ स्वयुक्ती चाळिती ॥ १६१९ ॥

आपुलेनि आग्रह बळें ॥ नाइकती कव्हणाचें सिकविलें ॥
तयां आंगी सामार्थ्य उपजलें ॥ मात्र ते कैसे ॥ १६२० ॥

॥ उग्रकर्माणः ॥ ००० ॥

परपीडाचि करुं प्रवर्तति ॥ अपराधेंवीण येकां दंडिति ॥
कौतुकेंचि मनुष्य मारीती ॥ पापरुप ॥ १६२१ ॥

पापपुण्य भयें सुलटे ॥ वरि काम क्रोधें पुष्ट जाले ॥
करुणा मात्र कवणें कालें ॥ नुपजे ज्या हृदयी ॥ १६२२ ॥

द्रोहो करितां नाही ॥ परती हिंसा म्हणिजे तयां रीति ॥
परपीडेने विश्रांति ॥ वाटे जयां ॥ १६२३ ॥

हिंसा पाहिजे भोजनी ॥ हिंसा बैसली आसनी ॥
जीव वधुंनि सांडणी ॥ उगीचि करिती ॥ १६२४ ॥

व्यवहारीं प्रवर्तणें ॥ तैसा जेथें अप्रमीतु द्रोहो ॥
हिंसा विनोदें ॥ विटंबिती पुरुषा सात्विकांते ॥ १६२५ ॥

देवांचा करणे भेदु ॥ वेदाशास्त्रांचा उच्छेदु ॥
कर्मठा देउनि बाधु ॥ क्रिया सांडविती ॥ १६२६ ॥

बळे करविती अनाचार ॥ पाळिती बळे तस्कर ॥
दिवसाचि घेती घर ॥ आत्मस्वार्थी ॥ १६२७ ॥

श्वानें आपारें पोषुनि ॥ जीव मारविती दाटूंनि ॥
व्याघ्रापुढे बांधोनि ॥ गाये घालिती ॥ १६२८ ॥

घेतलें तयाचे निश्चयेंसी ॥ देणें नाहिचि वासना ऐसी ॥
मागे तो वैरी प्राणासि ॥ आपुलया भुके ॥ १६२९ ॥

येकांतें विष चालविती ॥ येकांतें जाळोंनि मारिती ॥
आहारावरुंनि उठविती ॥ सात्विकांते ॥ १६३० ॥

शस्त्रेंचि हाणणें हा स्वभाउँ ॥ हरणें परवित्त वृत्ति ठाउँ ॥
सूत्रु न बळयुक्ति उपाउँ ॥ परदारा हरिती ॥ १६३१ ॥

तप तें करुं प्रवर्त्तले ॥ तरि तेणेंचि देहें पाहिजे साधलें ॥
पुढें जन्मु नाहीं स्थूळें ॥ येणेंचि संसारु ॥ १६३२ ॥

तरि मद्यमांसे नैवेद्य ॥ कां बळि देउंनी कांही साध्य ॥
स्वदेह करुंनि बाध्य ॥ मांस काढिती ॥ १६३३ ॥

मांसे देवा पुजणें ॥ रक्ताचे सडे घालणें ॥
पाठी सुरी घालणें ॥ छेदणे शिर ॥ १६३४ ॥

होमी वोहर मारावें ॥ कां जितचि कुंडीं टाकावें ॥
पोटिचें लेकरुं वधावे ॥ ऐसी क्रिया ॥ १६३५ ॥

वोखतिया भुयिगळ ॥ उपवास कोरडे केवळ ॥
मुख सविती चांडाळ ॥ चालती अग्नीवरि ॥ १६३६ ॥

मळमूत्रचि भक्षिती ॥ आपपर पीडा करिती ॥
विधु नव्हे तैसी आचरती ॥ घोरें कर्मे ॥ १६३७ ॥

॥ अहिताः ॥ ००० ॥

आपुलें परावें अहित ॥ तेंचि तप साधन जयां उचित ॥
तेणे फळ पावती तद्वत ॥ संशयो नाहीं ॥ १६३८ ॥

इंद्र वारणीचें बीज पेरिलें ॥ तेथें झाडतें तैसेंचि उपजे ॥
सेवटी फल पाका आलें ॥ तद्वत तेहीं ॥ १६३९ ॥

तैसी आत्मपीडा परपीडा ॥ करुंनि बाधा उदंडा ॥
तया साधिलें पुढां ॥ तैसेंचि फल ॥ १६४० ॥

परावया अहित चिंतणे ॥ परहितें आत्महित जोडणें ॥
तपसामर्थ्ये पैं तेणें ॥ अहित सर्व ॥ १६४१ ॥

एवं स्वपर अहित कर्ते ॥ तेणेंचि देहें फळ पावतें ॥
अर्जुना दुःकृतें तीं दुःकृतें ॥ सुकृतें न होति ॥ १६४२ ॥

दुजयांचे हित तें स्वहित ॥ अहित तैसेंचि आत्महित ॥
म्हणौनि तापसी परपीडावंत ॥ ते आत्मघातकी ॥ १६४३ ॥

नाना असो ये लोकाचारी ॥ पराहित जो विचारी ॥
तयाचाचि घातु समग्री ॥ की जतु असे ॥ १६४४ ॥

व्याघ्र स्नान श्वापद ॥ सर्प वृश्चिक नानाविध ॥
अग्निद आणि करद ॥ आदिकरुंनि ॥ १६४५ ॥

शस्त्रघातकी तस्कर ॥ फोडिती दिवसाचे घर ॥
वित्त नेती समग्र ॥ परायावयांचे ॥ १६४६ ॥

येकाचिया धरुंनि नेती ॥ वनिता बळेंचि भोगिती ॥
क्षेत्रवृत्ति भूमि हरिती ॥ ऐसे जे पीडक ॥ १६४७ ॥

समस्तीं तया तें मारितां ॥ पाप नाहीं परि पुण्य सर्वथा ॥
सृष्टीची उतरे व्यथा ॥ तेणें करुंनिं ॥ १६४८ ॥

देवी ध्यावया अवतरण ॥ हेचि आथी कारण ॥
तयाचें अहित तें साधन ॥ मज सर्वोत्तमाचें ॥ १६४९ ॥

तयाचें अहित सुभटा ॥ तेंचि तप तेचि निष्ठा ॥
स्वधर्म प्रतिष्ठा ॥ पुण्य नेतें ॥ १६५० ॥

यापरी परावें अहित ॥ तें जयाचां धर्मीविहित ॥
तयाचेनि अहितें सुकृत ॥ समस्तांसि ॥ १६५१ ॥

ययालागि तो परहिती ॥ जनु आसुरु आत्महितीं ॥
वर्ते म्हणौनि वीरपती ॥ तयाचे नाम ॥ १६५२ ॥

अहित ऐसें जाणावे ॥ जाणोंनि सुखें पाचारावें ॥
स्वपर वैरी ते मारावे ॥ आसुरजन ॥ १६५३ ॥

**॥ जगतः क्षयाय प्रसवंति ॥ ००० ॥**

तें कां उपजले म्हणसी ॥ वांचले कां पां हृषीकेशी ॥
तरि यया जगाचि क्षयासि ॥ संभवले गा ॥ १६५४ ॥

सर्प असोंनि ये ये क्षिती ॥ तेहीं उपकारु कवणु आथी ॥
व्याघ्र काये दुभती ॥ सांग पां गा ॥ १६५५ ॥

तैसी ययांची जे याति ॥ ते लोकक्षयार्थाचि जाण निरुपती ॥
प्रयोजनु नाही पुडती ॥ आसुरांचा ॥ १६५६ ॥

जळो गा तयांचा आचारु ॥ जळो जळो आसुरांचा विचारु ॥
जेथे अविविधु उपकारु ॥ विधुपर पीडा ॥ १६५७ ॥

आतां ते धर्मविचार ॥ कैसे तयांचें आचार ॥
तें निरोपण समग्र ॥ आइक पुडती ॥ १६५८ ॥

**श्लोक**

काममाश्रित्य दुष्पुरं दम्भमानमदान्विताः ।
मोहाद् गृहीत्वा ऽ सद्ग्राहान्प्रवर्तन्ते ऽ शुचिव्रताः ॥ १० ॥

**॥ --- तटी दंभमानमदान्विताः ॥ ००० ॥**

दंभादि आसुर भाव ॥ मागांचि सांगितलें सर्व ॥
तयांमाजि नित्य धृव ॥ ती नि श्रेष्ठ ॥ १६५९ ॥

सांगु अथवा व्यंगु करणें ॥ परि लोकीं धर्मु मिरवणें ॥
ऐसा तो दंभु पूर्वी निरोपणें ॥ सांगु जाणावा ॥ १६६० ॥

अभिमानाचिनि बहुपणें ॥ आपण आपणातें मानणें ॥
ती मागा मानीत्व लक्षणें ॥ सांगीतली मानाचीं ॥ १६६१ ॥

तिसरा विख्यातु जगीं ॥ मदु तो ययांचा संगी ॥
नित्य असणें आंगीं ॥ जया दुष्टाते ॥ १६६२ ॥

विष भक्षिलियां भ्रमु वाढे ॥ नाना मद्य घेतलियां जैसें चढे ॥
विद्या जाचियां पुढें ॥ तैसा जो उठी ॥ १६६३ ॥

अपार विद्या जया होये ॥ मग दुजयाकडे तो न पाहे ॥
आपुलेनि गर्वे ताठा होये ॥ तो नेदी लवों ॥ १६६४ ॥

कां द्रव्यजाल यां बहुसाल ॥ माते मानव केवळ ॥
ते परावें भाग्य सकळ ॥ दृष्टी नाणी ॥ १६६५ ॥

पदाची जालियां प्राप्ती ॥ मदाची होये समुत्पत्ति ॥
विसरु पडे पूर्वस्थिती ॥ चढे गर्व ॥ १६६६ ॥

ऐसें जें जें कांही वस्तुजात ॥ ते चढे मद्यापरी समस्त ॥
आतां आसुरांचें मत ॥ तें अनारिसेंचि ॥ १६६७ ॥

कांहीं विद्या ना कांहीं अर्थु ॥ उगाचि गर्वु अत्यंतु ॥
अर्जुना मदु तो व्यर्थु ॥ आसुरांचा ॥ १६६८ ॥

एवं दंभु मानु मदु तिन्ही ॥ नित्ययुक्त जे थेहीं करुंनि ॥
ते आसुर गा धनुःपाणी ॥ पुडती कैसे ॥ १६६९ ॥

॥ अशुचिव्रताः ॥ ००० ॥

जयातें प्रवृत्ति आणि निवृत्ति ॥ यये अंर्थी ज्ञानचि नाथी ॥
धर्माधर्मज्ञाची संगति ॥ साधेचि ॥ १६७० ॥

काये करावें न करावे ॥ नेणती विधिनिशेध बरवे ॥
मग आपुनीचि मने अघवे ॥ सिद्धांत करिती ॥ १६७१ ॥

शौचु तो जयां अशौचु ॥ असत्यवादाचा निर्वंचु ॥
अनाचारु तो साचु ॥ आचारु जयां ॥ १६७२ ॥

तेही केलें जें स्वमत ॥ तदनुकुळ नियमव्रत ॥
ते अपवित्र गा समस्त ॥ शास्त्र बाहियांचें ॥ १६७३ ॥

वैदिक मंत्रविहिन ॥ करिती भूतांचें यजन ॥
अकाळीं होऊंनि नग्न ॥ निंबु नेसती ॥ १६७४ ॥

मद्यमांस पूजा द्रव्य ॥ असेव्य करिती सेव्य ॥
मानिती तेंचि दिव्य ॥ महाव्रत ॥ १६७५ ॥

स्वमत जाणोंनि प्रवीण ॥ येक करिती होमहवन ॥
तेथें हव्यांद्रव्यांवाचून ॥ योग करिती ॥ १६७६ ॥

रायी भिल्लादि जाती फळें ॥ उन्मादकें द्रव्यें सकळें ॥
हविति आकाळ मेळउंनि अकालें ॥ देती अवदान ॥ १६७७ ॥

मध होम मांसहोम ॥ करिती अवघें विकर्म ॥
सकळही वैदिक धर्म ॥ सांडिले सर्वदा ॥ १६७८ ॥

अविधाने करिती पूजन ॥ स्वपर काया बंधन ॥
हिंसा पाप गहन ॥ तो विधु जेथें ॥ १६७९ ॥

अशूच तयांचे व्रत ॥ अशूच अशूचांचे मत ॥
अशूच नियम समस्त ॥ जया आसुरांचे ॥ १६८० ॥

**॥ प्रवर्तन्ते ॥ ००० ॥**

अशूंचे मार्गें प्रवर्त्तले ॥ वैदिकां धर्मी सुटले ॥
क्रियाकर्म आपुलालें ॥ करुंचि लागले जन ॥ १६८१ ॥

येक वेदोक्त प्रवर्त्तती ॥ येक आगम पूजा पद्धती ॥
येक दोही वेगळें साधिती ॥ साध्य कांहीं ॥ १६८२ ॥

येक ते देती बळी ॥ येक बंधन करिती स्थुळीं ॥
देह घालिती अंत्राळीं ॥ कडां येक ॥ १६८३ ॥

धरणें पारणें उपवास ॥ अयुक्त करिती आयास ॥
विसरले स्नानासंध्येस ॥ पुरुष ऐसे ॥ १६८४ ॥

येक घालिती अग्नीवरि ॥ येक ते विजांगा ते सुरी ॥
येक शीतोष्ण शरीरीं ॥ उगेंचि साहाति ॥ १६८५ ॥

इंद्रिय बंधन करुंनि हटें ॥ सेविली येकीं कपाटें ॥
येकी पाडिले वोखटें ॥ देवाचि वरि ॥ १६८६ ॥

येकीं वेदोक्तही सांडिला ॥ हिंसा धर्मु आपुला ॥
वेगळाचि आचारु कल्पिला ॥ आसुरी जनी ॥ १६८७ ॥

ऐसें प्रवर्त्तले साधनी ॥ अशूचव्रत धनुःपाणी ॥
दंभादर्पामदा मिळोनि ॥ सार्वकाळ ॥ १६८८ ॥

पापरुप परि ऊग्र ॥ तप करिती भयंकर ॥
तें काये आश्रयुनि हे उत्तर ॥ जरि तूं पुससील ॥ १६८९ ॥

॥ कामं ॥ ००० ॥

तरि सांगैन आइकें अर्जुना ॥ कामु म्हणिजे कामना ॥
साधूंतें वैरी जुना ॥ कैसा पुडती ॥ १६९० ॥

॥ दुःपुरं ॥ ००० ॥ (गीतेमध्ये दुष्पुरं असा शब्द आहे.)

जो कामु पावला क्षुधीतु ॥ तया आहारु दे कवणु समर्थु ॥
साताही सागरी शांतु ॥ जो नव्हे क्षणुभरी ॥ १६९१ ॥

द्रव्य न पुरे कुबेराचें ॥ न पुरे धान्य पृथ्वीचें ॥
उदक आवरणोदकांचें ॥ तेणे न धाये ॥ १६९२ ॥

मेरु समान सुवर्णराशी ॥ केलियां त्रुप्ति नाहीं जयासी ॥
जो घेऊंनिहीं प्राणासि ॥ कृष्णमुख न करी ॥ १६९३ ॥

इंद्रपदें हा धायिला ॥ तरि इं कां कीं करु होईल ॥
विष अमृत प्राशील ॥ न धाये परि ॥ १६९४ ॥

जीवाचा सखा सहजु ॥ येणे धरिलां होये माजु ॥
तरि न पडे जीवा उमजु ॥ ऐसें करी ॥ १६९५ ॥

ख्याती लाविली देवांते ॥ वन सेवविलें साधूंतें ॥
आरोह पतित येकांतें ॥ केलें कामें ॥ १६९६ ॥

सांडविले वर्ण आश्रम ॥ देश नगरे पुरें ग्राम ॥
देह प्राण मोक्षधर्म ॥ सांडविलें कामे ॥ १६९७ ॥

ययातें पुरवावया जे गेले ॥ ते सर्वस्वे दुःखी जाले ॥
मग आपणचि ग्रासी पडले ॥ न सुटतीची ॥ १६९८ ॥

कामारेतुं दुःपूरा ॥ मुळीं लागलासि ईश्वरा ॥
आणिलें अविद्येचिया द्वारा ॥ अझुणी न सोडिसी ॥ १६९९ ॥

कामाचा वाहाती दचकु ॥ अनेकां वरि कामु येकु ॥
नाहीं ऐसा विवेकु ॥ जो अंतु पावे ॥ १७०० ॥

कामे केलें सृजन ॥ कामे व्यापिलें हें जन ॥
कामाचें दुःपूर लक्षण ॥ पावका ऐसे ॥ १७०१ ॥

कामु संहारी विश्वातें ॥ पाळी कामु यया सर्वातें ॥
कामु न सुटे देवातें ॥ हरिहरादिका ॥ १७०२ ॥

'योणेसी कामाची थोरी ॥ परि हा आश्रितातें मारी ॥
आणि बांधे पदरीं ॥ तो आपणुंचि जळे ॥ १७०३ ॥

पाहे लय याचा कौतुकें ॥ तो नाशैल त्याचेनि विवेकें ॥
आगीं असे तें न देखें ॥ भ्रांतु होये ॥ १७०४ ॥

ऐसा कामु दुःपुरु ॥ केवळ विषाचा सागरु ॥
ऐसिया कामातें आसुरु ॥ जनु तो अर्जुना ॥ १७०५ ॥

॥ आश्रित्य ॥ ००० ॥

आश्रयुनि असे प्रवर्त्तला ॥ कामातें पुरऊ लागला ॥
मग काये धरिता जाला ॥ येणें कामे ॥ १७०६ ॥

॥ असद्‌ग्राहान् गृहित्वा ॥ ००० ॥

तरि सत्य न होती ते असत ॥ ग्राह्य जे कामित पदार्थ ॥
ते हृदयीं धरुंनि चित्त ॥ साधनी प्रवर्तविलें ॥ १७०७ ॥

मातें सांपडो चिंतामणी ॥ कामधेनु यावी अंगणी ॥
कल्पवृक्षांची लावणी ॥ करीन मी ॥ १७०८ ॥

पूत्रयीं मीचि ईश्वरु ॥ होआवा ऐसा प्रकारु ॥
वैरी ना मित्रु इतरु ॥ नसावा मातें ॥ १७०९ ॥

माझी आज्ञा चराचरीं ॥ मज अधारभूत ग्राम च्यान्ही ॥
आत्तां इतुलें नाहीं तरि ॥ येक हो कां ॥ १७१० ॥

सांपडावा निक्षेपु ऐसा ॥ जो पारितां न सरे सहसा ॥
इतुलेंनि मी आपैसा ॥ होईन चक्रवर्ती ॥ १७११ ॥

असंख्यु माझा परिवारु ॥ मातें म्हणती नरेंद्रु ॥
कामाचा ऐसा बडिवारु ॥ कल्पना उठवी ॥ १७१२ ॥

न सांपडे तै असो निधि ॥ होतु मातें महासिद्धी ॥
मग बैसेंन उच्चेपदी ॥ रायाहून ॥ १७१३ ॥

गगन मार्गें जाणे येणें ॥ देवांसीं चर्चा करणें ॥
भूता जाता न दिसणें ॥ भाग्येवीण ॥ १७१४ ॥

शब्देंचि मेलें उठवावें ॥ शब्देंचि अमरही मारावें ॥
ऐसें होये तरि बरवें ॥ शरीरें येणें ॥ १७१५ ॥

हे नाहीं तरि आन ॥ साधावें जारण मारण ॥
मौन स्तंमभन वशीकर्ण ॥ देहें येणें ॥ १७१६ ॥

उच्चाटण प्रध्वंसीकरण ॥ येणे भूतांमाजि श्रेष्टपण ॥
येईल सत्य म्हणौन ॥ आचरे क्रिया ॥ १७१७ ॥

व्यापारु तऱ्हीं थोरु होआवा ॥ उत्तमु तऱ्हीं लागावा ॥
मानु मातेंचि यावा ॥ वडिलकीचा ॥ १७१८ ॥

अपार होआवें संतान ॥ न मरावें माझें स्वजन ॥
स्त्रीसैंहीत मरण ॥ नसावें मातें ॥ १७१९ ॥

आता कृषि तऱ्हीं तें पिको ॥ माझा शब्द श्रेष्ठु आइको ॥
इतुलेंहीं कल्पुं नको ॥ तरि काये करावें ॥ १७२० ॥

घोडियाला गोघोडी ॥ जुनी मिळो पासोडी ॥
मुखीं नाहीं पान फोडी ॥ तरि मिळो तीळ वोवां ॥ १७२१ ॥

ऐसें नाना पदार्थ वीरा ॥ आभिलाषी कल्पनेद्वारा ॥
फुटकु कवडा दोरा ॥ खापर चिंधी ॥ १७२२ ॥

सकळही भान असंत ॥ स्वप्न नाना मृगजळवंत ॥
तेथें घालूंनि चित्त ॥ प्रेत्नु करिती ॥ १७२३ ॥

यापरि कामु तो आश्रयुंनि ॥ असंत पदार्थ धरुंनि ॥
प्रवर्तले असुर साधनी ॥ हें का म्हणसील ॥ १७२४ ॥

॥ मोहात् ॥ ००० ॥

तरि नेणोंनि आपणातें ॥ आणि आत्मदृष्टी या सर्वांतें ॥
प्रपंचु देखती अज्ञान मतें ॥ तोचि आपेक्षिती ॥ १७२५ ॥

स्वप्नीची राणीव देखिली ॥ तेथें आसक्त बुद्धि जाली ॥
पावलीही लोटिली ॥ तेहीं पुरुषीं ॥ १७२६ ॥

शास्त्रही नाहीं कळलें ॥ आणि ममत्व अहंत्व आगळें ॥
तया संसारु हा सत्य कळे ॥ तै सुटिका कैंची ॥ १७२७ ॥

प्रेत्नें वाढे आयुष्य ॥ प्रेत्ने बहुसाल भविष्य ॥
तरि प्रेत्न करावे अवश्य ॥ तद्विषयिचे ॥ १७२८ ॥

मरणाचि मोक्षु साचारु ॥ आतां खंडला कीं येकु विचारु ॥
काये बोले असुरु ॥ पांडवा तो ॥ १७२९ ॥

निमिष तें कल्पांतु प्रळयो ॥ उन्मेषु कल्पादित्याचा क्षयो ॥
निद्रा म्हणिजे महाप्रळयो ॥ मरण तें मोक्षु ॥ १७३० ॥

अनंते ब्रह्मांडें हेचि पिंड ॥ अनंत दिसती उदंड ॥
ऐसीं करुंनि बडबड ॥ प्रवर्त्तले ते ॥ १७३१ ॥

भूतां अनादि नित्यपण ॥ अनित्य आभासे देह सगुण ॥
वर्ते जिणे आणि मरण ॥ ययाचांचि ठांइं ॥ १७३२ ॥

उदकीं तरंगु जाला ॥ पुडती तो तेथेंचे निमाला ॥
तैसा पांच भौतिकु रचला ॥ साकार देहो ॥ १७३३ ॥

हा निजकारणी सामावे ॥ पुडती कैचा कवणा फावे ॥
म्हणौनि भोगितांचि बरवें ॥ हें संसार दुःख ॥ १७३४ ॥

देह राखावें नाना यत्नी ॥ भोग भोगावे सुजाणी ॥
संसारु दुर्लभु मागुतोनि ॥ कैंचा म्हणती ॥ १७३५ ॥

सकळ पुरवावें काम ॥ रंजवावे मनोधर्म ॥
येथें वंचले ते अधम ॥ आत्मघातकी ॥ १७३६ ॥

भोगितां उरि नुरावी ॥ वासना सकळ पुरवावीं ॥
विहिता विहिती न गोवावी ॥ मनाची वृत्ति ॥ १७३७ ॥

ऐसे आत्मज्ञाने ब्रह्मज्ञाने ॥ वेदशास्त्रपुराणा ज्ञानें ॥
मोहें ममत्वे असाधारणें ॥ प्रवर्त्तले असतां ॥ १७३८ ॥

**श्लोक**

चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः ।
कामोपभोगपरमा एतवादिति निश्चिताः ॥ ११ ॥

**॥ चिंतां ॥ ००० ॥**

रात्रिदिवसु तेचि चिंता ॥ आराणूक नाहीं करितां ॥
तियेचिं तेचिं पार्था ॥ रुप कैंसें ॥ १७३९ ॥

**॥ अपरिमेयांच ॥ ००० ॥**

तरि चिंतें नाहीं प्रमाण ॥ निश्चये मानी वचन ॥
आणि चिंते ऐसें निर्वाण ॥ न करी दुजे ॥ १७४० ॥

प्रथम चिंता आपुली ॥ कुमार दशेची धाकुली ॥
देहाचांचि जन्मकाळीं ॥ आलीं सांघातें ॥ १७४१ ॥

ते आहार विषयीचि असतां ॥ शरीर सुखाची मात्र पार्था ॥
तो आहारु जाला वाढता ॥ तेही वाढो ॥ १७४२ ॥

अन्नपानाची जंवं जाली ॥ तंवं ते बाळ दशा क्रमली ॥
तारुण्यामाजि अंकुरली ॥ नानाविध ॥ १७४३ ॥

अन्नचिंत्ता उदकचिंत्ता ॥ वस्त्रचिंत्ता विद्याचिंत्ता ॥
पांचांही विषयांची चिंत्ता ॥ होती जाली ॥ १७४४ ॥

जे जे पदार्थ निर्माण ॥ तेथें तेथें तिचें प्रवर्त्तन ॥
त्यामाजि स्त्री चिंत्ता गहन ॥ ते झोंबोनि पडिली ॥ १७४५ ॥

मग आत्मचिंता स्त्री चिंता ॥ सर्वांपक्षी सोषिता ॥
वरिपडली आश्रमचिंता ॥ ते अनिवार गा ॥ १७४६ ॥

आश्रमाची चिंता कीजे ॥ तंवं कन्यापुत्रांची वाजे ॥
आतां निर्वाहो कैसा कीजे ॥ तितुलेयाचा ॥ १७४७ ॥

बहुतें पाहिजे अन्न ॥ वस्त्रसौख्य उपचार आन ॥
आतां इतुलेयाही कारण ॥ द्रव्य पाहिजे ॥ १७४८ ॥

तया द्रव्याकारणें काये करूं ॥ उद्यमु अथवा व्यापारु ॥
पाहों कवणाचा आधारू ॥ यये अर्थी ॥ १७४९ ॥

वणिज करितां मार्ग चिता ॥ वित्ताची यत्नें वागवितां ॥
राष्ट्रचिंता राजचिंता ॥ उपजोचि लागली ॥ १७५० ॥

स्वराज्याचे क्षेम पाहणें ॥ परराज्य चिंता करणें ॥
तयांचें पुरे उणें सोसणें ॥ दिवा रात्री ॥ १७५१ ॥

मेघांची चिंता ते सर्वत्र ॥ केलीचि पाहिजे अपार ॥
पृथ्वींचे पीक सफार ॥ देशांतरी कैसें ॥ १७५२ ॥

काष्टचिंता पाषाणचिंता ॥ त्रुणचि मृच्चिंता ॥
जळचिंता बळचिंता ॥ चिंता स्वपर जनाची ॥ १७५३ ॥

अश्वविक्रय कैसें होती ॥ देशी वस्त्रे आणि दुभतीं ॥
राजेराजे विरोधु करिती ॥ ते चिंता पडे ॥ १७५४ ॥

परराष्ट्र नु चलावें ॥ स्वराष्ट्र नाथें न मरावें ॥
परिवार पवित्र असावे ॥ नांदावे लोक ॥ १७५५ ॥

पावे तेथें तस्कर भय ॥ तै चित्ता भाजी हृदय ॥
तंवं आपणा आपुलियां आभय ॥ चालिले असतां ॥ १७५६ ॥

रोगचिंता अरोग्यचिंता ॥ भेजजचिंता मरणचिंता ॥
प्रेत्नचिंता पदार्थचिंता ॥ येउंनि पडे ॥ १७५७ ॥

दिवारात्रौ शयन ॥ न रुचे स्वादलें अन्न ॥
चिंत्ता ते हृदय फोडुंन ॥ बाहेरि निघे ॥ १७५८ ॥

इष्ट मित्र सोइरे ॥ चिंतिता तयांचे बरें ॥
देशुदेशांतरें नगरें ॥ नित्ये चिंतावी ॥ १७५९ ॥

ऐसी सकळां देशां पदार्थाची ॥ चिंता अपरमित स्वपरजनाची ॥
संख्या न करवे जीची ॥ अनिवार जे ॥ १७६० ॥

॥ प्रळयांता ॥ ०० ॥

कवणु काळ वरि ऐसी ॥ चिंता बाधी हे पुरुषासि ॥
म्हणसील तरि परियसी ॥ सांगीजैल ॥ १७६१ ॥

तरि प्रळयो तो जियेचा अंतु ॥ वृत्तिविल योगा विख्यातु ॥
आतांलयाचा परमसिध्दांतु ॥ करूंनि सांगैन ॥ १७६२ ॥

जागृति असे जंवं शरीरी ॥ तंवं चिंता न समाये देशांतरी ॥
झोंबे स्वप्नाची पदरी ॥ अपारें विस्तारें ॥ १७६३ ॥

तेथें पावतांचि सुषुप्ति ॥ अज्ञानी सामावे ज्ञानवृत्ति ॥
तैं ते चिंतेची शांती ॥ स्वभावें होये ॥ १७६४ ॥

म्हणौनि जागरू आणि स्वप्न ॥ हें अवस्छाद्वय इंचे स्थान ॥
इपासूंनि सुटलें अज्ञान ॥ सुषुप्ति अवस्छा ॥ १७६५ ॥

आतां चिंता निद्रिताचा स्छानी ॥ नांही जडे काष्ठी पाषाणी ॥
अंकुर उपजे ज्ञानी ॥ अज्ञानी दडपे ॥ १७६६ ॥

जिया अवस्छा साधन ॥ कर्मभक्ति वैराग्यज्ञान ॥
तेथेंचि चिंता नामे विघ्न ॥ आड जालें ॥ १७६७ ॥

आतां चिंते वेगळें होइजे ॥ तै अज्ञान डोही पडिजे ॥
तेणें अज्ञानें न सुटिजे ॥ संसारापासाव ॥ १७६८ ॥

पुडती जागृती येतां ॥ आंगेंसी जडली ये चिंता ॥
म्हणौनि निद्रा अंतु सर्वथा ॥ तिचा नव्हे ॥ १७६९ ॥

आतां जी जे तंवं हे करावी ॥ चिंता हृदयीं धरावी ॥
दुःखाची उकळी सोसावी ॥ दिवा रात्रौ ॥ १७७० ॥

मेलिया कव्हाचें कव्हणी नव्हे ॥ देहचि हें विनाशु पावे ॥
तै ते चिंता माळवे ॥ आप परावयांची ॥ १७७१ ॥

पूर्व देहीं परिग्रहो होता ॥ तो जावो आलाही मागुता ॥
नुपजे तयांची चिंता ॥ प्राणियांसि ॥ १७७२ ॥

यालागि चिंतेतें सांडावे ॥ तै आपण येकें मरावें ॥
मग काहींचि आपुलें नव्हे ॥ ऐसी निश्चिती ॥ १७७३ ॥

मरणा ऐसी धनंजया ॥ न हरे चिंता सामग्रिया ॥
म्हणौनि ईवेगळे असावया ॥ मरण साधावें ॥ १७७४ ॥

तंवं साधनानुकुळ जीणें ॥ परंतु मोक्षु नव्हे तेणें मरणे ॥
पुडती आहे उपजणें ॥ शाणियांसि ॥ १७७५ ॥

पुडती धरितांचि शरीरें ॥ चिंतेचे होती अंकुर ॥
जुनी गेली हे दृढ तर ॥ नवी चिंता ॥ १७७६ ॥

यालागि मरणही इचा अंतु ॥ करुं नये सिद्धांतु ॥
आतां महाप्रळयों कीं कल्पांतु ॥ अंतु चिंतेचा ॥ १७७७ ॥

तरि जो काळ वरिलयो असे ॥ तो काळ वरि हे नसे ॥
जीवासवेंचि प्रवेशे ॥ जीवाचां कारणी ॥ १७७८ ॥

मग उत्पत्तिची आदि पावतां ॥ जीउ गुणाध्यासें होये उपजता ॥
तै तें सवेंचि अंकुरे चिंता ॥ विस्तारु धरी ॥ १७७९ ॥

ऐसी ज्ञानाची लागली मुळीं ॥ अज्ञानी रुप न दावील पाली ॥
ते म्हणोनये निमाली ॥ नाशली चिंता ॥ १७८० ॥

आतां सर्वा विद्या छेदन ॥ सकळ माया संहरण ॥
होये या जीवातें मरण ॥ तै चिंता मरे ॥ १७८१ ॥

आतां तया कीरु उपाया ॥ आचरावी वैदिकी क्रिया ॥
तै सत्त्वशुद्धि जालियां ॥ उपजे ज्ञान ॥ १७८२ ।

ते विज्ञानसहित ज्ञान ॥ सर्वोपधि विनाशन ॥
जीवांचें केवळ मरण ॥ सत्य स्वरुपें ॥ १७८३ ॥

तोचि अंतु जियेचा ॥ अभेदु जीवा ब्रह्माचा ॥
आतां हा पक्षूचि नव्हे जयांचा ॥ तयां चिंता न सुटे ॥ १७८४ ॥

ऐसी अनादि अनंता चिंता ॥ आइकें मातु पांडुसुता ॥
आसुर जनु हा सर्वथा ॥ ऐसिये इतें ॥ १७८५ ॥

॥ अपाश्रिताः ॥ ००० ॥

आश्रयूनि प्रवर्तला असे ॥ आतां विश्रांति न पवे मानसें ॥
आराणूक नाहीं दिवसें ॥ रात्री कल्पें ॥ १७८६ ॥

हे काये होइल काये नव्हे ॥ काये करावें कैसें न करावें ॥
ऐसें सोषितां जीवें ॥ नाहीं उसंतु ॥ १७८७ ॥

अध्यासु पडिला पार्था ॥ यैकांतें परिग्रहोही नसतां ॥
आपपराची चिंता ॥ व्यर्थचि करिती ॥ १७८८ ॥

येकांची घरस्थिती सांगती ॥ ते आइकोनि येक क्षिति करिती ॥
पुढे चिंता वाढविती ॥ व्यर्थ चित्ते ॥ १७८९ ॥

देशांतरिचे वर्तमान ॥ पुसती सांगती आपण ॥
चिंतारुढ करिती मन ॥ वाउगेंचि ॥ १७९० ॥

राजकथा आइकोनि आदारें ॥ चिंता करिती पामरें ॥
ऐसा काळ प्रकारें ॥ तेणेंचि क्रमिती ॥ १७९१ ॥

तेंचि काळाचे क्षेपन ॥ तेणेंचि रंजविती मन ॥
नावडे शास्त्रपुराण ॥ उपयुक्त जें ॥ १७९२ ॥

पुराणी बैसले वीरपती ॥ तेथें तोचि निर्णयो करिती ॥
पैल मेला काये खाती ॥ तयाचीं पोष्यें ॥ १७९३ ॥

संध्यास्नानी तोंचि सदु ॥ भोजनी न निघे तो वादु ॥
तै चिंती नव्हे आनंदु ॥ न रुचे अन्न ॥ १७९४ ॥

आहारी व्यवहारीं व्यापारी ॥ नित्य नैमित्ती कें आचारी ॥
तें निद्रे माझारी ॥ स्वप्न देखती ॥ १७९५ ॥

ऐसी आश्रयीली चिंता ॥ सांडिली आसुरी सद्वार्ता ॥
तिणें रिकामा काळ सर्वथा ॥ नाहीं जयां ॥ १७९६ ॥

तया परमार्थु तो कायी ॥ ऐसें मानिसील जयी ॥
तै अर्जुना आइक यीं ॥ सांगिजैल ॥ १७९७ ॥

**॥ कामोपभोगपरमाः ॥ ००० ॥**

सकळ कामुं भोगावा ॥ हाचि पुरुषार्थु जोडावा ॥
इतुलाचि परमार्थु अघवा ॥ तया असुरांचा ॥ १७९८ ॥

कामीकु आचारु ते कर्म ॥ सकामु विचारु तें ज्ञानवर्म ॥
भोगप्राप्ती ते परम ॥ येणेंचि शरीरें ॥ १७९९ ॥

आपुला पुरे स्वार्थु ॥ त्यागावें सर्व परमार्थु ॥
मग तेणें हो परघातु ॥ पाप बाधा ॥ १८०० ॥

**॥ एतावदितिनिश्रिताः ॥ ००० ॥**

विषय भोगचि सर्व हित ॥ हें ऐसें जयांचे मत ॥
पांडुपुत्रा निश्चित ॥ हृदयीं बैसलें ॥ १८०१ ॥

देहो म्हणती उपजला ॥ तो ययाचिलागि रचला ॥
विषय भोगावे वेळोवेळां ॥ काये उपजणे असे ॥ १८०२ ॥

भोगिजे तितुलोंचि फावलें ॥ येराचें देह वांयां गेलें ॥
कर्मे विश्व चाळविलें ॥ वैदिकें येणें ॥ १८०३ ॥ (अ)

कर्म करी तो ठकलाचि ॥ भक्तु तो वायां गेलाचि ॥
विरक्तु मरे वांचि ॥ आपुलेनि गुणें ॥ १८०३ ॥ (ब)

ज्ञानवादी ते झकले ॥ संसार तयांचे वांयां गेलें ॥
विषयभोक्ते तेही जिंकीले ॥ फावलें तयां ॥ १८०४ ॥

अहो येसणी वयसा गेली ॥ परस्त्री नाही भोगिली ॥
धिग्य जननी व्याली ॥ ऐसिया पाषाणातें ॥ १८०५ ॥

परद्रव्य घालणें हातु ॥ हा कव्हणी येकु पुरुषार्थु ॥
येसणा पाहिजे कीं बळवंतु ॥ जो दिवसा खान् घे॥ १८०६ ॥

रसनाशिश्नयें दोन्ही ॥ प्राणु द्यावा यांचा पाळणी ॥
नातरि अपुरुषार्थें जीउनि ॥ काये काज ॥ १८०७ ॥

एवं सकळ कामु भोगावा ॥ हा परमार्थु पुरुषार्थु अघवा ॥
जयांचा ते पांडवा ॥ असुर कैसे ॥ १८०८ ॥

**श्लोक**

आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ।
ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसञ्चयान ॥ १२ ॥

**॥ आशापाशशतैर्बद्धाः ॥ ००० ॥**

आशालक्षण पाश जाण ॥ शतें तयांची संपूर्ण ॥
तेंहीं अनंती बंधन ॥ असुरातें ॥ १८०९ ॥

येके आशेचिया वृत्ती ॥ आशा अनंता होती ॥
तींही बाधले न सुटती ॥ ते असुर कैसे ॥ १८१० ॥

किरणी मानूंनि जीवन ॥ मृगीं आशा केली गहन ॥
तयांचि गेले प्राण ॥ तें वाॐ म्हणौनि ॥ १८११ ॥

तैसें मिथ्याभान सकळ ॥ हें स्वप्न किंवा मृगजळ ॥
येथें व्यर्थ भोगाशा केवळ ॥ प्राणियांसि ॥ १८१२ ॥

हा सोइरा मातें होइल ॥ संकटी काजा येइल ॥
आकांती मित्रु पावैल ॥ ऐसी आशा ॥ १८१३ ॥

का हें द्रव्य ठेवीन ॥ आलें दरिद्र जीं कैन ॥
अधिक सभाग्य होंइन ॥ ऐसी आशा ॥ १८१४ ॥

हें तप माझें फळैल ॥ येणे संपन्नता येईल ॥
ऐसी आशा दुर्बळ ॥ प्राणियाची ॥ १८१५ ॥

पैल तो वाढे कुमरु ॥ याचेनि आधारें संसारु ॥
मी निस्तरैन आशा तुरु ॥ ऐसें बोले ॥ १८१६ ॥

कां वंचूंनि स्वजनातें ॥ द्रव्य ठेवी परुतें ॥
अंती येइल काजा तें ॥ ऐसी वासना ॥ १८१७ ॥

येक जाले पराधीन ॥ सेवा करिती उत्तम वर्ण ॥
नीचांची आशा धरुंन ॥ असती प्रवर्तले ॥ १८१८ ॥

येकीं प्राण तेही विकिले ॥ आपण न होती आपुले ॥
द्रव्य आशया बांधले ॥ प्राणु देती ॥ १८१९ ॥

येक उद्यमे श्रमती ॥ उबगले हितीविहिती ॥
अपार आशा चित्तीं ॥ द्रव्याची तयां ॥ १८२० ॥

आशा येकातें पळवी ॥ पाठीं तयां येक लावी ॥
अर्जुना प्राण त्यागु करवी ॥ आशा हे कीं ॥ १८२१ ॥

आशावंत येक मेले ॥ तप करितां देह गेले ॥
येक पर्वतावरुंनि पडिले ॥ आशा धरुंनि ॥ १८२२ ॥

देवा गा मातें कांहीं ॥ ऐसें कार्पण्य वर्त्ते देहीं ॥
आशा न सुटे हृदयीं ॥ म्हणौनिया ॥ १८२३ ॥

येक साधिती कळंकु ॥ येक वोळगती मंडळीकु ॥
येकीं सांडिले विवेकु ॥ नग्न आचरती ॥ १८२४ ॥

येक अंजन पाहाती ॥ दीर्घ आशा वाढविती ॥
ठेवे काढुं अपेक्षिती ॥ आशावंत ॥ १८२५ ॥

वांकुडि करुंनि मान ॥ मुख पसरिती दीनवदन ॥
आशा करुंनि अन्न ॥ मागती ग्रासुभरी ॥ १८२६ ॥

येक ते जाले तस्कर ॥ सांडिले पवित्र आचार ॥
आशेनि हृदयीं घर ॥ केलें म्हणौनि ॥ १८२७ ॥

वेद वाखाणवी आशा ॥ शास्त्रपुराण पुरुषा ॥
धरवी येकां सिद्ध दशा ॥ जीवन्मुक्तता ॥ १८२८ ॥

दीनाहूंनि दीनपण ॥ आशा आणि कार्पण्य ॥
येकाचां द्वारी येकजण ॥ पाडी उपवासीं ॥ १८२९ ॥

येकु मारी येकु साहे ॥ आशाबळ ऐसें आहे ॥
ज्ञाताही धरी पाये पामराचें ॥ १८३० ॥

न पुसता नाम सांगवी ॥ न पुसता ज्ञान बोलवी ॥
न मागतां सेवा करवी ॥ ऐसी आशा ॥ १८३१ ॥

मरवो आशे निराशिणी ॥ अवधिया घातलें पाणी ॥
दुष्टे कवणाचां मातें आंगवणी ॥ उभें केलें ॥ १८३२ ॥

अशा लंपटाचें जिणें ॥ श्वानाहीं हूंनि उणें ॥
उगेंचि दुजयाचें साहाणें ॥ क्षोभोंहीनये ॥ १८३३ ॥

गुरु शिष्याची आशा करी ॥ पिता पुत्राची अवधारीं ॥
परंतु ते व्यर्थ संसारी ॥ पांडुपुत्रा ॥ १८३४ ॥

पदार्थी भरली मेदिनी ॥ परि प्राचीनची भोगवें निदानी ॥
तें आशा न करितांही दादूनि ॥ ये भोगातें ॥ १८३५ ॥

तेणेंवीण केली आशा ॥ ते व्यर्थ दुःखदाती पुरुषा ॥
अवधारीं गुडाकेशा ॥ ऐसिया यिया ॥ १८३६ ॥

निबद्ध जाले असुर ॥ मग तयांचे नाशले विचार ॥
आतां पुडती तियाते नर ॥ कैसे जाले ॥ १८३७ ॥

**॥ कामक्रोधपरायणाः ॥ ००० ॥**

द्रव्य तें कैंचें अर्जुना ॥ पदार्थ प्राप्तीची अभावना ॥
परंतु अर्थांशा झोंबिनली मना ॥ अनिवार ते ॥ १८३८ ॥

तिथे आशेचेनीची आधारें ॥ कामना मानसीं अंकुरे ॥
ते बाह्यंतरीं पसरे ॥ वाऊँ नेदी ॥ १८३९ ॥

हें देवत प्रसन्न होईल ॥ नाना येणें उपायें हें साधैल ॥
मग अपेक्षा पूर्ण कीजैल ॥ आपुली आपण ॥ १८४० ॥

तै विरसें अन्नें अघवीं ॥ दृष्टीपासाव दूरिसां डावीं ॥
उत्तमें रायां योग्यें भक्षावी ॥ ऐसीं अन्नें ॥ १८४१ ॥

हा अर्थु जै मातें जोडे ॥ तै आश्रय रचना तें पुढें ॥
स्वर्ण रुपयाचीं कवाडें ॥ जरि तें करवीन ॥ १८४२ ॥

आतांची इं नावडती वस्त्रें ॥ फेडूंनि सांडावी अपवित्रें ॥
परंतु हा अर्थु येणें द्वारें ॥ यावा हता ॥ १८४३ ॥

पैल ते सुंदरा स्त्री ॥ माझी अभिलाषु न करी ॥
म्हणौनि आशावंत शरीरीं ॥ दावी ठेवा ॥ १८४४ ॥

आशा धरुंनि मुख पाहे ॥ ते कामातें आशाचि विये ॥
तेथें कल्पना करू नये ॥ ऐसि ही करी ॥ १८४५ ॥

कन्येची आशा करी ॥ कामभूल तेचि अवस्वरीं ॥
कल्पना भोगाची परोपरी ॥ मनी स्मरे ॥ १८४६ ॥

आशाचि द्रव्याची आहे ॥ तंव कामभूत मन होये ॥
मनोमय लक्ष्मी पाहे ॥ कामातुरू ॥ १८४७ ॥

हा भूमि मातें देईल ॥ आणि येथें निक्षेप सांपडैल ॥
तै कैसा पां भोगु भोगिजैल ॥ शरीरें येणें ॥ १८४८ ॥

उपायें अथवा सहजगती ॥ राज्याची नव्हे काये प्राप्ति ॥
प्रस्तूत कामना चित्तीं ॥ ते कैसी पोषावी ॥ १८४९ ॥

निर्वैर करावी राणीव ॥ भोगावे भोग ते सर्व ॥
ऐसें उगेंचि मानूंनि अपूर्व ॥ संतोषें हासे ॥ १८५० ॥

विलासेंचि चाले बोले ॥ व्यर्थूचि कामें उचंबळे ॥
आंधळें कल्पुनि डोळे ॥ धांवे जैसें ॥ १८५१ ॥

आतां कृपा नुपने पुरूषा ॥ व्यर्थ जाये केली आशा ॥
साधनी विघ्न गुडाकेशा ॥ येकाधें होये ॥ १८५२ ॥

दाता आपुलें वित्त ॥ नेदी बोले अनुचित ॥
कां आन येकु येथ ॥ विघ्न करी ॥ १८५३ ॥

केली आशा वायां जाये ॥ कामना ते पूर्ण नोहे ॥
तै क्रोधु उठी अनुपायें ॥ असुरांतें ॥ १८५४ ॥

जो आगीवीण आंग जाळी ॥ मनचिं अंतर पोळी ॥
संतोषाचा पसरू गिळी ॥ महारोगु तो ॥ १८५५ ॥

गतेंमृतेंवीण रडवी ॥ आर्य मर्यादा सांडवी ॥
अवच्च केवळ बोलवी ॥ साधू तें वचन ॥ १८५६ ॥

आत्मइतर आत्मघात ॥ जेणें केलें हे विहित ॥
नयन जाले आरक्त ॥ सर्वांग स्फुरे ॥ १८५७ ॥

चळचळा कंपती गात्रें ॥ करकरिती दंत साभारें ॥
ऐसें उपजत अनिवार बारे ॥ क्रोधाचें तया ॥ १८५८ ॥

यापरी आशालंपटां ॥ कामक्रोध उपजती सुभटा ॥
तेचि आश्रयूनि अवांटा धावती ॥ असुर ॥ १८५९ ॥

महा कामीक महा क्रोधीं ॥ अभिमानी पर विरोधी ॥
करिती प्राणघातु आधीं ॥ विचारिती मग ॥ १८६० ॥

श्रवातें झोबती श्वानें ॥ ते आशावंतें येती आने ॥
तीं आत्म काम अपूर्णपणे ॥ येती क्रोधा ॥ १८६१ ॥

कळहोचि करूंनि मरती ॥ परंतु आशा तेथिची नं संडिति ॥
तैसी असुरें दंवदविती ॥ तीं कवणें वीराची ॥ १८६२ ॥

अहो स्त्रीकडे पाहिलें येणें ॥ आतां हा घ्यावाचि प्राणें ॥
मागतां नेदी उसिणें ॥ त्याचें जाळावें घर ॥ १८६३ ॥

वृत्तीवरि जो आला ॥ तो वंध्यु सपत्नु आपुला ॥
कार्याचा नाशु केला ॥ तो न मरावा कैसा ॥ १८६४ ॥

इछिली कन्या नेदी ॥ तो जन्मांतरिचा दंदी ॥
मानु घे आपण आधीं ॥ तो प्रत्यक्षु मारावा ॥ १८६५ ॥

ऐसेंचि येणें करावें ॥ ऐसेंचि येणें बोलावें ॥
हें घ्यावें हें दयावें ॥ ऐसी कामना ॥ १८६६ ॥

तैसें जै तो न करी ॥ तै कोपु उपजे शरीरीं ॥
मग आपपरावया घाता वरि ॥ उठिती असुर ॥ १८६७ ॥

हा कामक्रोधु सांडावा ॥ तै आशा योगे नवा नवा ॥
तो आशापाशु उगवावा ॥ तै येक नव्हें ॥ १८६८ ॥

येकी कडूंनि न रूपले ॥ तै दुसरी कडूंनि आवळे ॥
सर्वत्र पाश लागले ॥ तै कैसे उगवती ॥ १८६९ ॥

आतां ते आंगी आशा ॥ वरि कामक्रोधाचा वळसा ॥
परंतु अनर्थु तेणे कैसा ॥ घडे असुरांते ॥ १८७० ॥

**॥ कामभोगार्थमिहंते ॥ ००० ॥**

आशाबद्ध असुरजन ॥ कामक्रोध परायण ॥
कामोपभोगा लागूंन ॥ इछिती ते ॥ १८७१ ॥

ते कामोपभोगाची वासना ॥ उपजली क्रोधपरायणा ॥
वरि पापपुण्या विचारणा ॥ ते जै नसे ॥ १८७२ ॥

तै कामोपभोगा लागूंन ॥ असुर विचारिती साधन ॥
पावती पदार्थ संपूर्ण ॥ ते कवणें अंगें ॥ १८७३ ॥

**॥ अन्यायेनार्थसंञ्चयान ॥ ००० ॥**

तरि अवधारीं गा धनुःपाणी ॥ अन्यायें अर्थु जोडूंनि ॥
विषयो भोगिती मनी ॥ जैसा आवडे ॥ १८७४ ॥

येक ते करिती स्तेये ॥ परद्रव्य वित्त ज्ञेय ॥
येक करुनी ये कार्य ॥ कार्य आचरती ते ॥ १८७५ ॥

स्त्रीहत्या ब्रह्महत्या ॥ वीरहत्या गोहत्या ॥
आत्महत्या इतरहत्या ॥ साधन संपादिती ॥ १८७६ ॥

दृष्टीचि पुढें दिसावें ॥ आणि आपुलां हातीं पडावें ॥
मग आपुलें कां परावें ॥ हे नलगे विचारणा ॥ १८७७ ॥

घेतलें देणें म्हणौनि ॥ परि न परते येकापासूंनि ॥
मागे तो प्राणावरुंनि ॥ उबगला जाणावा ॥ १८७८ ॥

विधि साधावया बळि देती ॥ ॐ हो रें कुमारें मारिती ॥
अज्ञान पशु सिंपती ॥ तयांचीं रक्तें ॥ १८७९ ॥

येकीं सांडिलें संध्यास्नान ॥ कळोनिहीं धर्मज्ञान ॥
नीचांचे करिती सेवन ॥ दिवा रात्रौ ॥ १८८० ॥

अन्य मती रिघु करिती ॥ म्लेंछशास्त्र अभ्यासिति ॥
स्वहित अणुमात्रही चित्तीं ॥ नाठवे जयां ॥ १८८१ ॥

जेणें द्रव्यमिळे अपार ॥ तेंचि ज्ञान योग्यत्व थोर ॥
तया वेगळें इतर ॥ तें उबगु वाणें ॥ १८८२ ॥

वैराग्य गेलें नाशोंनि ॥ प्रेमविटाळें गुरुचरणी ॥
भक्तीचा उबगु मनी ॥ अर्थची वासना ॥ १८८३ ॥

ज्ञानविज्ञानसहित ॥ तेणें न मने स्वहित ॥
परदास्यीं गुंतलें चित्त ॥ अर्थचाडा ॥ १८८४ ॥

जितेंचि मारावीं पितरे ॥ चोरावीं गुरुचीं पात्रें ॥
पुस्तकें देव धोत्रें ॥ ऐसी वासना ॥ १८८५ ॥

स्वस्त्री परावया द्यावी ॥ का परस्त्री चाळवावी ॥
नाना उपायीं मेळवावि ॥ मोहोर कीं हे ॥ १८८६ ॥

चांडाळाचें घ्यावें दान ॥ विटाळाचें खावें अन्न ॥
परंतु जोडावें पोफळपान ॥ कवडाबटी ॥ १८८७ ॥

साधूंचां घरीं घेणें खान ॥ देवाचे न्यावें अळंकरण ॥
आश्रयावें पुत्रपण ॥ अधमा पुरुषांचें ॥ १८८८ ॥

विहित सांडणे हा विधु ॥ अहित करणें प्रसिध्दु ॥
अनाचारू विविधु ॥ द्रव्याचेनि कामें ॥ १८८९ ॥

यापरी हित नाशु विहित नाशु ॥ आत्मविनाशु परविनाशु ॥
करिती द्रव्याचा सोसु ॥ असुर गण ॥ १८९० ॥

पापाचिया अनंता राशी ॥ येके येकें मोहरेपासीं ॥
आंगीं घेउंनि त्या अनर्थासि ॥ साधी रूका ॥ १८९१ ॥

मोक्षाची चाड सांडिली ॥ लोकाची शंका उडाली ॥
संगती पुरे जाली ॥ महानुभावांची ॥ १८९२ ॥

यापरीं सांडूंनि न्याय सकळ ॥ अन्याय आचरोंनि प्रबळ ॥
द्रव्य जें अनर्थ मूळ ॥ तें असुर सोषिती ॥ १८९३ ॥

तयांची कैसी वासना ॥ अर्थाचां आर्जनी अर्जुना ॥
ते तुजप्राति विचक्षणा ॥ सांगिजैल ॥ १८९४ ॥

**श्लोक**

इदमद्य मया लब्धमिदं प्राप्स्ये मनोरथम् ।
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १३ ॥

**॥अद्य ॥ छ ॥**

आजि पाहा पां कैसा सुदिनु ॥ सोनयांचा उगवला भानु ॥
अर्जुना तो असुर जनु ॥ ऐसें म्हणें ॥ १८९५ ॥

आजिचि दिन शुध्दि कैसी ॥ वोवाळु कासेन दिशांसि ॥
हाचि सुवासरु मुहूर्तासि ॥ ऐसें जाणावें ॥ १८९६ ॥

कवणांचे देखिलें वदन ॥ हर्षभूत माझें मन ॥
तंवं येक म्हणती ब्राह्मण ॥ काये जालें ॥ १८९७ ॥

असुर म्हणती आइका ॥ अमृत दिनु हा अमृत घटिका ॥
कनक दृष्टि म्हणाना कां ॥ आजिचा दिनी ॥ १८९८ ॥

**॥ इदंमयालब्धं ॥ छ ॥**

हे इतुलें मातें मिळालें ॥ द्रव्य घराप्रति आलें ॥
प्रत्यक्ष दृष्टी पाहिले ॥ कैसें दिसे ॥ १८९९ ॥

बापु वस्तु नाणें चोख ॥ खरीचि मुद्रा सकळैक ॥
पुडती पुडती ते लेख ॥ गुणूंचि लागे ॥ १९०० ॥

नयनीं स्पर्शोनि ललाटी ॥ द्रव्य लावी प्रीति मोठी ॥
उजेडा ये बैसे उठी ॥ पारखी करी ॥ १९०१ ॥

उरावरुंनि नुतरावें ॥ पोटांतु घालुनि ठेवावें ॥
दृष्टि वेगळें न करावें ॥ दिवा रात्रौ ॥ १९०२ ॥

**॥ इमंमनोरथंप्राप्स्ये ॥**

आन येक अपूर्व आहे ॥ केला संकल्पु सिध्दु होये ॥
सत्य संकल्पी काये ॥ कवणु असैन ॥ १९०३ ॥

जे जें धरावे मनी ॥ ते तें उगेंचि ये टाकूंनि ॥
आतां इतुलयाचिवरुंनि ॥ येक आहे ॥ १९०४ ॥

आतां इतुलाचि जो उर्वरितु ॥ आहे जीवी मनोरथु ॥
तोही पावैन हा सिध्दांतु ॥ जाणा तुम्ही ॥ १९०५ ॥

आमुकीचि वृत्ति कां व्यापारु ॥ छत्रु सुखासन वारु ॥
गज रथ दळ भारू ॥ राज्य पृथ्वीचें ॥ १९०६ ॥

बहुत दिवस यया मना ॥ चिंतामणीची आथी वासना ॥
तेही परि पुरैल जाणा ॥ व्यर्थ नव्हे ॥ १९०७ ॥

सांप्रत घेतले येणे जीवें ॥ अमरावतीचें राज्य करावें ॥
सुरतरुचि वरुनि न टलावें ॥ कामधेनु हो ॥ १९०८ ॥

वासना तंवं पुरतीचि आहे ॥ सेष कामना इतुलीचि हे ॥
तेही पुरैल ऐसा आहे ॥ निश्चयो मातें ॥ १९०९ ॥

ऐसी प्रपोषी वासना ॥ द्रव्य अवलोकी पुनःपुनः ॥
मग अवघेयाचि गणा ॥ करुं लागे ॥ १९१० ॥

॥ इदमस्ति ॥ ००० ॥

पूर्विचें होतें इतुलें ॥ आता हेंहीं तया मेळविलें ॥
इतुलेनि इतुलें जालें ॥ सिद्ध आहे ॥ १९११ ॥

इतुलें स्वर्ण इतुलें रजत ॥ इतुली रत्ने इतुलें जडित ॥
इतुलें नाणें इतुले समस्त ॥ वित्त आहे ॥ १९१२ ॥

इतुले पशु वारु गज ॥ दासी दास सहज ॥
इतुलें मुदल इतुलें व्याज ॥ गणणा करी ॥ १९१३ ॥

इतुलें आलें संख्येते ॥ ययावरि न पडो मागतें ॥
आवरावें तोंड खातें ॥ यया अर्थ ॥ १९१४ ॥

अहो तस्करु तो रात्रीचा ॥ मागता चोरु दिवसाचा ॥
तो भयभीतु या चा ॥ भेऊॅ आहे ॥ १९१५ ॥

तस्कर वरि ते बरवे ॥ परि मागते पृथ्वीचे ते मरावे ॥
तयांही हूंनि आगळें नव्हें ॥ आपुले पोट ॥ १९१६ ॥

मागता लागलाचि जै पाठी ॥ तै रिघोये येकेंक पाठी ॥
परंतु पोट न सुटे पोटी ॥ पोरेंही बहुस्सालें ॥ १९१७ ॥

द्रव्यातें लागला झरा ॥ म्हणे का पोरे हो न मरा ॥
मोहोरे चारु का खरा ॥ कैसा वेचावा ॥ १९१८ ॥

कोंडा कणियां मेळवी ॥ आला पाला बहु पचवी ॥
दों दिसां येकुदां जेवी ॥ लोभी पुरुषु ॥ १९१९ ॥

घरिची उघडीं दिगंबरे ॥ राहाटी मृण्मये पात्रें ॥
येरे झिजतील तीं समग्रें ॥ भूमिगतें केलीं ॥ १९२० ॥

ग्रासु घेतांचि मुखाप्रति ॥ येकातें चौघें झोंबती ॥
अतिथि येउंनि काये खाती ॥ मंदिरा तया ॥ १९२१ ॥

वेचितां मरणासमान ॥ दुःख होये अति गहन ॥
संचित होतां मन ॥ अत्यंत उल्लासे ॥ १९२२ ॥

**॥ इदमपिमेपुनर्धनंभविष्यति ॥ ००० ॥**

म्हणे हे इतुलें आहे ॥ परंतु अपेक्ष्या तंव न धाये ॥
आणिक ही मागुतें उपायें ॥ होईल धन ॥ १९२३ ॥

परावयांचा दिसे घरीं ॥ द्रव्य तें साधितां परोपरी ॥
हें अवघें माझांचि घरीं ॥ भरैल जाणा ॥ १९२४ ॥

कां आहे इतुले मुदल ॥ तयाचें व्याज जनाजवळील ॥
हेंही इतुलें येईल ॥ मागुतें मज ॥ १९२५ ॥

कीं माझा संकल्पु साचारु ॥ न करी मी उद्यमु व्यापारु ॥
परंतु इतुला अर्थु होन हारु ॥ होईल मातें ॥ १९२६ ॥

कीं संचित ठेउंनि गुडाकेशा ॥ पुढें हें होईल ऐसी आशा ॥
तृप्ति नाहीं पुरुषा ॥ असुरातें ॥ १९२७ ॥

नाना आसुराचें केवळ मन ॥ प्राप्ता प्राप्त सोषी गहन ॥
हे आहे हे होईल म्हणौन ॥ उगीचि कल्पना ॥ १९२८ ॥

प्राप्ते अर्थीं कृपणता ॥ कामना अप्राप्य अर्थी पार्था ॥
येवं प्राप्ता प्राप्त सोषितां ॥ शरीर जाये ॥ १९२९ ॥

तेंचि श्रवण तेंचि मनन ॥ तोचि निदध्यासु साधन ॥
तेंचि जागृती तेंचि स्वप्न ॥ लोभियांतें ॥ १९३० ॥

परमार्थी घातलें पाणी ॥ साधुसंग न बैसती मनी ॥
आन वचन श्रवणी ॥ नाइकवे तया ॥ १९३१ ॥

हें आहें हें हो मागुतें ॥ हें मिळालें हें मिळैल मातें ॥
हेंचि बाहेरि अंतरीं वर्ते ॥ सार्वकाळ ॥ १९३२ ॥

आइकता दुजयाचें वचन ॥ अर्थीचि विवरे मन ॥
द्रव्याचें केवळ साधन ॥ परमार्थु जया ॥ १९३३ ॥

ऐसी करितां अर्थचिंता ॥ अर्थु तो अनर्थु भयु साधितां ॥
मग आइकें तो पार्था ॥ काये म्हणें ॥ १९३४ ॥

॥ श्लोक ॥

असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।
ईश्वरो ऽ हमहं भोगी सिध्दो ऽ हं बलवान्सुखी ॥ १४ ॥

॥ असौशत्रुः ॥ छ ॥

अहो हा येसणा प्रबळ ॥ वैरी होता अति शबळ ॥
तो न लगतां बहुबेळ ॥ क्षणमात्रें ॥ १९३५ ॥

॥ मयाहतः ॥ छ ॥

म्या मारिला उपायें बळें ॥ हें प्रत्यक्ष अवधीं देखिलें ॥
सर्वस्व तयाचें हरिलें ॥ नेलें स्वाश्रमा ॥ १९३६ ॥

मंदिर चाळिलें खणोनि ॥ तलिवरि केली मेदिनी ॥
पोष्या न मिळे अन्नपाणी ॥ तयाचिया ॥ १९३७ ॥

जाणो हा पवर्तु उलंडिला ॥ कीं मेरू पादघाते रगडिला ॥
हा वैरी खळ मारिला ॥ प्रतापवंतु ॥ १९३८ ॥

ख्याति जाली लोकाचारी ॥ स्तविली भाट नगरी ॥
येसणी माझी थोरी ॥ हे कवण नेणें ॥ १९३९ ॥

हा कवणें कैसा साधावा ॥ मशके सागरु लोटावा ॥
परंतु अगस्ती मी बरवा ॥ भेटलों तया ॥ १९४० ॥

अहो गजेंसी विरोधु करणें ॥ कवणा जंबुका बळ येसणें ॥
परंतु हें म्या पंचवदने ॥ आक्रमिला तो ॥ १९४१ ॥

मीनलिया दर्दुर कोटी ॥ परंतु भुजंगु न पाहावे दृष्टी ॥
सांपें गरुड मी उठाउठी ॥ भेटलों तया ॥ १९४२ ॥

अहो वज्रेसी घेतां थडक ॥ फुटलें पर्वताचें मस्तक ॥
तेवि मजसी वैर नावेक ॥ केलें येणें ॥ १९४३ ॥

मशक गजा झोंबीनलें ॥ ते सोंडा दंडेंचि सहज रगडलें ॥
नेणे ते केव्हा मेले ॥ अनायासें ॥ १९४४ ॥

ऐसा मारिला हा शत्रु ॥ केला सकळ संहारु ॥
थिल्लर कीटांवरि भास्करु ॥ तपलों तैसा ॥ १९४५ ॥

॥ अपरानपिहनिष्येच ॥ ००० ॥

आतां तयाहूंनि अपरें ॥ पैलें सात पांच पोरें ॥
मज महावीरासी वैरें ॥ उभी ठाकलीं ॥ १९४६ ॥

तरि आइका माझी प्रतिज्ञा ॥ आतां तीं मुकलीं प्राणा ॥
मी मारीन असे ना ॥ ये अर्थी संदेहो ॥ १९४७ ॥

व्याघ्रेंसी वैराचारें ॥ आलीं जंबुकें अपारें ॥
ती अवघींचि फळाहारें ॥ गेली तयाचेनि ॥ १९४८ ॥

पतंग झोंबती महाज्वाला ॥ लागला वोळंबा इंगळा ॥
नेणती माझे या बळा ॥ उपाया येंकीं ॥ १९४९ ॥

ययांचीं वर्मे माझां हातीं ॥ आतां प्रवर्तलों मी नि घातीं ॥
सर्वथैव कृपा नाथी ॥ शरीरीं माझां ॥ १९५० ॥

पाडीन मस्तक येकांचे ॥ मणि गण करीन अस्थिचे ॥
पुरवीन मनोरथ श्वानाचे ॥ तोडवीन जीतां ॥ १९५१ ॥

रुंडें लोळवीन महीतळीं ॥ करीन त्वचा आंगा वेगळी ॥
मळमूत्र कुंडी सगळीं ॥ निक्षेपीन ती ॥ १९५२ ॥

आन येकि सद्य प्रतीती ॥ मजसी विरोधु जे चाळिती ॥
ते क्रिमी पडोंनि नाशती ॥ झडती सर्वांगें ॥ १९५३ ॥

जयावरुंनि काढीं मन ॥ होये तयाचें निसंतान ॥
हे सहजचि वैर विघ्न ॥ वोडवलें तयां ॥ १९५४ ॥

दिवा रात्री हेचि घटना ॥ तोचि प्रसंगु पुनः पुनः ॥
कां टळावे सुजाणा ॥ आइक तियांतें ॥ १९५५ ॥

किती म्हणौनि आइकावे ॥ हो हो कोठवरि म्हणावें ॥
दिनु उगवतां नवें ॥ तेंचि वचन ॥ १९५६ ॥

सगळी नुपुरे जागृति ॥ स्वप्नी तेंचि कल्पना आइती ॥
न पडे विस्मरण सुषुप्ति ॥ निमिष येक ॥ १९५७ ॥

ऐसें असता कर्मवशें ॥ वैरी नाशती अनायासें ॥
तितुलेनि आसुरु विशेषें ॥ तो काये म्हणे ॥ १९५८ ॥

॥ ईश्वरोहं ॥ ००० ॥

जाला समस्ता सत्कारु ॥ आतां सत्य संकल्पी मी ईश्वरु ॥
कैसा नव्हे अवतारु ॥ आदि देवाचा ॥ १९५९ ॥

नाना आसुरांचेनि मतें ॥ अनिश्वर जग वर्ते ॥
आतां मी ईश्वरु कवणें सिद्धांते ॥ बोलती ते ॥ १९६० ॥

अनिश्वर विश्व केवळ ॥ म्हणौनि बलियाचें हे सकळ ॥
मानी पृथ्वीचें इशन शीळ ॥ तोचि ईश्वरु ॥ १९६१ ॥

उपजवी तोचि उत्पादकु ॥ पोषितोचि पोषकु ॥
नाशी तोचि विनाशकु ॥ प्रळयाचा कर्ता ॥ १९६२ ॥

शके तो होये दंडकु ॥ सर्वथा शके तो नायकु ॥
सार्वभौमु मंडळिकु ॥ शके तो होये ॥ १९६३ ॥

अनीश्वरु जेथ प्रकारु ॥ तेथे शके तो नरुचि ईश्वरु ॥
आतां मजसीं न मडे समोरु ॥ दुसरा जै ॥ १९६४ ॥

तै मी विश्वाचा शास्ता ॥ ईशनशीळ नियंता ॥
स्वामी सकळ ॥ आज्ञापिता येकलाचि ॥ १९६५ ॥

सामर्थ्यवंता तें न साहे ॥ मग तयाचा घातु पाहे ॥
आपणचि सर्वत्रु होये ॥ सामर्थ्यकर्ता ॥ १९६६ ॥

आगळें कवण बोलैल ॥ आज्ञा कवणु भंगील ॥
आशंका कवण करील ॥ उत्तरासी ॥ १९६७ ॥

वांकुडे कैसे बैसती ॥ जन मरियादा सांडिती ॥
चालो न चलो परि चित्ती ॥ ऐसें स्वामित्व ॥ १९६८ ॥

बोलैन तेंचि आइकावें ॥ सांगैन तैसेंचि करावें ॥
म्या दाटिले नि दडावें ॥ रिघावें पृथ्वीपोटी ॥ १९६९ ॥

न साहे सत्ता आनाची ॥ करी जे ईच्छा मनाची ॥
ईश्वरु स्वामी आपणूचि ॥ मी ऐसें म्हणे ॥ १९७० ॥

ऐसें स्वामित्व अवलंबिलें ॥ तें भाग्यवशें चालो लागलें ॥
इतुलेनि आसुरं उपजलें ॥ काये पुढती ॥ १९७१ ॥

**॥ अहंभोगी ॥ ००० ॥**

माझेंचि भाग्य हें सकळ ॥ मीचि भोक्ते येथ केवळ ॥
उपचारांवरि प्रबळ ॥ उपचार भोगी ॥ १९७२ ॥

सोलुंनि शर्करा घृत ॥ मुखीं घाली मिश्रित ॥
तयाहीं माझारि तेथ ॥ आंठी सांडी ॥ १९७३ ॥

म्हणे मी रसांचा भोक्ता ॥ निवडा रे मधाची मधुरता ॥
नवनीता आणूंनि मृदता ॥ मुखीं घाला ॥ १९७४ ॥

घृतपकें अन्ने पचिली ॥ ती वारुंनि भृत्यां वाटिलीं ॥
अपूपादिकें फेडिलीं नावडतीची ॥ १९७५ ॥

न सुधेचि आळणी पय ॥ वरि घृत शर्करा हे हृदय ॥
तें चावितां म्हणे कायें ॥ कठिण जालें ॥ १९७६ ॥

सेजे खुपती पठकुळें ॥ नावडे कस्तुरीचें काळें ॥
सुमने सांडूंनि परिमळे ॥ सेज भरा ॥ १९७७ ॥

गायनी अतिशये आदरु ॥ जाणिवेचा आंगी भरु ॥
मी येकु कुशळ चतुरु ॥ ऐसें म्हणे ॥ १९७८ ॥

ऐसी न पाहिजे ते सकुमारता ॥ नाथीली आणि पार्था ॥
उदक धोये प्रशितां ॥ चावी पय ॥ १९७९ ॥

जनाहूंनि आगळें जाण ॥ विदगृध ययाचें भोक्तेपण ॥
नाना मी भोगी म्हणौन ॥ काये करी ॥ १९८० ॥

बळाचिया सोळावनिता ॥ आणा रे म्हणे ये कांता ॥
येरां उपचारांचिया अनंता ॥ करा राशी ॥ १९८१ ॥

चंदनें मंदिर सारवांवें ॥ आंगणी कर्पुर चोपावे ॥
धूपूंनि वोवरा घालावें ॥ मंचकासी ॥ १९८२ ॥

मनोरम श्रृंघार वन ॥ तेथें करावें शयन ॥
तेथें होईल आगमन ॥ स्वर्गांगनाचें ॥ १९८३ ॥

क्षणक्षणा पालटी वस्त्रें ॥ क्षणा क्षणा पाहे गात्रें ॥
क्षण क्षणा बोले उत्तरें ॥ भोक्तेपणाची ॥ १९८४ ॥

अहो अन्ने ऐसीं भक्षावी ॥ वस्त्रें मज ऐसीं करावीं ॥
स्वस्त्री ना परस्त्री भोगावी ॥ तरिचि भोक्तेपण ॥ १९८५ ॥

कंठी घालूंनि कंठमळा ॥ शोभावी श्रृंघारी स्थूळा ॥
सहसा न बोले डोळा ॥ नु चली विदगधपणें ॥ १९८६ ॥

जे जे विषय बरवें ॥ ते ते भोगु जाणावे ॥
ऐसें चातुर्य बहुवें ॥ प्रकारें बोले ॥ १९८७ ॥

मी येकु भोक्ता यये क्षीती ॥ मजसमान दुजा नाथी ॥
ऐसी विषयभोगीं वित्पत्ति ॥ करी बहुसाल ॥ १९८८ ॥

रतिरहस्य कोक ॥ हें हृदयस्थ जया सकळैक ॥
तेचि योग्यता आइक ॥ आसुरांची ॥ १९८९ ॥

यापरी देह प्राचिनें अनुकुळें ॥ आपार भोग अनुभविले ॥
तेणें कृतकृत्य जाण जाले ॥ आसूर ते ॥ १९९० ॥

॥ सिद्धोहं ॥ ००० ॥

अहो सकळही आम्ही केले ॥ सकळही भोग भोगिले ॥
सकळ पदार्थ साधिले ॥ जालो कृतकृत्य ॥ १९९१ ॥

हें मिळालें हें मिळावें ॥ तें पुरे जालें सर्व अघवें ॥
सकळ भाग्य पाहावें ॥ तें सिद्ध असे ॥ १९९२ ॥

हा मारिला हा मारिन ॥ ऐसें करावें नलगे चिंतन ॥
निर्वैर माझें सभाग्यपण ॥ समर्थाचें ॥ १९९३ ॥

पाहिजे तो अर्थु सिद्धुं ॥ पाहिजे तो तैसा बोधु ॥
इंद्रियग्रामु सावटु ॥ निरामय सदा ॥ १९९४ ॥

सिद्ध धान्य सिद्ध धन ॥ सिद्ध रजत सिद्ध स्वर्ण ॥
सिद्ध अळंकार जतन ॥ सिद्ध तयांची ॥ १९९५ ॥

सिद्धे अन्नें वस्त्रें आन ॥ पदार्थ सिध्द म्हणौन ॥
करावें नलगे साधन ॥ कवणा कार्यांचे ॥ १९९६ ॥

एवं सकळें भाग्यें मी सिध्दु ॥ नाही आणिकाचा बाधु ॥
ऐसा आसुरु मतिमंदु ॥ बोलता होये ॥ १९९७ ॥

अहो संसारा येउंनि जें करावें ॥ साधावें अथवा भोगावें ॥
तें भोगीलेंही क्षीण नव्हे ॥ ऐसें सिध्द असे ॥ १९९८ ॥

॥ बाळवान् ॥ ००० ॥

हे काये आणिकां साधैल ॥ अप्रमित माझें बळ ॥
म्हणौनि पदार्थ सिध्द सकळ ॥ जाले भोगासि ॥ १९९९ ॥

आतां हे पृथ्वी उचलूं ॥ कीं सागरु येसीस वा घालूं ॥
मेरु अवघा कवळुं ॥ ब्रह्मांड गोळु ॥ २००० ॥

माझां आंगीं आंगबळ ॥ तपोबळ आणि युक्तिबळ ॥
प्रेत्नबळ परिवार बळ ॥ अवघेंचि असे ॥ २००१ ॥

कवणां दाउं आंगवण ॥ समस्ती धरिलें त्रुण ॥
ते माझे बळ असाधारण ॥ मीचि जाणें ॥ २००२ ॥

॥ सुखी ॥ ००० ॥

हा काळ वरि आंगवणा ॥ नयेंचि काकुळती आना ॥
सकळ सामग्री जाणा ॥ मेळविली बळें ॥ २००३ ॥

आतां निर्वैरु जालें म्हणौन ॥ बळचि आछादूंनि मान ॥
सुखीं असें वचन ॥ ऐसें आसुरांचे ॥ २००४ ॥

चिंत्ता ते मरोंनि गेली ॥ वासना भरोंनि वोसंडली ॥
निरंतर स्छिती राहिली ॥ सुखाची मज ॥ २००५ ॥

विष यानंदाचा सागरीं ॥ विराली हे चित्त लहरी ॥
आतां सुखी असें संसारी ॥ दिवा रात्रौ ॥ २००६ ॥

सुखें जाणें सुखें येणें ॥ सुखेंचे खाणें जेवणें ॥
करावें ते सुखें करणें ॥ नाही शंका ॥ २००७ ॥

सुखें आहार व्याहार ॥ सुखें इछेचे आचार ॥
विधिनिशेध समग्र ॥ ते सुखेंचि सांडिले ॥ २००८ ॥

नाहीं चिंता मोक्षाची ॥ साधना आणि स्वर्गाची ॥
काळ जाणे भुजांची ॥ आंगवण माझयां ॥ २००९ ॥

येथें बळिया तोचि नरेंद्र ॥ बळिया तोचि इंद्र ॥
तरि बळिया ईश्वरू ॥ ऐसे घडे ॥ २०१० ॥

तरि मी बळिया ईश्वरू ॥ सिध्धु पदार्थी सपुरू ॥
गुरूंचा गुरू राजगुरू ॥ समर्थु प्रौढी ॥ २०११ ॥

ऐसा संसार कृतकृत्यु ॥ आसुरू आनंद भरितु ॥
पुनरपि काये म्हणतु ॥ अवधारी पा ॥ २०१२ ॥

श्लोक

आढ्यो ऽ भिजनवानस्मि को ऽ न्यो ऽ स्ति सदृशो मया ॥
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्याज्ञानविमोहिता: ॥ १५ ॥

॥ आढ्य: ॥ छ ॥

द्रव्यें तरि मी सागरू ॥ काइसा पराधीनु तो कुबेरू ॥
पृथ्वी न साहे भारू ॥ माझिये जोडीचा ॥ २०१३ ॥

स्वर्णाचिया खोटीं ॥ तीं पेवेंचि मोटीं मोटीं ॥
नाणे गणिता लक्ष कोटीं ॥ संख्या न करवे ॥ २०१४ ॥

रजत पात्रें वावरतीं ॥ धान्या तयां नाहीं मिति ॥
घरिचें कव्हणी हातीं ॥ ताम्र न धरी ॥ २०१५ ॥

वस्त्रें देवांगे दासी तें ॥ सिध्दी वोळगती आमुतें ॥
गणित नाहीं पश्चादिकांते ऐसे पूर्ण ॥ २०१६ ॥

हा तूचि नेणो हा परिसु ॥ ऐसा तवं नसे पुरूषु ॥
येसणा आढ्यु नरेशु ॥ कवणु मी नेणे ॥ २०१७ ॥

**॥ अभिजनवानस्मि ॥ छ ॥**

अमित माझे हे सर्वज्ञपण ॥ भवं ते लोक अभिज्ञ ॥
तिंहीं युक्तु मीन ॥ शोभैना कैसिया परी ॥ २०१८ ॥

मी ब्रह्मा हे महर्षि ॥ ज्ञातयांची सभा कैसी ॥
अहो वंशावळी मजचि ऐसी ॥ माझी सर्वज्ञ ॥ २०१९ ॥

बेताळीस पूर्वज पाहातां ॥ मजचि ऐसी तयांची योग्यता ॥
पुढें संतान विचारितां ॥ ज्ञानेचि सर्व ॥ २०२० ॥

सभें बैसलों येकाकी ॥ तवं विद्वज्जन ते कीं ॥
विद्या उजळावया अनेकी ॥ येती मजपासीं ॥ २०२१ ॥

पैल ते वेदार्थ संपादिते ॥ पैल शास्त्रार्थु सांग ते ॥
पैल पुराणे वाखाणिते ॥ ज्ञाते महानुभाव ॥ २०२२ ॥

अनुभवी विरक्त तेही परि ॥ सभे बैसती दिवसा रात्री ॥
मीचि आश्रयो सर्वांपरी ॥ ययां सर्वांतें ॥ २०२३ ॥

येर भृत्य अप्रमीत ॥ आज्ञा पाळिते दूत ॥
मातें भजती समस्त ॥ सार्वकाळ ॥ २०२४ ॥

वाढ या नये माझी सेवा ॥ मागें पुढें परिवारू अथवा ॥
आनयेकु विसांवा ॥ मातें आहे ॥ २०२५ ॥

सुंदरा गुणवंता वनिता ॥ आश्रम भिन्न मी येकु भर्ता ॥
पुत्रकन्या बहुता ॥ बहुत सोइरे ॥ २०२६ ॥

ना कीं सर्वज्ञु मी जयापरी ॥ तैसेचि पुत्र घरीं ॥
अगणीत विद्यासामग्री ॥ पोथी या पुस्तकें ॥ २०२७ ॥

नामी अळंकारू पालकीचा ॥ शोभा श्रुंघारू सभेचा ॥
दिव्यद्रष्टा चातुर्याचा ॥ राजा रे मी ॥ २०२८ ॥

**॥ कोन्योस्तिसदृशोमया ॥ ०० ॥**

मज ऐसा आहे कवणु ॥ धनवंतु अथवा सर्वज्ञु ॥
जनवंतु सामग्री या संपुर्णु ॥ तिही लोकीं ॥ २०२९ ॥

नमने दुजयाचें केलें ॥ नमने दुजयाचें बोलिलें ॥
बळ आढ्यत्वा आपुलें ॥ अतुल्य जाणपण ॥ २०३० ॥

मेरु कासेन तुकावा ॥ सागरु रांजणासमु करावा ॥
तैसा मी येकु यया सर्वांमाजि श्रेष्ठु ॥ २०३१ ॥

॥ यक्ष्ये ॥ ०० ॥

आतां यागादिक करणें ॥ तरि मज वांचूंनि कवणें ॥
म्हणौनि तेंहीं संपादणें ॥ लागैल मातेंचि ॥ २०३२ ॥

आतां महायागु करीन ॥ तेणें दीक्षितु होईन ॥
परम श्रेष्ठता पावैन ॥ याज्ञिकांमाजि ॥ २०३३ ॥

पूर्वी नाहीं कव्हणी आइकिलें ॥ मां आंगें कैचे केलें ॥
पाहिजे तरि ऐसें संपादिले ॥ यागादिक ॥ २०३४ ॥

देव कौतुक पाहांती ॥ महर्षी विस्मित होती ॥
मनुष्यें वेडावोनि जाती ॥ ऐसें करीन ॥ २०३५ ॥

॥ दास्यामि ॥ ००० ॥

आणि ते समर्यी जे मागतें ॥ आले मी देइंन तयांतें ॥
आतां नेलेंचि न वचे तया तें ॥ ऐसें बहुत ॥ २०३६ ॥

भूमिदानें गोदाने ॥ विद्यादानें कन्यादानें ॥
द्रव्यदानें वस्त्रदानें ॥ अपारें करीन ॥ २०३७ ॥

अश्वदानें गो दानें ॥ महिशीदानें फळ दानें ॥
गृहदानें नाना दानें ॥ करीन ऐसीं ॥ २०३८ ॥

तंवं ती पातली कळावंतें ॥ नित्य खेळवीन तयांतें ॥
देईन जेणे माथें ॥ तुकिती राये ॥ २०३९ ॥

कोल्हांट सार्वकाळ परिसणें ॥ मग तयां ऐसें देणें ॥
चहुं खंडी जेणें ॥ नाव होये ॥ २०४० ॥

बहुरुपी आला पुरे ॥ मग देणे माझें तें न सरे ॥
चित्र मंडपी देशांतरें ॥ कीर्ती नेती ॥ २०४१ ॥

भाट नागरी वार्णिती ॥ मुंढे बोडिके नाचती ॥
गोंदळे थंढ खेळती ॥ दान पात्रें ॥ २०४२ ॥

ऐसें देईन दान ॥ जें नेंदवे इंद्रालागूंन ॥
मग तेणें करुंनि कीर्तने ॥ आइकेंन आपुले ॥ २०४३ ॥

॥ मोदिष्य ॥ ००० ॥

तेणे पावैन हर्षातें ॥ भूतें माझे न हर्षवंतें ॥
मग स्थान तया आनंदातें ॥ नव्हे पृथ्वीवरी ॥ २०४४ ॥

तोही जनानंदु देखैन ॥ परम हर्षा तेंचि पावैन ॥
वरियाग फळ लाहीन ॥ न तयावरि ॥ २०४५ ॥

तै हर्षातें नाही प्रमाण ॥ तेथेंचि हारपैल मन ॥
असो आतां करीन ॥ रोकडेंचि ॥ २०४६ ॥

॥ इत्यज्ञानविमोहिताः ॥ ००० ॥

ऐसें येणे अज्ञानें ॥ मोहले जे अर्जुना जाणें ॥
असुर जन वचनें ॥ फुकाचीं बोलती ॥ २०४७ ॥

नाशवंत हे शरीर ॥ आणि पदार्थ समग्र ॥
याचां ठांइं ममता पर ॥ अज्ञान ते ॥ २०४८ ॥

पाहातां सामग्री अल्पचि ॥ आणि मांडणी बहु बोलांची ॥
विश्वा नेदवे दानाची ॥ वासना मात्र ॥ २०४९ ॥

योग्यता तवं कांहीं नसे ॥ परि अभिमानु आगीं वसे ॥
तेणें मी सर्वज्ञु ऐसें ॥ डांब्य बोलिजे ॥ २०५० ॥

मज समानु कव्हणी नाहीं ॥ हा अभिमानचि वाहाती देहीं ॥
परंतु मूर्खत्वें वरि नाहीं ॥ समानु दुजा ॥ २०५१ ॥

वृथा अभिमानु धरणें ॥ मी हें काये मशक नेणें ॥
राशभांची सर्वज्ञपणें ॥ तीं राशभांचि माजी ॥ २०५२ ॥

आपणु आपणा तें नेणु ॥ नव्हे तेंचि होये आपणु ॥
तेथें न घडे तो अभिमानु ॥ वृथा धरी ॥ २०५३ ॥

देह धरुनि अर्जुना येतां ॥ कां देह सांडूनिया जाता ॥
असे मशकांसीं समानता ॥ महारायातें ॥ २०५४ ॥

मध्यें देह धरुनि असतां ॥ वायांचि कवळी दृष्टा अर्था ॥
ते कवणाचे पांडुसुता ॥ पदार्थ न होती ॥ २०५५ ॥

माझें माझें म्हणती ॥ ते मरणी सांडूनि जाती ॥
तेथें आनयिक भजती ॥ माझें म्हणौनि ॥ २०५६ ॥

तेही गेले सांडूंनि ॥ आणिक आले माझे म्हणौनि ॥
सेवटीं येतां जातां निर्वाणी ॥ येकलेचि ॥ २०५७ ॥

ऐसें असोनि तत्वता ॥ नेणती जे आत्मज्ञानता ॥
वाउगे न संगे अहंता ॥ ममता दृढविती ॥ २०५८ ॥

ते असुर अवधारीं ॥ नर वोळखावे संसारीं ॥
वर्ण आश्रम च्यान्ही ॥ राहात असतां ॥ २०५९ ॥

आणीक ही चिन्ह तयांतें ॥ तें मी सांगैन असुरांचें ॥
तरि आदेरं दोहीं श्रवणाचें ॥ उदर भारीं ॥ २०६० ॥

॥ श्लोक ॥

अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृताः ।
प्रसक्ता : कामभोगेषु पतन्ति नरकेऽ शुचौ ॥ १६ ॥

॥ अनेकचित्तविभ्राताः ॥ ००० ॥

जे जे अभिलाषा योग्य अर्थ ॥ ते ते तेथें तेथें स्वस्वार्थ ॥
तैसे तैसे मनोरथ ॥ ते तदाकारें ॥ २०६१ ॥

म्हणौनि जयाचें चित्त ॥ ते अनेकधा संसारी भ्रमित ॥
आत्मविषयीं भ्रांत ॥ कांहींचि नेणें ॥ २०६२ ॥

इंद्रिये अर्थाकारे मोहरलीं ॥ तेचि चित्तोवृत्ति फाकलीं ॥
येकीचि अनेकधा जाली ॥ चैतन्य कळा ॥ २०६३ ॥

चित्ताचें जे अनेकपण ॥ तेंचि सदृढ आत्मज्ञान ॥
आणि आत्माज्ञानाचिपासूंन ॥ चित्त अनेकधा ॥ २०६४ ॥

आत्मभ्रमे भ्रमित ॥ अनेकधा जयांचे चित्त ॥
तेचि असुर निभ्रांत ॥ जाणावे तुवां ॥ २०६५ ॥

॥ मोहजाळसमावृताः ॥ ००० ॥

ते आणि तयांचें ज्ञान ॥ यया अज्ञानाचेंचि आवरण ॥
म्हणौनि मानू नये प्रमाण ॥ युक्त तेहीं ॥ २०६६ ॥

आत्माज्ञानी पहुडला ॥ पुरुषु सुषुप्ती आला ॥
तयांचा वृत्तिसमूहु बुडाला ॥ विस्मरण सागरी ॥ २०६७ ॥

तया मागुनी उठी स्मरण ॥ पदार्था रुढ विपरीत ज्ञान ॥
तयातें बोलिजे स्वप्न ॥ निद्रितासी ॥ २०६८ ॥

नानाविधे योग्य ते तें ॥ पावली असतां बुद्धि तेथें ते
आंगीं वर्तमाने निद्रेतें ॥ देखेचि गा ॥ २०६९ ॥

आहे तें नकळे निसिमान ॥ आहे तें नकळें शयन ॥
आहे तें आत्मविस्मरण ॥ कळेचि ना ॥ २०७० ॥

नाही तो दिसे दिवसु ॥ नाहीं तो व्यारु आयासु ॥
नाही तो ज्ञान प्रकाशु ॥ नाही तें ज्ञेय ॥ २०७१ ॥

म्हणौनि नव्हे तो ज्ञाता ज्ञाता ॥ नेणे आपणाही जाणतां ॥
एवं सकळ तयाची योग्यता ॥ अज्ञाने आवरिली ॥ २०७२ ॥

तैसा आपुलेनि अज्ञाने ॥ मी म्हणें परि नेणे ॥
जाणे तऱ्हीं ते जाणणें ॥ जाणता ना जाणितला ॥ २०७३ ॥

आत्मइतर पाहे भान ॥ ते नाथिलेंचि सर्वजाण ॥
योग्य ते तिये कारण ॥ अज्ञान असे ॥ २०७४ ॥

एवं जाणते ही ते जाण ॥ अज्ञानें आवरले म्हणौन ॥
म्हणौनि आपुलें बंधन ॥ तेंचि दृढविती ॥ २०७५ ॥

॥ **कामभोगेषुप्रसक्ताः** ॥ ००० ॥

आत्मज्ञाने आवरले ॥ वरि अन्यथा ज्ञाने वेष्टले ॥
तें अन्यथा ज्ञानखोंले ॥ अज्ञानाचि पोटी ॥ २०७६ ॥

अज्ञानदृष्टी भासे भान ॥ तयाची कामना गहन ॥
भोगीं आसक्त करुंनि मन ॥ तेथें गुंतले ॥ २०७७ ॥

यापरी कामभोगीं आसक्त ॥ अनेकधा तयांचे चित्त ॥
अज्ञान होत्सातें दृढमत ॥ असुरांचे ॥ २०७८ ॥

ते बळेंचि आपुण नि बांधले ॥ कवणे सोडवावे नाशले ॥
जै हीं धर्मधर्म सांडिले ॥ स्वार्थ संभ्रमें ॥ २०७९ ॥

मुख्यत्वे पुरावा कामु ॥ मग तो हा पाप अधर्मु ॥
गेला तिकडूंनि मनोधर्मु ॥ परतवावाचि नलगे ॥ २०८० ॥

विधुनिषेधु जेथ पाप ॥ मरण मोक्षाचें स्वरुप ॥
उपजणें मरणें आपेंआप ॥ नसे पुनर्जन्मु ॥ २०८१ ॥

दंडिता नाही ईश्वरु ॥ बळिया तोचि प्रजेंद्रु ॥
यया वेगळें गुरु ॥ काये सांगैल ॥ २०८२ ॥

ऐसा सिद्धांतु भजतां ॥ कामक्रोधा नाही क्षीणता ॥
दंभा अहंकाराची पुष्टता ॥ तुटेचिनां ॥ २०८३ ॥

आपणा प्रिय तें भोगावें ॥ करुं आवडे तें करावें ॥
परंतु व्यर्थ जांउं नेदावें ॥ जीवित हें ॥ २०८४ ॥

ऐसे अज्ञान ते समस्त ॥ ऐसे कामभोगीं आसक्त ॥
ऐसें जयाचें मत ॥ ते असुर पापी ॥ २०८५ ॥

**॥ पतंति नरकेशुची ॥ ००० ॥**

अशूच नरक रौरव ॥ तेथें पडती जाण सर्व ॥
पुडती नेणती नांव ॥ शुभे योनीचें ॥ २०८६ ॥

पू रक्त मूत्र विष्टा ॥ तेथिचे क्रिमी ते सुभटा ॥
बहुकाळ चुकले कटकटा ॥ असुरगण ॥ २०८७ ॥

जळो तें तयांचे जाणपण ॥ नरकप्राप्तींचे कारण ॥
जळो मताचें साचारपण ॥ जें सदृढ धरिती ॥ २०८८ ॥

ते नरकपंथीचे कापडी ॥ आंगी सामग्री नाही थोडी ॥
जे परतती कां वाकुडी ॥ करिती वाट ॥ २०८९ ॥

तयांचा पाहातां संघातु ॥ साधु जनी असे निद्रितु ॥
अर्जुना असुरु जनु परंतु ॥ आपणु कैसा ॥ २०९० ॥

**॥ श्लोक ॥**

आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।
यजन्ते नामयज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥

**॥ आत्मसंभाविताः ॥ ००० ॥**

असुर बोलती वचन ॥ अहो आम्ही श्रेष्ठ सर्वज्ञ ॥
आत्म महंती आपण ॥ आंगो आंग वाखाणिती ॥ २०९१ ॥

मी राजमान्यु मी वडिलु ॥ मी गुणवंतु त्यागशीळू ॥
मी बोलका अतिकुशळु ॥ विद्यावंतु ॥ २०९२ ॥

मी समर्थु ये त्रिभुवनी ॥ पवित्रु विशेषें करुनि ॥
माझें घेती पायवणी ॥ सभाग्य ते ॥ २०९३ ॥

मदनु येकी माझी कळा ॥ लावण्याचा मी पुतळा ॥
दर्पणी पाहें वेळावेळां ॥ करीं निंबोलोण ॥ २०९४ ॥

नाना माझिये जाणिवे समानु ॥ सर्वथा न तुके आनु ॥
यालागि पावलों मानु ॥ समग्रांमाजि ॥ २०९५ ॥

वये असती वडिलु ॥ ते बुध्दिहीनचि सकळु ॥
बाळपणापासूंनि केवळु ॥ जाणपण माझे ॥ २०९६ ॥

मातें समस्तही पुसती ॥ कां जे सर्वज्ञता आथी ॥
कीर्ति आइकोनि येती ॥ दुरुनि मनुजे ॥ २०९७ ॥

की त्यांची कार्यै केलीं ॥ धन्य धन्य माझी माऊली ॥
माझी आशा लागली ॥ प्राणियांसि ॥ २०९८ ॥

येका दिधलें जीवदान ॥ येकाचे घेतले प्राण ॥
वरी सेवक होउंन ॥ येक भजती ॥ २०९९ ॥

प्रेत्नु साधावयाची कळा ॥ कवणु जाणें मज वेगळा ॥
उपायेचि राजा जिंकिला ॥ तो अधीनु वर्ते ॥ २१०० ॥

मजसीं कवणु पां तुकैल ॥ राज्याचि येक साधिजैल ॥
नाना सहज भाग्य प्रबळ ॥ असे माझें ॥ २००१ ॥

कवणें अंगे मी उणा ॥ भाग्यवंतु आणि देखणा ॥
पाळीं बहुसालां जना ॥ स्वामी म्हणौनि ॥ २१०२ ॥

मर म्हणें मरावें ॥ जी मणें तेणें जीयावें ॥
ऐसें माझां ठांइं नवें ॥ सामर्थ्य असे ॥ २१०३ ॥

सकलांतें माझा आधारु ॥ मी राजा मी ईश्वरु ॥
मातें मीचि गुरु ॥ दुजा नाहीं ॥ २१०४ ॥

ऐसें आपुलेंचि महिमान ॥ स्वमुखें वाखाणिती आपण ॥
आत्मभावित आसुरगण ॥ पराचे द्वेष्टे ॥ २१०५ ॥

ऐसे बोल तंवं वाडवाड ॥ स्वकार्यी तात्पर्य निबिड ॥
नाहीं तयां चाड भीड ॥ कृपा परावयांचि ॥ २१०६ ॥

॥ स्तब्धाः ॥ ००० ॥

मग परकार्य येकाधे पडे ॥ तें काकुळती ये बापुडें ॥
तया तेंचि करुंनि वेडें ॥ स्तब्धता धरी ॥ २१०७ ॥

सहसा न बोले वचन ॥ मृदता तरी कठीण ॥
भावार्थु ह्रदयामाजूंन ॥ बाहेरि न पडे ॥ २१०८ ॥

सांगता सांगे आदरें ॥ तें न म्हणे वाईट बरें ॥
श्रोत्रावरुंनि जाये वारे ॥ तैसें होये ॥ २१०९ ॥

लोटिलाही पर्वतापरी ॥ न ढळे न चळे अवधारी ॥
येके लोळती पायांवरी ॥ न पाहे तयां ॥ २११० ॥

आल्या न करी मानु ॥ तेविचि स्तब्धपणें प्रश्नु ॥
आलां गेला तेणे कवणु ॥ मंदिरासी ॥ २१११ ॥

बरवे अथवा वाइट ॥ न करी वांकुडे नीट ॥
परार्थ वर्ततां कष्ट ॥ असुरासी ॥ २११२ ॥

सहसा न बोले न पाहे ॥ मा हा करी तै नवल काये ॥
बैसला तै उभा न राहे ॥ स्व पर इछा ॥ २११३ ॥

आतां तो कवणें चाळावा ॥ चालवावा कां बोलवावा ॥
डोळा नुचली पांडवा ॥ असुरु तो ॥ २११४ ॥

बोलवी तोचि हळवटु ॥ जनातें आला वीटु ॥
ऐसेनि बोले तैसे वटु ॥ दावी मैत्रीचा ॥ २११५ ॥

कां स्वभावेंचि येकु अर्जुना ॥ जडत्वें स्तब्धु बोलेना ॥
आदरु अनादरु कळेना ॥ उगाचि असे ॥ २११६ ॥

त्या मे येकें निपजावे ॥ ते वासरा चौसिद्धि न पवे ॥
सूर्यो उगवला मालवे ॥ तंव पहिली संध्या ॥ २११७ ॥

स्नान करुंनि बैसला ॥ वस्त्र घेणे हें विसरला ॥
प्रहरु दीनु क्रमला ॥ तैसेंचि असतां ॥ २११८ ॥

प्रहरा येका आचमन ॥ शिळें राहे संध्यावंदन ॥
विसरोनि टिळकोध्दारण ॥ कर्म चाल्वी ॥ २११९ ॥

मूत्रपुरीशा नंतरें ॥ शौचु करावा हें न स्मरे ॥
मग प्रहरा दों तें स्मरे ॥ तै अळ्सु वारी ॥ २१२० ॥

भोजनी बैसला वीरपती ॥ पंक्ती वरी पंक्ती उठिती ॥
परंतु कालवणं यांची समाप्ति ॥ तेचि नाही ॥ २१२१ ॥

मुखी पडिले तें चावावें ॥ सहसा तेंचि न संभवे ॥
मग कव्हणें. येकें लोटावें ॥ काळें कवळासी ॥ २१२२ ॥

दुजा ग्रासु हाती घ्यावा ॥ मध्य घटिकां पांचाचा विसांवा ॥
तथापि ते तातडि जीवा ॥ न साहे म्हणे ॥ २१२३

विळे क्रोसु येकु चालणें ॥ तेंही परावयाचेनि यत्नें ॥
बैसला मग उठुं नेणे ॥ ऐसा स्तब्धु ॥ २१२४ ॥

निद्राकरी अस्तमानी ॥ तो उठूंनि बैसे माध्यान्ही ॥
जागृतूचि लोळे आस्तीर्णी ॥ उठी पर प्रत्नें ॥ २१२५ ॥

बैसे तै येके कोनी ॥ विळूवरि तटस्थु मौनी ॥
मळोत्सर्गे वांचूंनि ॥ उदर फुगे ॥ २१२६ ॥

कव्हणी म्हणे ध्यानस्थु ॥ कव्हणी म्हणे चिंताग्रस्थु ॥
सेवटी तो उगाचि तटस्थु ॥ आपुलेनि स्तब्धपणें ॥ २१२७ ॥

आतांचे कृत्य सायंकाळी ॥ सायंकाळिचें सकाळी ॥
कृत्य कर्तव्य तें टाळी ॥ नाशु करी ॥ २१२८ ॥

आपणु न बोले काही ॥ बोलविलियां उत्तरचि नाहीं ॥
देणेचि पडे ऐसे तिहीं ॥ तें हुंकारें येकें ॥ २१२९ ॥

नाम घेतांचि वो म्हणे ॥ तै प्रहरां अडिचा व्यवधानें ॥
सांगीतलें नाही करणें ॥ केलें तें न संगे ॥ २१३० ॥

बहुतां काळां मित्रु भेटे ॥ तये देखांनिहीं न उठे ॥
मा पुसेक्षणुभरि गोमटें ॥ हें काये घडैल ॥ २१३१ ॥

आगि लागलाही मंदिरा ॥ परंतु दुःकाळ पडला उत्तरा ॥
प्राणावरि ये धनुर्धरा ॥ परि शब्दु नाही ॥ २१३२ ॥

पातीं सहसा न लगती ॥ लागलीं पुडती नु चलती ॥
अधरोष्ट्रावियोगु पुडती ॥ तो योगु नव्हे ॥ २१३३ ॥

फिटली या वस्त्र न संवरेतु ॥ स्तब्धु ऐसा येकु स्वस्थु ॥
तयांचा मिळे संघातु ॥ तेथें कैसे ॥ २१३४ ॥

व्यवसायवंतु तो काबाडी ॥ शीघ्र भोक्ता तो बाराडी ॥
अति बोलिका तो तांतडी ॥ कार्याचा नाशकु ॥ २१३५ ॥

दक्षु दिसे आसक्तु ॥ तेथे परमाणसी विरक्तु ॥
ज्ञानाचा नेणे जो प्रवर्तु ॥ जीवन्मुक्तु तो ॥ २१३६ ॥

बोले तयांसी तो हळुवटु ॥ न बोले लब्धु तो घनवटु ॥
दीर्घसूत्री तो सुष्टु ॥ त्वरेचा अनर्गळ ॥ २१३७ ॥

कर्मी अथवा पूजा करिता ॥ अळसी तो सांग कर्ता ॥
तेथं येक माने बहुतां ॥ तेंचि प्रतिष्ठे ॥ २१३८ ॥

ऐसे येक स्वभावें ॥ सहज स्तब्ध जाणावे ॥
येकां परकार्य न करवे ॥ ते पूर्वी सांगीतले ॥ २१३९ ॥

ऐसें न बोलावें कव्हणी ॥ स्तब्धता असुरांचां स्छानी ॥
तो स्वभावदोषु वांचूंनि ॥ अपराधु नव्हे ॥ २१४० ॥

पांगुळें कैसे चालावें ॥ अंधे कासे न पाहावें ॥
ऐसिया ईश्वरें दंडावें हें ॥ अनुचित की ॥ २१४१ ॥

तैसीया आक्षेपा परिहारु ॥ जरि तयां गर्वु अहंकारु ॥
नसता तै सर्वेश्वरु ॥ क्षमा करिता ॥ २१४२ ॥

हा हा इश्वरा काये जालें ॥ हे स्तब्धपण माते लागलें ॥
भक्ती अंतर पडिलें ॥ काये करु ॥ २१४३ ॥

ऐसा बोलता नरु ॥ तै रक्षिता सर्वेश्वरु ॥
आतां अर्जुना विचारु ॥ कैसा असुरांचा ॥ २१४४ ॥

**॥ धनमानमदान्विताः ॥ ००० ॥**

तरि धनमानमदान्वियें ॥ अनम्रत्व तें येक आहे ॥
तें असुरांचां आंगीं पाहे ॥ वर्ते पांडुपुत्रा ॥ २१४५ ॥

मद्य प्राशी मदिरु ॥ तयातें पडे विसरु ॥
तैसा मदु अहंकारु ॥ तो आवेशु तयाचा ॥ २१४६ ॥

मद्य माजवी माणुसातें ॥ तैसेंचि वस्तु मात्र जाण निरुतें ॥
आतां रोकडी प्रतीति ॥ तूतें सांगिजैल ॥ २१४७ ॥

विद्याहीनाचां शरीरीं ॥ नाही मदाची सामग्री ॥
मग विद्येचा अभ्यासु करी ॥ योग्य होये ॥ २१४८ ॥

तो दुजया नाणी दृष्टी ॥ साधू देखोंनि न उठी ॥
योग्यता माझी मोटी ॥ म्हणौनियां ॥ २१४९ ॥

पूर्विलां नोळखे मित्रांतें ॥ न भजे माता पितरांतें ॥
चोरी आपुलीया गुरुतें ॥ ऐसा मदु ॥ २१५० ॥

येकां लागला संन्यासें ॥ येकां नसुधे न साधु वेषें ॥
येकां ज्ञाने बहुवशें ॥ जोडला मदु ॥ २१५१ ॥

येकांतें आली संपदा ॥ तेचि कारण जाली मदा ॥
येक वयेंचि बहुधा ॥ मदग्रस्थ ॥ २१५२ ॥

तैसे आसुर हे समस्त ॥ जाले असता धनवंत ॥
येर ज्ञानसमस्त ॥ तन्मतें नसे ॥ २१५३ ॥

येणसी माझी सामग्री ॥ इतुली आथी कवणाधरीं ॥
दासदासी आतुबाहेरि ॥ माझया घरा ॥ २१५४ ॥

द्रव्या जाले बहुसाल ॥ ममत्वें सेविलें तें हळाहळ ॥
तेणें शरीर जाले विकळ ॥ मदें अहंकारे ॥ २१५५ ॥

मी येकु लक्ष्मीवंतु ॥ राजमान्यु समर्थु ॥
कार्यकर्त्ता युक्तिवंतु ॥ अपाडेंसी ॥ २१५६ ॥

ऐसा धनयोगें अर्जुना ॥ करी आपुला नरु भावना ॥
तो धनाभिमानु विचक्षणा ॥ आतां मदु ॥ २१५७ ॥

दुजया नाणणें दृष्टी ॥ नमनें इतराची गोष्टी ॥
गर्व बहुसाल पोटीं ॥ तो मदु जाणावा ॥ २१५८ ॥

लक्ष्मीपासाव दोघो जाले ॥ असुर तयांते मीनलें ॥
म्हणौनि अनम्र आतले ॥ तेचि स्तब्धता ॥ २१५९ ॥

यया देखोनि म्या उठावें ॥ समान येणेंसी बोलावें ॥
आपणा उचितचि नव्हे ॥ तुम्ही हें वचन ॥ २१६० ॥

न ये तरि हा काये करील ॥ नेंदीं तरि कैसा घेइल ॥
न मनी तरि सांगैल ॥ कवणाप्रति ॥ २१६१ ॥

नमस्काराकडे पाहाणें ॥ प्रति नमस्कारें लाजीरवाणें ॥
येणे न करुंनि काये करणें ॥ माते वंदन ॥ २१६२ ॥

यायें आइकोनि काये चाड ॥ याची काइसी मातें भीड ॥
ऐसे कार्यार्थी उदंड ॥ कवणेंसी बोलिजे ॥ २१६३ ॥

एवं धनापासाव मानु मदु ॥ दोहींचा जाला उद्वेधु ॥
तेहीं आन्वितु प्रसिद्धु ॥ असरु जनु ॥ २१६४ ॥

म्हणौनि आत्मभावित सर्वदा ॥ अनम्रस्तब्ध सदा ॥
ते कवण कर्मे शुद्धा ॥ कर्ते होती ॥ २१६५ ॥

॥ ते ॥ ००० ॥

ते असुर समस्त ॥ धन मान मदान्वित ॥
अपार देखोनि वित्त ॥ काये म्हणती ॥ २१६६ ॥

निक्षेप जाले बहुसाल ॥ द्रव्य उचंबळलें प्रबळ ॥
उदरें खातें केवळ ॥ कांहीचि न सरे ॥ २१६७ ॥

तरि येक करावें वर्म ॥ जनी होये जेणे नाम ॥
कीर्ती वाढे परम ॥ ख्याति होये ॥ २१६८ ॥

ऐसें बोलिले येक ॥ तें होये म्हणती सकळैक ॥
धनाभिमाने अधिक ॥ म्हणौनियां ॥ २१६९ ॥

धनमानाचेनि अतिमानें ॥ तेहीं आश्रयिलीं उदारपणें ॥
ना म्हणैल तया उणें ॥ ऐसें बोलणे ॥ २१७० ॥

पाहो कवण काये वेचील ॥ कैसा धर्मु करील ॥
कवणाची ख्याती होईल ॥ दिगंतरी यये ॥ २१७१ ॥

ऐसें म्हणौनि निघाले ॥ येकाहूंनि येक आगळे ॥
मग ते काय करुं लागले ॥ आइके अर्जुना ॥ २१७२ ॥

**॥ नामयज्ञैर्यजंते ॥ ००० ॥**

नामे रुढ जे जे याग ॥ सांग अथवा व्यंग ॥
तेही यजिता अभंग ॥ देवताचक्र ॥ २१७३ ॥

येकी रुद्र आरंभिले ॥ येकीं अतिरुद्र संपादिले ॥
येकीं लक्ष होम केले ॥ नामालागी ॥ २१७४ ॥

येकीं आरंभिले वाजपेय ॥ येकीं सोमयाग श्रेय ॥
येकीं ते राजसूय ॥ याग आरंभिले ॥ २१७५ ॥

अश्वमेध नरमेध ॥ इत्यादि याग बहुविध ॥
रुढीचे जे जे प्रसिद्ध ॥ ते ते आचारती ॥ २१७६ ॥

भाटा देती दक्षिणा ॥ कवि कर्तया विचक्षणा ॥
पदीं प्रबंधी आपणा ॥ वाखाणविती ॥ २१७७ ॥

विवाहो मांडूनी समर्थेसीं ॥ तेथ चढोनि अभिमानासि ॥
प्रवर्तले अर्थ नाशासि ॥ उगेचि येक ॥ २१७८ ॥

नटावयां देती वस्त्रे ॥ तेथे दुजे धनाहंकारे ॥
पट्टकुळें अपारें ॥ तींचि वोडविती ॥ २१७९ ॥

येकी वोवाळीलें स्वर्ण ॥ दुजीं केलें अश्वदान ॥
यापरी सभा जिंकिली म्हणौन ॥ संतोषती ॥ २१८० ॥

नामाचे पात्र पाहोंन ॥ तयातेंचि देती दान ॥
येर दुर्बळ ब्राह्मण ॥ मारुंनि दवडिती ॥ २१८१ ॥

समर्था घालितां अन्नें ॥ नाम पुढैल अतिमाने ॥
म्हणौनि तयां कारणें ॥ प्रचिती येक ॥ २१८२ ॥

हरुंनि दुर्बलांची धनें ॥ वेचिती नावाकारणें ॥
पांथां करिती पादत्राणें ॥ वधूंनि पशु ॥ २१८३ ॥

येकांतें देउंनि दुःख ॥ उपजविती येका सुख ॥
नामाचे रुढ धनिक ॥ तयां पूजिती ॥ २१८४ ॥

आराधनेचां ठांइ ॥ अन्नार्थी येकुही नाही ॥
सुहृदय मित्र जावाई ॥ ऐसे लोक ॥ २१८५ ॥

एवं यज्ञदान पूजन ॥ नाम रुढ करिती आचरण ॥
ऐसी या कवण कारण ॥ तेंचि आइक ॥ २१८६ ॥

॥ दंभेन ॥ ००० ॥

धर्मु अर्थु कामु मोक्षु ॥ हा नव्हे जयांचा पक्षु ॥
ते सकळ आचारु प्रत्यक्षु ॥ दंभेचि करिती ॥ २१८७ ॥

मी भक्तु ऐसें दिसावें ॥ दीक्षितु मातें म्हणावें ॥
माझें आचरण कळावें ॥ ययांलोकां ॥ २१८८ ॥

सर्वांहूनि मी आगळा ॥ जना दिसावें ऐसें डोळां ॥
विश्व म्हणैल भला ॥ भला हेंचि थोर ॥ २१८९ ॥

थोडेंचि आचरे देहीं ॥ बाहेरि दावी बहु कांही ॥
यया दंभाचाचि जाण इं ॥ आश्रयो तया ॥ २१९० ॥

जना देखतां आवारु ॥ जना देखतां उदारु ॥
जना देखतां विचारु ॥ ऐसें दावी ॥ २१९१ ॥

जना देखतां हरिदासु ॥ भक्तीचा दावी सोसु ॥
स्वमुखें बोले प्रेमरसु ॥ निजहृदयीचा ॥ २१९२ ॥

स्ममुखें सांगे नाम ॥ स्वमुखें सांगे कर्म ॥
यापरी दंभेंचि जाण वर्म ॥ आचरे याग ॥ २१९३ ॥

॥ अविधिपूर्वकं ॥ ००० ॥

तेथे विधु तो कैंचा आला ॥ अविधु यागीं संपादिला ॥
लोक दृष्टींचि जो लागला ॥ कर्म दांउ ॥ २१९४ ॥

कैंची संध्या कैंचें स्नान ॥ उगेंचि गंध विलेपूंन ॥
जपीं बैसले ब्राह्मण ॥ निद्रा करिती ॥ २१९५ ॥

गृहस्के केली निद्रा ॥ उठिला अस्तमानी येक सरा ॥
ते व्हेळी अन्नाचाचि दरारा ॥ धांवती जपिये ॥ २१९६ ॥

जैसा जपु तैसें देणें ॥ खरें तांबयाचें येक नाणें ॥
आशंका करावी कवणें ॥ सकळ सारिखे ॥ २१९७ ॥

थोडें वेचोंनि बहु दिसे ॥ गृहस्थु म्हणें सांगा ऐसें ॥
येरां सहजचि ज्ञान नसे ॥ वैदिकांतें ॥ २१९८ ॥

गलबलाचि बहुसालु ॥ च्यान्हि दिवस कोल्हाळु ॥
इतुलेनि संपादिला खेळु ॥ महायागाचा ॥ २१९९ ॥

सेवा घेउंनि दान देणें ॥ देव्हाऱ्या उगाचि शृंघारणें ॥
यावा कर्मठाचा दांवणें ॥ अंतरी फोक ॥ २२०० ॥

मंत्रहीन द्रव्यहीन क्रियाहीन ॥ अकाळींचि करिती हवन ॥
वेदा ज्ञाते ॥ २२०१ ॥

तूं म्हणसील ऐसें वचन ॥ जे वेचावें तें वेचूंन ॥
सांग न करावया कारण ॥ तें काये असे ॥ २२०२ ॥

तरि अर्जुना अवधारीं ॥ सत्वगुणु नाहीं शरीरीं ॥
आतां कवणु गुण असुरी ॥ आश्रयिले असती ॥ २२०३ ॥

**॥ श्लोक ॥**

अहंकारं बल दर्प कामं क्रोधं च संश्रिताः ।
मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥

**॥ अहंकारं ॥ ००० ॥**

मी येकु जाणता सर्वज्ञु ॥ कर्ता कार्यालागी निपुणु ॥
माझा लागतां स्वभाऊँ गुणु ॥ अपार कष्ट ॥ २२०४ ॥

माझी वित्पत्ति मीचि जाणें ॥ नमने येराचें कवणें ॥
पडैल जे व्हेलीं वेचणें ॥ ते व्हेलीं न सरें मागां ॥ २२०५ ॥

म्या आपुलिया आंगवणा ॥ मेरु केला ठेंगणा ॥
मोल नाहीं सहिष्णुपणा ॥ माझ या कीं ॥ २२०६ ॥

भक्तांमाजि मी अग्रिकु ॥ ज्ञानी वैराग्य पूर्वकु ॥
ऐसा कवणु जो विवेकु ॥ मातें सांगैल ॥ २२०७ ॥

विचित्र माझी लीळा ॥ ह्दयीचा बहु मी कोवळा ॥
पाळकु पोषकु लोकपाळा ॥ ईश्वरु मी ॥ २२०८ ॥

निर्णयो पुसावा मातें ॥ उपदेशावें म्याचि लोकांतें ॥
मातें नकळे ऐसें तें ॥ विशिष्ट काये ॥ २२०९ ॥

ऐसें सर्वापक्षी योग्यपण ॥ धरुंनि दावी मीपण ॥
तें एक अहंकरण ॥ पांडुपुत्रा ॥ २२१० ॥

आपुलेनिचि कुमते ॥ आश्रयिलें अहंकार ययातें ॥
तो कां न सोडवे येरांते ॥ ऐसें म्हणसील ॥ २२११ ॥

॥ बळं ॥ ००० ॥

तरि दुजयाचें बोलणें ॥ नाइकणें युक्ति ने घेणें ॥
परि तंवं आग्रहो करणे ॥ या नावें बळ ॥ २२१२ ॥

तया बळातें आश्रयिलें ॥ आग्रहा असें पुढें केलें ॥
जाण तें माणूस न बोले ॥ ऐसियासीं ॥ २२१३ ॥

आग्रहपूर्वकु अहंकारु ॥ तेणेसीं बोलता श्रमु थोरु ॥
जैसा मातला खरु ॥ नीती ते सांडी ॥ २२१४ ॥

येकें म्हणितलें हें घडे ॥ तें आपण म्हणावेचि न घडे ॥
वचन नीट अथवा वांकुडें ॥ परि वादु न संडी ॥ २२१५ ॥

येके म्हणितले अघटमान ॥ तेंचि करावें घटमान ॥
युक्ति पावली ते प्रमाण ॥ जालोंचि की ॥ २२१६ ॥

युक्तीं युक्ति जंवं टाके ॥ तंवं तो बोले विवेकें ॥
युक्ति राहे मग तवं कें ॥ वादु करी ॥ २२१७ ॥

वादीही दिसे आगळा ॥ मग आग्रहीं ये अंगवळा ॥
दोहीं हाती धरुंनि गळा ॥ मारुं पाहे ॥ २२१८ ॥

तितुलेंनि वादी सुटला ॥ आग्रही झोंबो आला ॥
तो आंगबळें प्रवर्तला ॥ महीषी सुतु ॥ २२१९ ॥

आंगबळें ही तो ना कळे ॥ तै मरे परि आग्रही न पले ॥
तयाची वर्मे बोले ॥ बळें उणा ॥ २२२० ॥

तुझा पिता गोवारी ॥ माता विचरे परनरीं ॥
हें देखोनि सेजारीं ॥ गजंबु केला ॥ २२२१ ॥

तुवां अन्याय केले ॥ ते सांगैन राहे उगळें ॥
नवे राजदूत आले ॥ ठकसी कासया ॥ २२२२ ॥

येकें म्हणितलें दिनमान ॥ ते येणे म्हणावें निसिमान ॥
प्रत्यक्ष तें प्रमाण ॥ न मनी आग्रही ॥ २२२३ ॥

दिवसु हें प्रत्यक्ष नेणें ॥ परि रात्रि हे न संडी बोलणे ॥
उगाचि आधारु म्हणे ॥ प्रकाशासि ॥ २२२४ ॥

करि म्हणिजे तें न करणें ॥ नको म्हणितलें तें करणें ॥
आपुलें चित्त वाढवणें ॥ तें आग्रह बळे ॥ २२२५ ॥

आग्रहें वाजे आलु ॥ परि न संडी आपुला बोलु ॥
तेणें आग्रहे चांडाळु ॥ पतितु होये ॥ २२२६ ॥

गुरुसीं प्रवर्ते वादा ॥ वादु कुंठता क्रोधा ॥
मग बोलों नयेसा एर बाधा ॥ बोलु बोले ॥ २२२७ ॥

मातां पितरांसीं दुराग्रहो ॥ करूंनि तोडी स्नेहो ॥
वर्मे बोले पाहा हो ॥ म्हणें जनातें ॥ २२२८ ॥

दुजयाचें हो म्हणणें ॥ भीडायुक्ती दाटणे ॥
तयाहूनि माने मरणें ॥ विश्रांती तया ॥ २२२९ ॥

खळखळां उदरीं कढे ॥ तोंड करी वांकुडे ॥
हळुचि कां मागें पुढें ॥ निराकरीतें ॥ २२३० ॥

काळांतरी तऱ्ही दुणावी ॥ आपुलें सत्य करूंनि दावी ॥
बोलीले नवीन जीवी ॥ नाही विश्रांति ॥ २२३१ ॥

आग्रही कोडे धनुर्धरा ॥ तया रात्री नये निद्रा ॥
आतां आपुला शब्दु खरा ॥ जेणें होये ॥ २२३२ ॥

तैसे उपाय रचूंनि ॥ असत्या सत्यपण आणि ॥
आपुला शब्धु प्रतिष्ठुंनि ॥ सुखी होये ॥ २२३३ ॥

शब्दा आलें उणेपण ॥ तें मरणाहूंनि असाधारण ॥
आपुले प्रतिष्ठे वचन ॥ तै परम लाभु तो ॥ २२३४ ॥

धर्मु अर्थु कामु मोक्षु ॥ तो जो आपुला पक्षु ॥
मिथ्याही परि प्रत्यक्षु ॥ सत्य दिसे ॥ २२३५ ॥

ऐसिया अहंकारा आश्रयिलें ॥ ऐसिया आग्रह बळा घेले ॥
असुरी स्वहिंत वेचिले ॥ ययासाठी ॥ २२३६ ॥

तयांसीं कवणाचें चालैल ॥ साधून बोलती शांतशीळ ॥
आनयेक हळाहळ ॥ तयांचा देहीं ॥ २२३७ ॥

॥ दर्प ॥ ००० ॥

दर्पु म्हणिजे सुबुध्दी ॥ ज्ञान साधनाचा विरोधी ॥
तयातें आश्रयिलें संबंधी ॥ पापाचा जो ॥ २२३८ ॥

सन्मुख कवण बोलैल ॥ होये कां नव्हे म्हणैल ॥
थरथरा कांपती सकळ ॥ देखोनियां ॥ २२३९ ॥

शांतीचा नाही लेशु ॥ दर्पा जाला असतां पैसु ॥
दृष्टीपुढूंनि पुरूषु ॥ बोलों न शकें ॥ २२४० ॥

उग्रा दृष्टी पाहाणें ॥ उग्रें शब्दें पाचारणें ॥
उग्र होउनि असणें ॥ सर्वकाळ ॥ २२४१ ॥

दर्पी जे तो दर्पु जाण ॥ प्रतिबिंबिजे गा आपण ॥
यये अर्थी सांगैन ॥ दृष्टांतु येकु ॥ २२४२ ॥

महा अग्नीचा कल्लोळु ॥ प्रदीपु असतां ज्वाळु ॥
पासीं पदार्थु आळुमाळु ॥ येउ पुरे ॥ २२४३ ॥

तयातें लागे भडका ॥ आपणूचि होये तेथ असका ॥
स्वतेजे नुरवी आणिका ॥ भस्म करी ॥ २२४४ ॥

तेवि जयाचेनि प्रतापें ॥ दुजें माणूस करपे ॥
असे आंगाचेनि दीपें ॥ दर्पशीळु ॥ २२४५ ॥

कीं विषाची केवळ कांडी ॥ सेवी तयाची मुरकुंडी ॥
पडे ऐसें तें कुंडी ॥ मारक संचरे ॥ २२४६ ॥

तैसा जयाचा स्वभाऊ ॥ विश्रांती नाथी ठाऊ ॥
न चले दुजयाचें भाऊ ॥ जये करपोनि ॥ २२४७ ॥

हां रे म्हणतांचि मरण ॥ दृष्टी पाहता जळे त्रुण ॥
न साहे दुजयाचें वचन ॥ असुरांसी ॥ २२४८ ॥

नरकाचा जैसा वासु ॥ तैसा सेवितां तो पुरूषु ॥
नाना विषांचा रसु ॥ तो सिवोंचि नये ॥ २२४९ ॥

केवळ आपुले केलें ॥ मोडी तयां मरण आलें ॥
आणि परकृत नाहीं मोडिलें ॥ तंवं विश्रांति कैंची ॥ २२५० ॥

पासीं उभें न राहिजे ॥ ऐसें साधूतें उपजे ॥
आतां सांग तया उपदेशिजे ॥ कवणेहीत ॥ २२५१ ॥

तयातें दृष्टी न पाहावें ॥ तेणेंसी शब्दु न बोलवे ॥
तो न साहे न साहावे ॥ तयाचा संगु ॥ २२५२ ॥

आतां तो आपणूचि उमजैल ॥ ऐसें जे मनी धरिसील ॥
तरि आन येक नि नाशमूळ ॥ तेणें आश्रयिलें ॥ २२५३ ॥

॥ कामं ॥ ००० ॥

तें जरि म्हणसील कवण ॥ तरि काम ऐसें साच जाण ॥
आतां कामातुराचें मन ॥ नित्य कैसें ॥ २२५४ ॥

क्रीडा खेळण बाळपणी ॥ तें सोबिले मामा जाण मनी ॥
तंवं स्त्री कामु योनी ॥ आश्रयिला असता ॥ २२५५ ॥

सुंदरा पाहिजे वनिता ॥ दिवा रात्री हेचि चिंता ॥
आनेपक्षें रंजवितां ॥ न रंजे चित्त ॥ २२५६ ॥

उत्तम भक्षी सदन्न ॥ तेणें शांत नव्हे तें मन ॥
कामना होये गहन ॥ मन्मथाची ॥ २२५७ ॥

येकांती सेजी पहुडला ॥ तो इंगळावरि निदैला ॥
परिमळ सुमन माळा ॥ लागती भुजंग ॥ २२५८ ॥

जातां येतां मागें पुढे ॥ पाहोनि येकलेपणे रडे ॥
देखे पांखिरू वांचे जोडे ॥ दुःख करी ॥ २२५९ ॥

न सरे हिरण्यें ते चाड ॥ सुरस गायन अगोड ॥
श्रेष्ठांची सांडी भीड ॥ रागु करी ॥ २२६० ॥

गृहस्थां देखोनि बाणु ॥ लागे भेदे तेणें मनु ॥
प्रदिप्तु होये मदनु ॥ तो कवणे वारावा ॥ २२६१ ॥

आपुल्या आंगाकडे ॥ पाहोनि कामिकु रडे ॥
ऐसें तारूण्य वेडें ॥ केलें स्त्री कामे ॥ २२६२ ॥

ऐसी सोषितां यातना ॥ प्राप्त जाली अंगना ॥
विश्रांति जाली मना ॥ तंव येक आले ॥ २२६३ ॥

स्त्री कामे जो अळुका ॥ तया नरा नाहीं शंका ॥
धर्माधर्म विवेका ॥ सांडिले तेणें ॥ २२६४ ॥

दिवा रात्रौ स्त्रीसंगु ॥ क्षणार्थ न साहे वियोगु ॥
तेथें उपजला उद्योगु ॥ आश्रमाचा ॥ २२६५ ॥

मंदिर पाहिजे निराळें ॥ येरा संपर्कालागि वेगळें ॥
पाकास्स्थळ तें चांगलें ॥ केलेंचि पाहिजे ॥ २२६६ ॥

बाहेरि आंगण पट्टशाळा ॥ कै देखैन मी या डोळां ॥
रात्रि दिवसु उताविळा ॥ केंव्हा होइल ॥ २२६७ ॥

अश्वशाळा पाहिजे केली ॥ मंदिरा भवंती महापौळि ॥
दासी दास वेगळीं ॥ तयांची गृहें ॥ २२६८ ॥

सात दारवंटे विशाळ ॥ तितुलेही असावे द्वारपाळ ॥
मागें पुढें पूर्णजळ ॥ ऐसिया वापी ॥ २२६९ ॥

क्रीडावन तया वेगळें ॥ तें निपजावें येकेंचि काळें ॥
तेथे मंदीरे योजिलें ॥ तें सातां खणाचें ॥ २२७० ॥

वाढ तूचि आहे गृहकामु ॥ तंवं उपजता जाला अर्थकामु ॥
तेथें क्रीडे मनोधर्मु ॥ कामिकाचा ॥ २२७१ ॥

हिरण्या लागीया मांदुसा ॥ ध्या न्या महा बहुवशा ॥
घृत तंडुळादिकु ऐसा ॥ सिध्द संग्रहो ॥ २२७२ ॥

तया लागि हे वोवरे ॥ यीं वस्त्रगृहें इ भांडारें ॥
येथ न रिघावे दुसरें ॥ येकें वांचूंनि ॥ २२७३ ॥

अश्वबांधले स्थानी ॥ येर पशु कांरे अंगणी ॥
गोठा ययां लागूंनि ॥ वेगळेंचि असतां ॥ २२७४ ॥

लेखा बुझाविति ब्राह्मण ॥ तेहीं करावें तेंचि लेखन ॥
ऐसी कामना गहन ॥ वाढत असतां ॥ २२७५ ॥

राजा साधावा सेवने ॥ परिवारू जिंकावा यत्नें ॥
स्वामित्व जोडावें म्हणें ॥ सकळां देशांचें ॥ २२७६ ॥

निर्वैर करावी राणीव ॥ पदार्थ असावे सिध्द सर्व ॥
सर्वत्र माझेचि नांव ॥ रूढ होआवें ॥ २२७७ ॥

माझी मंदिरें तिखाणी ॥ चौखाणी पांच सा सप्तखाणी ॥
येरां मित्रां दुखणी ॥ गोत्रजा देइन ॥ २२७८ ॥

हा कामु होतुचि आहे ॥ तंवं पुत्र कामु बाधिता होये ॥
रात्रि दिवसु हाये हाये ॥ ऐसें म्हणतां ॥ २२७९ ॥

कन्यापुत्र अपार ॥ जालेत दंग सोइरे येर ॥
नामाचे धनीक थोर ॥ थोर संपादले ॥ २२८० ॥

आतां गोमटे तयांचें ॥ तया कारणें देशांचें ॥
देशां कारणें रायांचें ॥ सोषावें पडे ॥ २२८१ ॥

तारूण्य भरूही वोसरला ॥ तऱ्हीं विविधु कामु असे पिकला ॥
तेणें पुरूषु मोहला ॥ तो कवणें उमजवावा ॥ २२८२ ॥

नावडे दुजयाची सिकवण ॥ धरिलें तें न सोडी मन ॥
पासीं आलेंहीं मरण ॥ कामु न संडी ॥ २२८३ ॥

मदिरू जैसा न बोधे ॥ कामीकु कवणातें साधे ॥
भोगिलेवीण अंधे ॥ इंद्रिये न वळती ॥ २२८४ ॥

कामातें आश्रयिलें जेणें ॥ पुरे गा तेणेसीं बोलणें ॥
अर्थी गुंतला मने ॥ तो अधिकारी नव्हे ॥ २२८५ ॥

याही वरि बोलावें ॥ तरि आनयेक विघ्न तेथें संभवे ॥
पुससील तरि स्वभावें ॥ सांगिजैल ॥ २२८६ ॥

॥ क्रोधंच ॥ ०००॥

क्रोधु म्हणिजे प्रळयंकरू ॥ जेणें खरा केला रूद्रु ॥
तयातें आश्रयिले निर्धारू ॥ ऐसें असता ॥ २२८७ ॥

तयाचिया संदे न वर्ततां ॥ अनारिसें कांहीं बोलतां ॥
क्रोधे नाही वित्त करतां ॥ क्षणार्थ तया ॥ २२८८ ॥

क्रोधी बैसला पासीं ॥ जाये कवणा प्राप्ति ऐसी ॥
आगि जळे जयासि ॥ देखोनियां ॥ २२८९ ॥

अवज्ञा मातापितारांची ॥ क्रोधें करविली गुरूचि ॥
पूजा भंगिली देवाची ॥ तो हा क्रोधु ॥ २२९० ॥

हत्या ययाचें करणे ॥ पापपुण्य ज्ञान हरणें ॥
नरकसागराप्रति नेणें ॥ उपासकासी ॥ २२९१ ॥

विभ्रमें दृष्टि माल्वे ॥ हृदयीं संतापु काल्वे ॥
बुध्दी तें पुरें न करवे ॥ ते भ्रांतु पडे ॥ २२९२ ॥

रोषावेषें उडाले ॥ मन जाउंनि आगी पडलें ॥
सर्वांगा दीपलागले ॥ संतापाचे ॥ २२९३ ॥

तेज भारी असंवर ॥ चळचळा कांपे शरीर ॥
नयनी लागे धार ॥ पाणियांची ॥ २२९४ ॥

कव्हणाचा बोलु आइके ॥ तेणें घृतें तैलादिकें ॥
प्रळयानळु तंव कें ॥ क्रोधु होये ॥ २२९५ ॥

गुणाचा करुंनि मातियरा ॥ लागला सुखाचिया घरा ॥
तो देखोंनि तया इतरा ॥ हृदयीं प्रवेशे ॥ २२९६ ॥

॥ संश्रिताः ॥ ००० ॥

अहंकारु बळ दोन्ही ॥ दर्पु कामु धनुःपाणी ॥
पांचवां क्रोधु निदानी ॥ सेवटील ॥ २२९७ ॥

ऐसियां गुणा आश्रयिलें ॥ तयांसीं कवण पां बोले ॥
असो आतां ते प्रवर्तले ॥ कवणा काजा ॥ २२९८ ॥

॥ मांप्रद्विषतः ॥ ००० ॥

निश्चये अर्जुना जाणिजसु ॥ माझा करिती पूर्णद्विषु ॥
रात्री दिवा विमर्षु ॥ तो माझेनि वैरें ॥ २२९९ ॥

आतां तू मानिसील मनी ॥ द्वेषु करिती कवणे स्छानी ॥
तूं अगोचरु निर्वाणी ॥ आत्मया रामा ॥ २३०० ॥

अगम्य तुझें स्छान मान ॥ द्वेषा योग्य नव्हे म्हणौन ॥
आणि सर्वात्म यां तुझें ज्ञान ॥ कैचें तयां ॥ २३०१ ॥

देवां दुर्लभ दर्शन ॥ न पवे वाचा बुद्धि मन ॥
आसुरु तंवं विषयी अज्ञान ॥ पातकी कीं ॥ २३०२ ॥

ते तूतें कैसे द्वेषिती ॥ कवणें स्छानी श्रीपती ॥
ऐसी करिसील उक्ति ॥ तरि सांगैन मी ॥ २३०३ ॥

॥ आत्मपरदेहेषु ॥ ००० ॥

असंगु आ नामी निराभासु ॥ प्रपंचु मत्सतयासा भासु ॥
सत्यें कीर्णे पाउसु ॥ मृगजळाचा जैसा ॥ २३०४ ॥
तैसें या विश्वाचें भान ॥ तेथें मज येकाचें साचपण ॥
आतां सर्वत्रु मी म्हणौन ॥ जाण निधरिं ॥ २३०५ ॥
गुणाश्रयो मी आत्मा ॥ स्व पर देहींचिदात्मा ॥
अंतमस्थु परमात्मा ॥ सर्व व्यापी ॥ २२०६ ॥
तया आत्मदेहीं परदेहीं ॥ माते द्वेषिती आईकई ॥
तो द्वेषु कैसा कायी ॥ हें जयी पुससील ॥ २३०७ ॥
स्वदेहीं मी अविनाशु ॥ संतु आत्मा स्वप्रकाशु ॥
तया मरणेंचि विनाशु ॥ बोलती मातें ॥ २३०८ ॥
आत्मदेहीं द्वेषु जाण ॥ तयाचें ऐसें हें चिन्ह ॥
आतां परदेहीं द्वेष्टेपण ॥ तेंचि कैसें ॥ २३०९ ॥
अखंड सर्वत्र माझी सत्ता ॥ आत्मदृष्टी ते नमनितां ॥
मानिती शून्य सिद्धांता ॥ ते परदेही द्वेष्टे ॥ २३१० ॥
आविवेका अहंकृती ॥ स्वदेही माते बाधती ॥
आणि परदेहीं मातें द्वेषिती ॥ तेणेंचि अहंकारें ॥ २३११ ॥
मी योग्यु हा अयोग्यु ॥ मी सभाग्यु हा अभाग्यु ॥
आत्मपरदेहीं योगु ॥ ऐसा द्वेषाचा ॥ २३१२ ॥
आशापाशीं मातें बांधोन ॥ आशेस्तव परपीडण ॥
ऐसें स्वपरदेहीं अधिष्ठान ॥ तेचि दूषिती ॥ २३१३ ॥
आग्रहे स्वदेही आकलीलें ॥ यकेदेशी देहीं बांधले ॥
आग्रहे परावें केलें ॥ खेदक्षीण ॥ २३१४ ॥
दर्पाचा लाविला मळु ॥ स्वदेहीं केलों मी कुश्चिळु ॥
आणि परदेही ता अनळु ॥ मातेंचि लाविला ॥ २३१५ ॥
विषयमळ काम पंकें ॥ मातें आत्मया लेपिले देखें ॥
मग परहिता असकें ॥ तेणें विधंसिलें ॥ २३१६ ॥
आत्मयां माते आपणा ॥ क्रोधाग्नीमाजि अर्जुना ॥
घालिती वैरी कामना ॥ न पुरे म्हणौनि ॥ २३१७ ॥

क्रोधाचें असंवरपण ॥ तें परदेहां करी पीडण ॥
यापरी आत्मपर देहीं दूषण ॥ आरंभिलें माझें ॥ २३१८ ॥

दोष आणि याचा संतापु ॥ क्रोधु कामु आरोपु ॥
भाला तो मारु विकल्पु ॥ तो काये करी ॥ २३१९ ॥

आधी खोंची आपणातें ॥ मग लोणे परदेहातें ॥
असो की जे अज्ञान मतें ॥ तें कार्य सकळ ॥ २३२० ॥

परनाशाचि प्रवृत्ति तेथे ॥ स्वनाशु सहज आथी ॥
एवं स्वपरघातु करिती ॥ असुर हे ॥ २३२१ ॥

म्हणौनि स्वपर देहीं मातें ॥ निंदितीं ते येणे मतें ॥
काये म्हणें मी तयांतें ॥ जाण पार्था ॥ २३२२ ॥

॥ अभ्यसूयकाः ॥ ००० ॥

शास्त्र बाही ते निंदक ॥ स्वधर्मी दोषारोपक ॥
जयांचें मत अवैदिक ॥ माझी निंदा ॥ २३२३ ॥

देहाभिमानें आत्मनिंदा ॥ विद्याभिमानें परनिंदा ॥
कुमताभिमानें सर्वनिंदा ॥ करिती आसुर ॥ २३२४ ॥

अशून्य शून्य म्हणती ॥ पूर्णा अपूर्णता आरोपिति ॥
अविनाशातें नाशिती ॥ आपुलेनि मातें ॥ २३२५ ॥

वेदशास्त्री अविश्वासु ॥ कर्मी आरोपिती दोषु ॥
वादें उपजविती त्रासु ॥ स्व पर देहीं ॥ २३२६ ॥

सिद्धांतीं माझें दूषण ॥ नाहीं स्वरुप प्रतिपादन ॥
कर्मभक्ति वैराग्यसाधन ॥ योगूचि नव्हे ॥ २३२७ ॥

ऐसियां ययां निंदकां तें ॥ तुजपासाव कवण भय वर्ते ॥
म्हणसील तरि निरुतें ॥ आइकें वचन ॥ २३२८ ॥

॥ श्लोक ॥

तानहं द्विषतः क्रुरान्संसारेषु नराधमान् ।
क्षिपाम्यजस्त्रमशुभामासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥

ते असुरगण वेद बाही ॥ आस्त्रीं भाॐचि जया नाहीं ॥
आत्मसिद्धांतें आइकइं ॥ निपुण जाले ॥ २३२९ ॥

॥ विद्विषः ॥ ००० ॥

मग ते माझेचि द्वेष्टे ॥ वैरी साधूतें वोखटे ॥
द्रोही न चलती वाटे ॥ मत्प्राप्तीचिये ॥ २३३० ॥

॥ क्रूरान् ॥ ००० ॥

न साहे उपदेशाचे उत्तर ॥ स्वभावाचे अति क्रूर ॥
मनुष्य न होती व्याघ्र ॥ तामस ते ॥ २३३१ ॥

शब्देंचि येक मरती ॥ पाहातांचि गर्भगळती ॥
ऐसें पीडक यये क्षिती ॥ असुर ते ॥ २३३२ ॥

'॥ नराधमान ॥ ००० ॥

नरां अधमाहूंनि परम ॥ असुर नर अधम ॥
पापरुप कर्म ॥ जयांचां देहीं ॥ २३३३ ॥

शौचाचारें सांडवले ॥ हिंसक वैरी प्रवर्तले ॥
धर्माधर्म ज्ञान नाशिलें ॥ तामसीं तेही ॥ २३३४ ॥

देवद्रोही पितरद्रोही ॥ गुरुद्रोही सर्वद्रोही ॥
क्रोधें कामे आइकई ॥ पाप केले ॥ २२३५ ॥

नरांमाजि चांडाळु ॥ तेणें मानावा याचा विटाळु ॥
जो मदाश्रितांसीं उत्तळु ॥ बोलोनियां ॥ २३३६ ॥

देखे तो न करी स्नान ॥ तै तयाचें सुकृत क्षीण ॥
अहंकार दर्प गहन ॥ जयाचां देहीं ॥ २३३७ ॥

पांचही महापातकें ॥ घडती संभाषणें येकें ॥
म्हणौनि न बोलावें सात्विकें ॥ आग्रहशीलासीं ॥ २३३८ ॥

साधू कर्मी तो देखिजे ॥ तै पुडती आरंभु कीजे ॥
अंत्यजाहूंनि बोलिजे ॥ पापी आसूर ॥ २३४० ॥

नरांमाजि जो अधमु ॥ तयाचा पंथीं समागमु ॥
न संडी तयाचा धर्मु ॥ व्यर्थु होये ॥ २३४१ ॥

सुस्नातें नाठवावा मनी ॥ ना मने धावें धनुःपाणी ॥
कामीकु क्रोधी निदानी ॥ घातकी नरू ॥ २३४२ ॥

॥ अशुभान् ॥ ००० ॥

आठवतांचि जे प्रसंगी ॥ सकळें अशुभें आंगीं ॥
संचरती मग जगीं ॥ कीर्ती नाशे ॥ २३४३ ॥

मातें अर्जुना जो विसरला ॥ अहंकारी असे झाकला ॥
तो अशुभु भेटला ॥ मार्गु सांडावा ॥ २३४४ ॥

निर्नाशिकाचें दर्शन ॥ मूहूर्ते करितां गमन ॥
बरवें परि प्रसन्न वदन ॥ अशुभ याचें ॥ २३४५ ॥

आग्रहें परावयां छळी ॥ तो संस्कारावा चांडाळीं ॥
इतर पाप आंघोळी ॥ दुरि नव्हे ॥ २३४६ ॥

साभिमाने जो ताठा ॥ तयातें पाहे तो करंटा ॥
सामास न ये वाटा ॥ शुभाचिया ॥ २३४७ ॥

दंभे दर्पे जो धनवदु ॥ तयाचेनि संगे सेवदु ॥
सुकृता होये मर्कटु ॥ श्राध्दी जैसा ॥ २३४८ ॥

मनुजाचि ऐसा दिसे ॥ तरि वानरू कांहीं उणा असे ॥
आकारू भजती माणुसें ॥ तीं मूर्खे जाणावीं ॥ २३४९ ॥

शुभेसीं विरोधु करिती ॥ ते अशुभ जाण वीरपती ॥
संपर्कें शुभ नाशिती ॥ साधकांचें ॥ २३५० ॥

देवाळयीचें अस्थिखंड ॥ कवण काढील हे प्रचंड ॥
जेणें पुण्या हें झाड ॥ करूपोनि गेलें ॥ २३५१ ॥

पवित्रां लावी विटाळु ॥ सृष्टीमाजि हा चांडाळु ॥
कव्हणी न शके टाळु ॥ आसुरातें ॥ २३५२ ॥

॥ संसारेषु अहंक्षिपामि ॥ ००० ॥

मग मी या जनांचा हितकर्ता ॥ अवधान देई गा पार्था ॥
संसारी होये निक्षेपिता ॥ असुरांते ॥ २३५३ ॥

विप्र पंक्तीचा मुखावरी ॥ हांणोनि चांडाळु जयापरी ॥
दविडि जे तैसा संसारीं ॥ घातला हा ॥ २३५४ ॥

मुमुक्षा माजूंनि उठविला ॥ भक्तां माजूंनि दूरि केला ॥
देव सभे हा काउळा ॥ कोठें होता ॥ २३५५ ॥

आतां तूं ऐसें बोलसील ॥ सुखें तो संसारी असैल ॥
यितुलेनि तया केवळ ॥ कवण हानि ॥ २३५६ ॥

॥ आसुरीष्वैवयोनिषु ॥ ००० ॥

तरि अवधारिं गा वीरपती ॥ असुर योनी जया असती ॥
मी घालीं तयांप्रति ॥ असुरांतें ॥ २३५७ ॥

॥ अजस्त्रं ॥ ००० ॥

तेथूंनि पुडती परतणें ॥ नाहीं प्रकारें जेणें ॥
ऐसा मीं घालीं निर्वाणे ॥ तेय ठांइं ॥ २३५८ ॥

अथवीं बुडाला सागरी ॥ सूक्ष्म हरळ जयपरी ॥
तैसा तो बुडाला संसारी ॥ बाहेरी न पडे ॥ २३५९ ॥

तेणे असुर योनी संचरावें ॥ संसार सागरीं बुडावे ॥
मुमुक्ष्यामाजि न यावें ॥ कदा काळीं ॥ २३६० ॥

आतां तू ऐसें बोलसील ॥ आसुर देहीं तो सुखें असैल ॥
साधूंते पीडा करील ॥ निज स्वभावें ॥ २३६१ ॥

कवण कार्य तयाचे नाशले ॥ कवणें अंगे तुवां दंडिले ॥
कांहीचि न दिसे गेलें ॥ असुराचें ॥ २३६२ ॥

येसणा म्हणितला वैरी ॥ तो मागुता टेविला संसारी ॥
साधूतें पीडा करी ॥ ऐसा केला ॥ २३६३ ॥

॥ श्लोक ॥

असुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।
मामप्राप्येव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम ॥ २० ॥

तरीं अवधारी कुंतीनंदना ॥ वचन माझे अर्जुना ॥
तयाचा नाशु कळेना ॥ जो म्या केला ॥ २३६४ ॥

तयातें जाली हानि ॥ ते मीचि येकुं जाणें मनी ॥
ते आइकतांचि साधू जनी ॥ कां टळिजैल ॥ २३६५ ॥

तयां कैंचें सुख कें विश्रांति ॥ जीतु मारिला गा सुमती ॥
ऐसा दंडू कव्हणाप्रति ॥ म्या केलाचि नसे ॥ २३६६ ॥

वैरी वैरीयोतं सापडें ॥ तो न पाहे मागें पुढें ॥
मग हाणे शिरकमळ उडे ॥ जया परी ॥ २३६७ ॥

तैसा वैरी मातें सांपडला ॥ केवि राहों मी उगला ॥
मग ऐसा कांही साधिला ॥ जो होये म्हणिजे ॥ २३६८ ॥

येकें घाये बरे मरण ॥ परि म्या केलें बहुकठीण ॥
तें पुससील तरि सांगैन ॥ सावधानु ॥ २३६९ ॥

**॥ असुरींयोनिमापन्ना ॥ ००० ॥**

असुर संसारी लोटिला ॥ तो असुरिये योनी ते पावला ॥
ते असुर योनी नृपाळा ॥ कवण कैसी ॥ २३७० ॥

जनातें उपयुक्त तंव नव्हे ॥ आणि पीडक अतिस्वभावें ॥
उग्र अपवित्र जाणावे ॥ देह असुराचें ॥ २३७१ ॥

उपयुक्त नव्हे सर्वत्र ॥ आणि देह कवण अपवित्र ॥
तेचि आधी विचित्र ॥ तूतें सांगो ॥ २३७२ ॥

जठरिचे क्रीम कीट ॥ विष्टेमाजि वर्तती अप्रकट ॥
तेही न भरे पोट ॥ परि करिती बाधा ॥ २३७३ ॥

जेथें जेथें मांस सडे ॥ तेथे तेथें पडती कीडे ॥
मनुज स्वभावेंचि पीडे ॥ जयांचेनी ॥ २३७३ ॥

येक स्वेदज अंगावरी ॥ येक अपवित्र मळ सागरीं ॥
तैसेंचि गोमयीं जीव अनुपकारी ॥ कुश्चळत ॥ २३७५ ॥

उद्बीज फलीं अथवा जलीं ॥ पडती अन्नरसीं निर्मळी ॥
ते उपकारी हे बोली ॥ बोलोंचि नये ॥ २३७६ ॥

मुखक मुरकुट चांचण ॥ पाली सरड ढेंकूण ॥
गोंवी दावणवे आन ॥ कर्दम कीट ॥ २३७७ ॥

आरक्त पीत श्वेत कृष्ण ॥ इंगळी वृश्चिक गहन ॥
तै परपीडेचि लागूंन ॥ उदैजले ॥ २३७८ ॥

सकळा जनाचे तें दंदी ॥ असुर भूतविरोधी ॥
शांतु तोही वधी ॥ पापियांतें ॥ २३७९ ॥

येक निर्बुजविले धूम्रे ॥ येक समार्जने साक्षात्कारे ॥
येक उष्णोदकें बारे ॥ करपविले जीव ॥ २३८० ॥

येकांते देखोनि न सोडिती ॥ येकांपाहोंनि मारिती ॥
जाणोनि येकातें हाणती ॥ उपायें येक ॥ २३८१ ॥

येकी मक्षिका पिप्यलिका ॥ डांस जळकार्पण जळका ॥
यापरी जे बाधिती आणिका ॥ ते असुरजन ॥ २३८२ ॥

मीन मग विरोळे ॥ दर्दुर पाणकाडळे ॥
बक कवड्याल आगळे ॥ नाडे सावज ॥ २३८३ ॥

ऐसे परपीडक जन ॥ अनुपेगी अपवित्र जाण ॥
ययावेगळे आन श्वान ॥ शूकरादिका ॥ २३८४ ॥

कुकट वायस घारी ॥ पीडक गिध अवधारीं ॥
रक्ता मांसाचां आहारी ॥ पोषले जे ॥ २३८५ ॥

तरस जंबुक भालवा ॥ रींस अवधारी पांडवा ॥
लांडिगे आदि यया सर्वा ॥ मांसाचे आहार ॥ २३८६ ॥

असुर भुजंग अवघे ॥ देखे तो पाठीं लागें ॥
मग जयाचिये पाठीसीं रिघे ॥ तोही वैरी ॥ २३८७ ॥

व्याघ्र आला सहजे वना ॥ तो जन वैरी गा अर्जुना ॥
मखा वाटे कवणा ॥ असुरू तो ॥ २३८८ ॥

जयांचिसी धरी ॥ तोचि तयाचा वैरी ॥
मावांच वागा म्हणौनि धरीं ॥ रिघैल कवणांचा ॥ २३८९ ॥

यापरी पर रक्तें पर मांसें ॥ जीती पर पीडनें बव्हसें ॥
ते असुर जाण ऐसें ॥ देहधारी ॥ २३९० ॥

येर ते त्रुणचर धान्यचर ॥ पीडा न करिती साचार ॥
शरीरें सकळां उपकार ॥ जयांचेनि ॥ २३९१ ॥

अजा आवी गोमहीशी ॥ अश्वअश्वीनी निश्चयेंसीं ॥
गज वृषभ परियसीं ॥ न होती असुर ॥ २३९२ ॥

मृगें वानरें रोही ॥ त्रुणचरां असुरत्व नाहीं ॥
फळचर जाण सर्वही केवळ जे ॥ २३९३ ॥

ऐसिया योनी भ्रमता ॥ कर्मजा योनी समस्ता ॥
तया कर्मांतें क्षीणता ॥ भोगें जाली ॥ २३९४ ॥

कर्मेवांचूंनि पुडती यां योनीची प्राप्ति नाथी ॥
आतां तो कर्मसंग्रहो तयाप्रति कैंसेनि हो ॥ २३९५ ॥

दुष्कृतें कामेवांचूंनि ॥ तिया आसुरयोनीमाजि जाण ॥
असुरां नव्हें संक्रमण ॥ सर्वथैव ॥ २३९६ ॥

यालागि ययातें दंडिजे ॥ तरि दुष्कर्म आंगीं पाहिजे ॥
ते नरदेहेवीण न निपजे ॥ ऐसें असतां ॥ २३९७ ॥

तो मनुष्य देहाप्रति आणावा ॥ हें म्याचि कल्पिले गा पांडवा ॥
तूं म्हणसील वासुदेवा ॥ सुटेना कीं ॥ २३९८ ॥

अगा मनुष्य देहो हा सुष्टु ॥ संसार सागराचा सेवटु ॥
मोक्षपदाचा कांठु ॥ हाते पावता ॥ २३९९ ॥

येथें असुरू जै आला ॥ तै अवचट नाहीं कीं सुटला ॥
ऐसिया तुझिया बोला ॥ उत्तर अवधारी ॥ २४०० ॥

येकाधा घातला बंधनी ॥ तया इछा तंवं दंडुंनि ॥
पुडती आपणचि अन्नपाणी ॥ सिदोरी पुरवावी ॥ २४०१ ॥

पुनरपि आहे दंडावें ॥ तै देह तयाचें रक्षावे ॥
यालागि जीवनोपाया विचारावें ॥ पुरवावी सामग्री ॥ २४०२ ॥

तो करूंनि यातनेवेगळा ॥ पाइं न वेढे ऐसी शंकळा ॥
संभवता दूताचा पाळा ॥ जाइल कैसा ॥ २४०३ ॥

नगरामाजि हिंडविजे ॥ तेणें घरोघरी अन्नमेळविजे ॥
बहुतां दिनाची करविजे ॥ सामग्री त्या करावी ॥ २४०४ ॥

पुडती आणूंनि भोगस्छाना ॥ पाहिजे तैसी कीजे यातना ॥
तैसाचि वैरी हा अर्जुना ॥ असुरु नरू ॥ २४०५ ॥

नावेक यातना ठेउंनि ॥ मनुष्य लोकु दाविला नयनी ॥
करीं सामग्री म्हणौनि ॥ आज्ञा केली ॥ २४०६ ॥

पाइं अज्ञानाची शंकळा ॥ अन्यथा ज्ञानें बांधला डोळां ॥
घालुंनि अहंकारू गळा ॥ अवळिला असे ॥ २४०७ ॥

काम क्रोध दिधले संवें ॥ आता कैसेनि पळावें ॥
माघारा बांधला गर्वे ॥ दोही हाती ॥ २४०८ ॥

निंदा द्वेषें पसरी हातु ॥ आग्रहो मच्छरू परघातु ॥
येहीं उपायी जोडीतु ॥ सामग्रीतें ॥ २४०९ ॥

मागें संस्काराची दोरी ॥ ते बांधोनि तया जिव्हारीं ॥
रजोगुणे घेतला करी ॥ तेणे वा ॐ न पवे ॥ २४१० ॥

संताचिया मंदिरा जाये ॥ तेथ साधुनिं दासि बोला ॥
हे मछरू तो सरोंचि नये ॥ ऐसी सामग्री ॥ २४११ ॥

अवज्ञा गुरूने दीधली ॥ गुरू तल्पादिकें येणें मागीतली ॥
माता घेउंनि आली ॥ मात्रा गमने ॥ २४१२ ॥

कव्हणी स्तेय वोपिले ॥ ब्रह्महत्येचें दान केलें ॥
सुरापान सापडलें ॥ कोठें कोठे ॥ २४१३ ॥

संगती मिळाले काहीं ॥ द्वेषु न माये करीं दोहीं ॥
मग अनाचारू तोही ॥ प्राप्त जाला ॥ २४१४ ॥

ऐसे अल्पबध्द ते भ्रमती ॥ दारोदार ते ग्रासु मेळविति ॥
अत्यंत बध्द ते नुठी ती ॥ ठांइंहूंनी ॥ २४१५ ॥

गर्वें बाधलें सर्वांगीं ॥ अहंकारे मूर्छना आंगीं ॥
बोलों न लाहाती जगीं ॥ ऐसें जाले ॥ २४१६ ॥

दंभे दाटलेपणें ॥ करितांचि नये पेणें ॥
मग उदारें ती सुजाणें ॥ तेथेंचि येती ॥ २४१७ ॥

साधावें कृपाळपण ॥ तेथ साधलें वा मानखंडन ॥
गर्वें बांधले यातें ब्राह्मण ॥ देती दुष्कृतें ॥ २४१८ ॥

निष्ठुरत्वें जोडली हिंसा ॥ ते सरैल की दिवसा ॥
वरि आग्रहें गुडाकेशा ॥ पतन जोडिलें ॥ २४१९ ॥

ऐसें नानाविध दुष्कृत ॥ जोडिलें जोडी असंख्यात ॥
मग राहता नये तेथ ॥ अकालु जाला ॥ २४२० ॥

पुडती तें देह विसर्जनी ॥ त्या योनीमाजि घालुंनि ॥
यातना भोगवीं धनु:पाणी ॥ पाहिजे तैसी ॥ २४२१ ॥

जन्मदु:खे गर्भदु:खे ॥ जरादु:खे मरणदु:खें ॥
व्याधिदु:खे आधिदु:खें ॥ भोगवी नाना ॥ २४२२ ॥

की त्यांचें मुखीं धरवीं मळ ॥ की त्यांचे सेववी केवळ ॥
की त्यां योनीचे विटाळ ॥ त्या माजि घालीं ॥ २४२३ ॥

यमयातना राजयातना ॥ प्रळय व्याथा भोगवीं नाना ॥
ऐसां ते कर्म सरे अर्जुना ॥ न सोडीं तंवं ॥ २४२४ ॥

पुडती नरदेहा आणूंनि ॥ पुडती सामग्री करउंनि ॥
पुडती त्या पापयोनी ॥ त्यांमाजि घालीं ॥ २४२५ ॥

ऐसें आरंभले असतां ॥ तूं म्हणसील पार्था ॥
यये मनुजदेहीं असतां ॥ असुरू जनु ॥ २४२६ ॥

करी तुझें आराधन ॥ प्रसंगें येकें जाण ॥
तै कैसें नव्हे बंधमोचन ॥ प्राणीयांसी ॥ २४२७ ॥

तरि अवधान देइं वीरा ॥ वैरी भक्तु होये खरा ॥
तै सुटेल माये कसरा ॥ म्हणौनियां ॥ २४२८ ॥

तयाचां देहीं कामक्रोधु ॥ अभिमानुं मछर मदु ॥
पूर्व संस्कारें विविधु ॥ म्याचि ठेविले ॥ २४२९ ॥

तेही युक्त मातें भजतां ॥ बंधनचि मागे तो मागुता ॥
तो कामु पुरवी सर्वथा ॥ तयाचा मी ॥ २४३० ॥

अपार मागे देवद्रोहो ॥ वेदद्रोही शास्त्रद्रोहो ॥
साधुद्रोहो सर्वद्रोहो ॥ घडे जेणे ॥ २४३१ ॥

ऐसें भाग्य मागोनि असुरू ॥ होता होये हर्षनिर्भरू ॥
तंवं पापसामग्री या सागरू ॥ क्षणार्धें भरे ॥ २४३२ ॥

येरें जोडावें संवछरें ॥ तें जोडे या पलमात्रें ॥
आतां भोगिता बहुसाल मसरे ॥ नाना योनी ॥ २४३३ ॥

असुरें केलें भजन ॥ तें पापातेंचि होये कारण ॥
तयाचे दशशास्त्रपुराण ॥ हें ज्ञानचि खाये ॥ २४३४ ॥

ससंगेंचि मछरू ॥ ज्ञानबळेंचि अहंकारू ॥
तपोबळेंचि ईश्वरू ॥ मी वैरी जोडे ॥ २४३५ ॥

असुरें येक करावें ॥ उगलोंचि कर्म भोगावें ॥
करीन तोंचि पाहावें ॥ पांडुपुत्रा ॥ २४३६ ॥

आतां तूं ऐसें म्हणसील ॥ ऐसेनि तो कै सुटैल ॥
हेंचि ययाचें केवळ ॥ आइकें प्रतिवचन ॥ २४३७ ॥

॥ जन्मनिजन्मनिमूढा ॥ ००० ॥

जो जन्मु तो अज्ञान ॥ जो जन्मु तो पापगहन ॥
जो जन्मु तेथें असुरपण ॥ सुटेचिना ॥ २४३८ ॥

प्रतिजन्मी गा अर्जुना ॥ मातें नेणें आपणा ॥
आत्मयां आनंदघना ॥ देहात्म बुध्दी ॥ २४३९ ॥

मग आत्मज्ञाने पराज्ञान ॥ आत्मपराज्ञाने जें जाणपण ॥
तें पाषांड आसुरगण ॥ आश्रयिती अन्यथा ॥ २४४० ॥

आत्माबोधु सांजवले ॥ देखणे ते झांकती डोळे ॥
तेथें न्याहारू घेती ते आंधळे ॥ महापथिचे ॥ २४४१ ॥

येकचि तिमिर डोळांचें ॥ विश्वभरि भान भेदाचें ॥
ऐसें ते ज्ञान तयाचें ॥ काजा नये ॥ २४४२ ॥

असो गा माझें अज्ञान ॥ जन्मोजन्मी तया जाण ॥
मग असुर भावा कारण तेंचि जै ॥ २४४३ ॥

जन्मचिसरिसा कामक्रोधु ॥ निंदा मछरू मानु मदु ॥
ऐसा माझा अबोधु ॥ बाधी तया ॥ २४४४ ॥

असो अवधारीं वीरा ॥ असुरू तोचि खरा ॥
न ये न परते माघारा ॥ सुरू नव्हे ॥ २४४५ ॥

जीवत्वचि सदोष जालें ॥ अनादि संस्कारें बांधले ॥
तें न पालटे काहीं केले ॥ महा प्रळयीं हीं ॥ २४४६ ॥

॥ मामप्राप्येव ॥ ००० ॥

माझेनि अज्ञानें जाण ॥ माझी प्राप्ति तयांलागून ॥
कैची म्हणौनि जाण ॥ अंतरलेचि ते ॥ २४४७ ॥

मदाज्ञाने मदाप्राप्ति ॥ तयां कैसी होये गती ॥
हें पुससील वीरपती ॥ तरि आइकें वचन ॥ २४४८ ॥

॥ ततः ॥ ००० ॥

माझे अज्ञान सपूर्ण ॥ आतां होये जे शरीर ॥
तेथें आत्मयां निरंतर ॥ अप्राप्ति माझी ॥ २४४९ ॥

एवं माझिया अप्राप्ति शरीर ॥ तें प्राचिन क्षयें होये क्षर ॥
मग तदनंतरें पुढार ॥ कैसें होये ॥ २४५० ॥

॥ अधमांगर्तियाति ॥ ००० ॥

दुष्कृताचेनि आंगे ॥ जीउ उडाला संस्कारवेगें ॥
मग नरकार्णवीं रिघे ॥ कीटु होयें ॥ २४५१ ॥

मग असूर योनी बोलिलिया ॥ तिया अनुभउंनि अवधिया ॥
कर्मा जना धनंजया ॥ ये नरदेहाप्रति ॥ २४५२ ॥

तयाचें दुष्ट देह कैंसें ॥ चांडाळु पतीतु तो परियसें ॥
पुढें अधोगती होणें असे ॥ म्हणौनि होये ॥ २४५३ ॥

तया मोक्षु ना विचारू ॥ सुखाचा नव्हे संसारू ॥
स्वर्गसुख पामरू ॥ काये जाणैल ॥ २४५४ ॥

असो नरदेही माते नेणती ॥ तयांतें नाहीं आत्मप्राप्ति ॥
मग पावती अधम गती ॥ असुरजन ॥ २४५५ ॥

प्रथम नरकींचि पडे उडी ॥ मग क्रमेचि पाप परवडी ॥
असुर योनि जेवढी ॥ ती माजि रिघे ॥ २४५६ ॥

असुरां नाहीं मोक्षु ॥ ऐसाही येकाचां पक्षु ॥
परि तो नमनी दक्षु ॥ सर्वज्ञ श्रोता ॥ २४५७ ॥

असुरू भावीं कारण ॥ नरक प्राप्ती कवण गुण ॥
जयांचा करितां छेदन ॥ मोक्षु होये ॥ २४५८ ॥

तेचि गुण पांडुसुता ॥ सांगैन अवधारीं आतां ॥
तूं थोडेनिचि जाणता ॥ होसील बहु ॥ २४५९ ॥

पाल्हाळ करितां निरोपण ॥ सिध्दांता धरू न शके मन ॥
मग केलें तें निरोपण ॥ ह्रदयीं न राहे ॥ २४६० ॥

म्हणौनि संक्षेपें सांगतां ॥ सर्वज्ञु होसील श्रोता ॥
श्रीकृष्णु म्हणे पार्था ॥ आइकें बोलणें ॥ २४६१ ॥

॥ श्लोक ॥

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत् त्रयं त्यजेत् ॥ २१ ॥

॥ कामः ॥ ००० ॥

नाना विषयाचा अभिलाषु ॥ भोगाचा परम सोसु ॥
जेणें नुपजे त्रासु व्यवसायाचा ॥ २४६२ ॥

तो कामु जाण पार्था ॥ सकळा वृत्ति ते उपजविता ॥
जेणें केली चिंता ॥ खरी होये ॥ २४६३ ॥

दारा द्रव्यादि संपदा ॥ ग्रह पुत्रादि बंधन सदा ॥
जो कामु तरि अपदा ॥ आपदा होये ॥ २४६४ ॥

मातें पाहिजे हे वासना ॥ सर्वांपक्षीं उपजे मना ॥
तोचि कामु कामना ॥ अंतःकरणिचि ॥ २४६५ ॥

॥ क्रोधः ॥ ००० ॥

कामु सांगितला ऐसा ॥ आतां क्रोधु दुजा तो कैसा ॥
जो प्रवर्तला विधुषा ॥ विकर्म करवी ॥ २४६६ ॥

जीतुली पापाची सामग्री ॥ तितुली आइती क्रोधी घरीं ॥
माता पितरां क्रोधु भारी ॥ गुरू सर्वज्ञातें ॥ २४६७ ॥

विचारू जाये हारपोनि ॥ उपदेशून पडे श्रवणी ॥
आत्मा परहित नाशूंनि ॥ शांतु नव्हे ॥ २४६८ ॥

॥ तथा लोभः ॥ ००० ॥

तैसाचि लोभु ते लुब्धता ॥ अर्थु न सोडवे प्राणु जातां ॥
अधिकाअधिक ममता ॥ प्रीति गुंते ॥ २४६९ ॥

धनावरूंनि वोवाळणें ॥ आपणातें लोभें जेणें ॥
पुत्रमणी मरणें ॥ ऐसा लोभु ॥ २४७० ॥

॥ इदंत्रिविधनरकस्यद्वारं ॥

एवं कामु क्रोधु लोभु हें साचार ॥ त्रिविध नरकाचें द्वार ॥
कैसे म्हणसील उत्तर ॥ तरि तूं अवधारीं ॥ २४७१ ॥

कामेनि कामु चेववीला ॥ आत्मा अभिलाषवंतु केला ॥
सकळां गुणा लागला व्यापारीं रंजउं ॥ २४७२ ॥

तो पदार्थाचा अभिलाषु ॥ करी आत्मागुणेषू ॥
मग कर्मी गुणाचा त्रासु ॥ नुपजे तया ॥ २४७३ ॥

गुणातीत गुणबंधन ॥ कर्म लाविलें अर्थसाधन ॥
तंवं भोगा येतें प्राचीन ॥ क्रियमाण नये ॥ २४७४ ॥

केला न चले प्रेत्नु ॥ तेणें क्रोधु होये उत्पन्नु ॥
तै अस्तमाना पावे दिनु ॥ विवेकाचा ॥ २४७५ ॥

फळ प्राप्तीचेनि अभावें ॥ कामना ते शांत नव्हे ॥
तै रोषावेषु उद्भवे ॥ प्रळयंकर ॥ २४७६ ॥

करूं नये तें कर्म जाण ॥ क्रोधा आंगें होये उत्पन्न ॥
जेणे नरकपद दारूण ॥ प्राप्त होये ॥ २४७७ ॥

कामुचि मुळीं नसता ॥ तरि अभिलाषु अर्थी न होता ॥
मग अर्थाप्राप्ती उपजता ॥ क्रोधु कासया ॥ २४७८ ॥

का घडुता हा दुचाचारू ॥ ऐसा कामु असंवरू ॥
तो न पुरता येरू ॥ क्रोध उठी ॥ २४७९ ॥

आता कामु पुरे आयासें ॥ पदार्थ जोडती अनायासें ॥
जे कीं अनर्थांचेनि रसे ॥ पुष्ट जाले ॥ २४८० ॥

ते दुष्ट जाणोंनि सांडावे ॥ ऐसें हें लोभें न संभवे ॥
संगे दुःख अनुभवे ॥ तें उगेंचि सोसी ॥ २४८१ ॥

कामु उपजवी कर्मातें ॥ क्रोधु करवी दुष्कृतातें ॥
तेथुनि सुटो पुरूषातें ॥ लोभु नेदी ॥ २४८२ ॥

कामापूर्ती उठी क्रोधु ॥ कामपुर्ती लोभु प्रसिध्दु ॥
ऐसा कामु तो अंधु ॥ मोक्षाचा मार्गी ॥ २४८३ ॥

नेणें आपुलें परावें ॥ पाप पुण्य येणे अनुभवें ॥
हे घ्यावें हें भोगावें ॥ इतुलेंचि पाहे ॥ २४८४ ॥

कामातें निवारावें ॥ तया उपदेशावरि क्रोधु धावें ॥
माजि अविवेकु उद्‌भवे ॥ तो विवेका गिळी ॥ २४८५ ॥

आतां असो तो कामु ॥ कर्मयोगें देईल श्रमु ॥
फल पावोंनि मनोधर्मु ॥ वोसरैल ॥ २४८६ ॥

तंवं लोभु प्रतापें आगळा ॥ तो साधना आणि प्राप्तफळा ॥
सांडू नेदी आगळा ॥ मोहो लावी ॥ २४८७ ॥

प्रसूति काळीं मरणाहूंनि ॥ क्लेश पावे ते जननी ॥
परि लोभे जाये विरोंनि ॥ कुमाराचिया ॥ २४८८ ॥

शरीरावरि आलें मरण ॥ परंतु न सोडी साध्यधन ॥
गेलें यांवेचि प्राण ॥ लोभवंतु ॥ २४८९ ॥

असो क्रोधें विवेका हालें ॥ लोभें वैराग्य उडविलें ॥
कामे पुरूषा घातलें ॥ अनार्थावरि ॥ २४९० ॥

येकु कामूचि नसता ॥ तै कां क्रोधु उपजता ॥
अर्थ लाभेवीण परार्था ॥ लोभुं नुठी ॥ २४९१ ॥

ना तरि क्रोधु येकु नाहीं ॥ तेथें कामा लोभाचें चाले कायी ॥
हानि लाभु तो देही ॥ सारिखाचि होता ॥ २४९२ ॥

साधन न पवे सिध्दी ॥ जोडिला अर्थु जाये आधी ॥
तेथे अनर्थु करी क्रोधी ॥ न करी येरू ॥ २४९३ ॥

आतां लोभूचि देहीं नसता ॥ तरि कामु कासया उपजता ॥
क्रोधु उणा पडता ॥ भर्वसेनि ॥ २४९४ ॥

यापरी येकेंविण येकातें ॥ तैसें बळ न वर्ते ॥
ते तिन्ही मिळती जेथें ॥ आपुलालें बळें ॥ २४९५ ॥

तिघांचे येक शरीर ॥ तें त्रिविध नरकद्वार ॥
वाट पाहोंनि जाण्हार ॥ जातु सुखें ॥ २४९६ ॥

पाहिजे नरक सागरू ॥ तरि येणे द्वारें रिघे नरू ॥
तो रौरवीचा पोहोणारू ॥ आंग घाली ॥ २४९७ ॥

कामा माजूंनि पाहातां ॥ अविवेकु प्रकाशे सेविता ॥
तेणें नरक साधन पार्था ॥ पंथु दिसे ॥ २४९८ ॥

करूं नये तें करणें ॥ परंतु हा अर्थु साधणें ॥
यापरी नरकाची साधनें ॥ कामदृष्टी ॥ २४९९ ॥

पाहे मात्रागमनही परी ॥ कामाचाची असे द्वारीं ॥
आतां न पडावया नरक सागरीं ॥ कवण कारण ॥ २५०० ॥

क्रोधा माजूंनि पाहातां ॥ देखिजे आत्मघाता परघाता ॥
गुरू दे ॐ माता पिता ॥ विटंबावीं वाटती ॥ २५०१ ॥

येर साधारण असो ॥ क्रोधें ये ऐसें दिसों ॥
आतां नरक सागरीं वसों ॥ नये कासया ॥ २५०२ ॥

लोभाचिया दृष्टी अर्जुना ॥ विश्वा तो आगळा प्राणा ॥
देवेसी केरुंनि वंचना ॥ गांठी बांधे ॥ २५०३ ॥

तो नाना दुष्कृतीं जोडावा ॥ नाथाचा नाथा नेदावा ॥
यत्ने ठेवावा ॥ तो येत्नु कैसा करुंनि ॥ २५०४ ॥

धर्मेसी चाळी वैर ॥ कर्म नाशलें समग्र ॥
गुरुदेव पितर ॥ ययांचा क्षोभु ॥ २५०५ ॥

तेथें भागु ईश्वराचा ॥ आणि यज्ञांगें देवांचा ॥
अतीथी विप्रा पितरांचा ॥ अंशु वर्ते ॥ २५०६ ॥

नेदितां तयांचें तयांतें ॥ तयांचा क्षोभु तेथें वर्ते ॥
आणि जोडितां जोडिली असत्यें ॥ दुष्कृतें नाना ॥ २५०७ ॥

लोभे धरितांचि तो विश्वा ॥ आंगीं घेइजे यां सर्वा ॥
मग शीघ्र पाविजे रौरवा ॥ तेणें योगें ॥ २५०८ ॥

असतां यें तिन्हीं मिनलीं ॥ आतां नरकु तो अति जवळी ॥
संसारी येणें मार्गें न्याहाळी ॥ तो देखे पुरुषु ॥ २५०९ ॥

निःशंकु जो प्रवेशला ॥ तो शीघ्रचि तेथें गेला ॥
नरक सागरु संचला ॥ जये ठांइ ॥ २५१० ॥

॥ आत्मनोनाशनं ॥ ००० ॥

जो म्हणिजे आत्मनाशु ॥ तो हें त्रय जाणिजसु ॥
यया आश्रयी पुरुषु ॥ तो आत्मघातकी गा ॥ २५११ ॥

हे बुद्धीचें परिलोपकु ॥ विषाहूंनि बाधी अधिकु ॥
अमार्गी पडती लोकु ॥ येणे दुष्टे ॥ २५१२ ॥

वर्णापासूंनि चळले ॥ आश्रमापासाव नाशले ॥
माणूसपण जनी सांडिलें ॥ ययां करिता ॥ २५१३ ॥

देवांचे जाले वैरी ॥ असुर म्हणविती संसारीं ॥
ते तया अंत्यजापुरी ॥ दूरि दवडिले ॥ २५१४ ॥

मुमुक्षु न पाहाती दृष्टी ॥ ब्राह्मण न करिती गोष्टी ॥
ते नाशले गा किरीटी ॥ भर्वसेन ॥ २५१५ ॥

नाशलें तयांचें मन ॥ काम संकल्पी करुन ॥
दिवा रात्रौ चिंतन ॥ अनर्थाचें ॥ २५१६ ॥

क्रोधें आणि अहंकारे ॥ सर्वांगी भूत संचरें ॥
आतां तो वेगु उतरे ॥ ऐसें कैंचें ॥ २५१७ ॥

अनर्थावरि किरीटी ॥ लोभें घातली मिठी ॥
जैसी सर्पांची पेटी ॥ न सोडी जीव ॥ २५१८ ॥

भक्तीलागि काजा नये ॥ ऐसें चित्त जालें आहे ॥
कर्म वैराग्य हे सोये ॥ सांडिली तेणें ॥ २५१९ ॥

विवेक दीपु माल्हवला ॥ अभ्यासु योगु गेला ॥
पुढे पुरुषु नाशला ॥ तो काजा नये ॥ २५२० ॥

वर्णापासाव नाशला ॥ भक्तां माजूंनि उठविला ॥
कामे क्रोधें विटळला ॥ लोभें जो नरु ॥ २५२१ ॥

ऐसें आपुलें नाशन ॥ नरक द्वार हें जाण ॥
असुराभावाचें कारण ॥ त्रिविध हे जें ॥ २५२२ ॥

॥ तस्मात् ॥ ००० ॥

ते स्वहितातें नेदी ॥ स्वहित मार्गी विरोधी ॥
तया करणे शुद्धबुद्धी ॥ येक करावें ॥ २५२३ ॥

॥ एतत् त्रयं त्ययेत् ॥ ००० ॥

कामु क्रोधु लोभु ज्ञेय ॥ प्रत्यक्षु जें हे त्रय ॥
तें सांडावें सकार्य ॥ सर्वथा कीं ॥ २५२४ ॥

हृदयस्थ विष जाणोनि ॥ सांडिजे जैसें वमूंनि ॥
मग तें पुडती परतोनि ॥ न घालिजे मुखी ॥ २५२५ ॥

व्याघ्र सांडिला वनी ॥ तो पुडती पाहावा हें मनी ॥
नुपजे जाण धनुःपाणी ॥ कदाकाळी ॥ २५२६ ॥

बंधींहूनि पळाला ॥ तो पुडती न ये त्या स्छळा ॥
विसरलों जीर्ण कां बला ॥ म्हणौनियां ॥ २५२७ ॥

भुजंगु सांडिला गळांचा ॥ पुडती संगु तयाचा ॥
न करी ऐसा तिहींचा ॥ त्यागु करावा ॥ २५२८ ॥

रिसाची उकले मिठी ॥ पळतां धाप न संटे पोटी ॥
मागुती घेउ येतां भेदी ॥ ने घे मन ॥ २५२९ ॥

तैसा उपजातांचि वेगु ॥ योगी होये असंगु ॥
सांडी अवाट अमार्गु ॥ मार्गी लागे ॥ २५३० ॥

उपजतांचि वेगु न सुटे ॥ ते चिन्ह जाणावें वोखटें ॥
पाल्हाइला मग न तुवे ॥ कामु क्रोधु लोभु ॥ २५३१ ॥

उपजतांचि आगारी ॥ करपे अर्जुना अवधारी ॥
ते विस्तारेना देशुभरी ॥ जलोंनि जाये ॥ २५३२ ॥

॥ श्लोक ॥

एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोव्दारैस्त्रिभिर्नर ।
आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥

॥ हे कौंतेय ॥ ००० ॥

अवधारीं कुंतीनंदना ॥ हे असुर भाव गा अर्जुना ॥
येही विकार नाना ॥ असुरीचे ॥ २५३३ ॥

सकळां असुरधर्मा हे बीज ॥ सांगितलें जाण तुज ॥
आतां निरोपण सहज ॥ तें तू अवधारीं ॥ २५३४ ॥

**॥ एतैः त्रिभिः तमोद्वारैः ॥ ००० ॥**

कामु क्रोधु लोभु तिन्हीं ॥ उठिलिं आपणाचिपासूंनि ॥
आपुला केवळ अज्ञानी ॥ महाद्वारें ॥ २५३५ ॥

येहीं नरकाप्रति जायिजे ॥ तें सहसा पुनरपि न परतिजे ॥
म्हणौनि पांडवा जाणिजे ॥ यां तिंहीं तमोद्वारीं ॥ २५३६ ॥

**॥ विमुक्तः नरः ॥ ००० ॥**

सुटला विवेकें नरू ॥ मग तो न म्हणावा असुरू ॥
येरू असुरीचा विकारू ॥ तो गेला उडोनियां ॥ २५३७ ॥

**॥ आत्मनः श्रेयः ॥ ००० ॥**

मग उरला निजसत्वेंसी ॥ प्रकाशु होये बुध्दीसी ॥
मन सांडूंनि विषयांसि ॥ स्वस्छ होये ॥ २५३८ ॥

वैराग्य उपजे देहीं ॥ प्रेम सद्गुरूचां ठांइं ॥
तेथें गुरूवाक्य होये समये ॥ तेणें मग ॥ २५३९ ॥

शास्त्रार्थें होये योग्यता ॥ वोळखि पडे आत्महिता ॥
मग आपणा श्रेय तें गुरूवाक्यता ॥ जाणोनियां ॥ २५४० ॥

**॥ आचरति ॥ ००० ॥**

आचरे आदरें बहुतें ॥ प्रवर्तला साधन पंथें ॥
मग पुढें तया साधकातें ॥ कैसी गति ॥ २५४१ ॥

**॥ ततः ॥ ००० ॥**

तरि आस्छेचा अतिभरू ॥ स्वस्छें युक्तु विरक्तु नरू ॥
प्रज्ञेतें पावला गुरू ॥ आराधूंनि ॥ २५४२ ॥

तदनुसारे प्रेत्नु करितां ॥ ज्ञानयोग मतें पार्था ॥
जालीं असतां योग्यता ॥ तया नंतरें ॥ २५४३ ॥

**॥ परांगतिं यांत्ति ॥ ००० ॥**

आपुलेनि स्वानुभवें ॥ सायोज्य मोक्षातें पावे ॥
जीवा ब्रह्माभेदु न संभवे ॥ ऐसें होये ॥ २५४४ ॥

यालागि असुरही परी ॥ सुटले तिही तमोद्वारीं ॥
आत्मज्ञानें अवधारीं ॥ परमगती तें ॥ २५४५ ॥

पावती जाण सुवर्म ॥ विशेषीं होती ब्रह्म ॥
यालागि अर्जुना गुणधर्म ॥ तेचि वोखटे ॥ २५४६ ॥

गुणीचि असुरत्व लागे ॥ गुणीचि तें फिटे अवघे ॥
येथ चुके तोचि अमार्गें ॥ लागे नरू ॥ २५४७ ॥

आतां तू बोलसील वचन ॥ कवणा लागती असुर गुण ॥
ते कैसे वर्तती म्हणौन ॥ नेणते प्राणी ये ॥ २५४८ ॥

॥ श्लोक ॥

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।
न स सिध्दिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥

॥ यः ॥ ००० ॥

तरि जन्मापासूंनि जयातें ॥ अज्ञानाचाचि संगु वर्ते ॥
जे नेणती शास्त्र श्रवाणातें ॥ पामर पशु ॥ २५४९ ॥

प्रातःकाळींचि उठिता ॥ मूत्रपुरीशाची व्यथा ॥
तयावरि जे चिंता ॥ ते उदरपूर्तीची ॥ २५५० ॥

माध्यान्ही क्षुधापिपासा ॥ घरांमाजि आडवळसा ॥
स्नानसंध्या ते ग्रासा ॥ माजि अवघी ॥ २५५१ ॥

नावो कासा रीती भोजन ॥ मग क्रीडावी नोदें काळक्षेपन ॥
द्यूतसारिपाटु जीवन ॥ लाळन अपत्यांचें ॥ २५५२ ॥

ऐसा सायंकाळ पावतां ॥ कामाची उपजे चिंत्ता ॥
तेंचि सोसणी करितां ॥ समयो पावे ॥ २५५३ ॥

मग स्त्री कामी अभिरतु ॥ त्रुप्ती तें न पवे चित्तु ॥
द्रव्यें भक्षिती बहुतु ॥ शोषकें तीं ॥ २५५४ ॥

इच्छा न पुरे रमतां ॥ मग निद्रा भूत होये अवचिता ॥
मृताऐसा पांडुसुता ॥ देहो टाकी ॥ २५५५ ॥

उठितां पूर्ववत्प्रकारें ॥ दिनु घाली तेणेंचि व्यापारें ॥
तो पशू द्विपादु निर्धारे ॥ आम्ही म्हणितला ॥ २५५६ ॥

जयाची सभा अर्जुना ॥ संतीं वर्जिली विचक्षणा ॥
काम क्रोधा संभव ना ॥ लोभाची जेथें ॥ २५५७ ॥

जन्मे ऐसियांचां उदरीं ॥ संगती वाढे गा अवधारी ॥
जाणता होये व्यापारीं ॥ तेव्हेळी कैसा ॥ २५५८ ॥
आपुलेनि कुमतें कुशळु ॥ बहुसालु होये वाचाळु ॥
व्यापारी दक्षु अनिर्मळु ॥ वासनेचा ॥ २५५९ ॥
ऐसा जो की नरू ॥ जया नाही शास्त्र गुरू ॥
तो वाचेचा अधरू ॥ काये करी ॥ २५६० ॥

**॥ शास्त्रविधिं उत्सृज्य ॥ ००० ॥**

शास्त्रविधितें सांडूंनि ॥ तेथें दोषु आरोपुनि ॥
हे व्यर्थ अवधें म्हणौनि ॥ जनी उपपादी ॥ २५६१ ॥
आचमनीयच प्रमाण ॥ उदक करावें प्राशन ॥
न्यूनें अधिके सुरापानं ॥ हें काये म्हणे ॥ २५६२ ॥
यज्ञी पशु मारावे ॥ ऐसी हिंसा ते पाप नव्हे ॥
ऐसियां शास्त्रां विश्वासावें ॥ म्हणे कवणें ॥ २५६३ ॥
प्रस्छा येकाचें अन्न ॥ सांडावें विटाळलें म्हणौन ॥
तेंचि बहुसाल ते प्रोक्षून ॥ शुध्द करावें ॥ २५६४ ॥
ये अर्थी काये देखिलें ॥ युक्ती नये योजिलें ॥
मग खोटें म्हणौनि सांडिलें ॥ धर्मशास्त्र ॥ २५६५ ॥
स्नाने पातक जाये ॥ ये अर्थी प्रमाण काये ॥
केलें ते विसरतां नये ॥ शुभाशुभ ॥ २५६६ ॥
शास्त्रें वादा प्रवर्तलीं ॥ ती परस्परा मिथ्या जाली ॥
आतां साच कवणचि बोली ॥ आम्ही मानावी ॥ २५६७ ॥
वेद ते धर्म संवाद ॥ तयाचे अनंत भेद ॥
परंतु प्रत्यक्ष प्रमाणसिध्द ॥ न होती ॥ २५६८ ॥
अग्नीचें करितां आवाहान ॥ कुंड पेटावे इंधनावीण ॥
वरूणसूक्ते जीवन ॥ प्रत्यक्ष होवावे ॥ २५६९ ॥
ऐसा कुयुक्तीचेनि बळे ॥ वाचळु बोले सगळे ॥
मग शास्त्रविधान जितुले ॥ तितुले सांडोनि ॥ २५७० ॥
इच्छा ते द्रव्य खाये ॥ म्हणे यांतु पाप कै आहे ॥
मना माने तेथे जाये ॥ आचारहीनु ॥ २५७१ ॥

विधानें शोचु न करी ॥ स्नान संध्येचा वैरी ॥
येकु तो अळसी शरीरीं ॥ म्हणौनि सांडी ॥ २५७२ ॥

उभाचि सोडी मळमूत्र ॥ निदैलाचि नासी घर ॥
माझा येका शरीरी ॥ ओले न करी ॥ २५७३ ॥

येकें दुःखरूप देखोनि ॥ कर्म सांडीलें नेणोनी ॥
शास्त्री दूषण ठेवोनि ॥ आचार सांडिती ॥ २५७४ ॥

शास्त्र विधानें आचरता ॥ उबगले परि ते पार्था ॥
देह व्यापारे श्रमता ॥ पुरे न म्हणती ॥ २५७५ ॥

द्रव्याकारणे परसेवा ॥ करिता नाही विसावा ॥
रात्री दिवसू अघवा ॥ तयाचि वारी ॥ २५७६ ॥

रसविक्रय हयविक्रय ॥ पशूविक्रय नरविक्रय ॥
कन्याविक्रय मांसविक्रय ॥ इच्छा तें करणें ॥ २५७७ ॥

साधली तेचि भोगावी ॥ स्त्री ते येकीचि अघवी ॥
आपुली आणि परावी ॥ हे वृथा कल्पना ॥ २५७८ ॥

जे विद्या ते पोटालागी ॥ बाळपणापासूंनि अवघी ॥
पशूचिया परी जगीं ॥ विचरे जो नरू ॥ २५७९ ॥

॥ सः ॥ ००० ॥

तो अबध्दा पशू परी ॥ इंद्रिया गणाचां व्यापारीं ॥
विषयासक्तु इच्छाचारी ॥ तेणें कुकर्मे ॥ २५८० ॥

॥ न सिध्दिअवाप्नोति ॥ ००० ॥

न पवे सायोजता ॥ ना स्वरूपता सामिप्यता ना सलोकता ॥
मोक्षु नाहीं विकर्मवंता ॥ भर्वसेन ॥ २५८१ ॥

॥ न सुखं ॥ ००० ॥

तो नित्यबध्दु संसारी ॥ असुर भाव त्याचां शरीरीं ॥
सुख न पवे सर्वां प्रकारीं ॥ कष्टी होये ॥ २५८२ ॥

जन्मोजन्मी तयातें ॥ संतोषु कैसा तो न वर्ते ॥
पावे या असुर योनीतें ॥ दुराचारी ॥ २५८३ ॥

॥ न परांगतिं ॥ ००० ॥

काम क्रोधा लोभा स्छान ॥ जालें असतां नित्य मन ॥
ते परब्रह्मप्राप्ति निर्गुण ॥ ते कैसे न पावती ॥ २५८४ ॥

या लागि संगापासाव कुयुक्ति ॥ वेदीं शास्त्रीं होये अभक्ती ॥
मग शास्त्रविधाने सोडिती ॥ अज्ञाते नर ॥ २५८५ ॥

तेथे वर्त्तता अर्थ कामे ॥ घडती अपारें कुकर्मे ॥
स्वधर्मी दोषु अवगमे ॥ तो सुटे सर्वथा ॥ २५८६ ॥

कुकर्मे रजतम उत्पन्न ॥ कामक्रोध लोभ गहन ॥
जितुले असुरा भाव जाण ॥ तितुले प्राप्त होती ॥ २५८७ ॥

कर्मापासाव असुरी ॥ उत्पन्न होये संसारी ॥
यालागि मुख्यत्वें वैरी ॥ संगु मुर्खाचा ॥ २५८८ ॥

तेथें काये विहित करावें ॥ अविहित काय न करावें ॥
हा विचारूचि न संवें ॥ कदाकाली ॥ २५८९ ॥

विहितें जोडे कवणु अर्थु ॥ अविहितें कवणु अनर्थु ॥
ऐसे न कळे स्वार्थु ॥ तोचि चुके ॥ २५९० ॥

अविहित दिसे काज ॥ विहित न रुपेचि सहज ॥
उफरटि ज्ञान बुझ ॥ होये अज्ञाना ॥ २५९१ ॥

विहित जालें अविहिता ॥ अविहित सर्व सर्वविहित ॥
अनर्थ आवडती अर्थ ॥ अनर्थ मानती ॥ २५९२ ॥

अज्ञाना ऐसेंचि घडेची ॥ नवल नव्हे येथें काहींचि ॥
यालागि कृपा तयांची ॥ उपजलि ईश्वरा ॥ २५९३ ॥

तेणें रचिले हे वेद ॥ वर्णश्रम केले भेद ॥
प्रयोजिले शास्त्रवाद ॥ तयावरि ॥ २५९४ ॥

आतां ते शास्त्र जाणावें ॥ करूं नये तें न करावें ॥
आज्ञा समर्थाचि करावें ॥ तेचि कर्म ॥ २५९५ ॥

तेथे जो पाहे कारण ॥ तयावरि पडे विघ्न ॥
ते आज्ञाचि प्रमाण ॥ ईश्वराची ॥ २५९६ ॥

वेदुवाणी ईशाची ॥ शास्त्री बोली जे अर्थु तोचि ॥
वचने अर्थाशास्त्रज्ञाची ॥ ती तदनुसारचि जाणांवीं ॥ २५९७ ॥

तेथें हेतु पाहाताचि अभक्ति ॥ करू नये आपुली युक्ति ॥
पाहिजे आपणा उत्तम गति ॥ तरि हे ऐसें ॥ २५९८ ॥

॥ श्लोक ॥

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्य व्यवस्थितौ ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्ईसि ॥ २४ ॥

॥ तस्मात् ॥ ००० ॥

म्हणौनि तया कारणे ॥ अर्जुना ते श्रीकृष्णु म्हणे ॥
आईके पार्था बोलणे ॥ आर्यनीतीचे ॥ २५९९ ॥

॥ ते ॥ ००० ॥

तू दैवी संपत्तीयुक्तु ॥ विशेषे माझा भक्तु ॥
भाविकु आणि विरक्तु ॥ ऐसिया तु ते ॥ २६०० ॥

॥ कार्याकार्येव्यवस्थितौ ॥ ००० ॥

कार्या अकार्याची व्यवस्छा ॥ जाणो उपजली असतां ॥
काये करावें म्या आतां ॥ न करावे काय ॥ २६०१ ॥

ऐसी अवस्छा जै उपजली ॥ तै स्वयुक्ति पाहिजे सांडिली ॥
मग ऐसिये वासनेचां काली ॥ ज्ञानार्थ उतें ॥ २६०२ ॥

॥ शास्त्रं प्रमाणं ॥ ००० ॥

शास्त्रचि आथी प्रमाण ॥ जे सर्वज्ञा ईशाचे ज्ञान ॥
येयेचि अर्थी जाण ॥ प्रवर्तविले तेणे ॥ २६०३ ॥

॥ इह ॥ ००० ॥

तू असता ये संसारि ॥ गुणयुक्तु स्छूल्रू शरीरी ॥
युक्ती न करी दुसरी ॥ तयाहूनि ॥ २६०४ ॥

हरि : ॐ तत्सद् इति श्रीमद्भगवद्गीता
सुपनिषत्सु ब्रह्मविद्यायाम् योगशास्त्रे
श्रीकृष्णार्जुन संवादे श्री दिगंबरानुचरविरचित
गीतानामे टीकायामं दैवासूरसंपव्दिविभागे नाम

षोडशोध्याय : ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

ॐ शांति: । शांती: । शांती ॥

